मुद्रक व प्रकाशक

किर्लोस्कर प्रेस,
किर्लोस्करवाडी,
( जि. सातारा ).



२. प्रो. फडके यांनीं ही कादंबरी लिहिण्यास ता. २०-१२-३५ रोजी प्रारंभ केला, व ता. ३-५-३६ रोजी ती पूर्ण केली. हस्तलिखिताचीं एकंदर पृष्ठें ४३२ झालीं.

३ ही कादंबरी प्रथम किर्लोस्कर मासिकांतून मार्च १९३६ पासून फेब्रुआरी १९३७ पर्यंत प्रसिद्ध झाली.

# प्रकरण १ लें

आयुष्यांतल्या सार्‍या गोष्टी अगदी सुसूत्र आणि वेळच्या वेळेवर घडल्या पाहिजेत, एवढेंच नव्हे, तर घडतातहि अशा समजुतीचीं कांहीं माणसें असतात. त्यांच्या स्वतःच्या जीवनाचा ओघ कोणताहि अडथळा न येतां अगदीं सुसूत्र वाहात आलेला असतो, म्हणून त्यांची तशी समजूत होते कीं काय तें सांगवत नाहीं; पण अशीं कांहीं माणसें असतात खरीं.

निदान दादासाहेब तसे होते एवढें तरी खास.

रोज सकाळीं दहा वाजतां जेवायला बसायची, दहा वाजून वीस मिनिटांनीं पोषाख करावयास लागण्याची, आणि दहा वाजून सत्तावीस मिनिटें झालीं कीं नेकटायची गांठ बांधीत असतां खालीं पोर्चमध्यें ड्रायव्हरनें मोटार आणून तिचा फुगा वाजविलेला ऐकण्याची त्यांना इतकी संवय झाली होती, कीं या नित्यक्रमाचा भंग करणारी एखादी गोष्ट असू शकेल, अशी कल्पनाच त्यांना कधीं शिवली नव्हती.

पण अशी एक गोष्ट त्यांच्या स्वतःच्या घरांतच होती. ती म्हणजे त्यांच्या स्वतःचा एक मुलगा विलास.

सार्‍या गोष्टी सुसूत्र घडतात, ही जशी दादासाहेबांची स्वभावसिद्ध समजूत झाली होती, तशीच ठराविक गोष्टींच्या ठराविक क्रमांत अडथळा आला, कीं त्या अडथळ्याला कारण आपला मुलगा विलासच असणार, अशीहि दादासाहेबांची ठाम समजूत झाली होती. अलीकडे तर ती फारच ठाम व्हावयास लागली होती.

त्यामुळें आज जेव्हां नेहमींच्या ठराविक क्षणाला मोटारीचा आवाज ऐकायला आला नाहीं, तेव्हां त्यांनीं नेकटायची गांठ बांधतां बांधतां समोरच्या आरशाच्या वरच्या बाजूस असलेल्या विलासच्या फोटोकडे चटकन् पाहिलें.

जणुं ते विलासला म्हणाले,

"माझी गाडी वेळेवर तयार नाहीं, याला तूंच कारण आहेस खास. मला न विचारतां गाडी कुठेंतरी घेऊन जायची फार संवय आहे तुला!"

अशा बोलण्यावर विलास काय उत्तर देणार तें दादासाहेबांना माहीत झाले होतें. म्हणून टेनिसच्या दोनतीन रॅकेटम् डाव्या खांद्याखालीं धरून हंसत उभा राहिलेल्या त्या फोटोंतल्या उंच, सडपातळ, देखण्या मुलाच्या मुद्रेकडे अधिक न पहातां ते दूर झाले आणि पोर्चकडल्या खिडकींत जाऊन जरा मोठ्यानें ओरडले,

"अरे बाबू! गाडी, गाडी."

खालून कांहीं उत्तर येण्याऐवजी त्यांच्या पाठीमागून कोणसें म्हणालें,

"बाबू टॅक्सी आणायला गेला आहे. आपल्याला टॅक्सींतनं जायला पाहिजे आज."

दादासाहेबांनी वळून पाहिलें, तों दारांत त्यांच्या पत्नी सुदेष्णाबाई उभ्या असल्याचें त्यांना दिसलें.

जणु त्यांना पाहिल्यानंतर मगच त्यांचें बोलणें आपल्याला ऐकूं आलें व समजलें असें दर्शविणारी चमत्कारिक मुद्रा दादासाहेबांनीं केली, व विचारलें,

"कां?"

त्यांच्या प्रश्नाचें उत्तर देण्याऐवजीं सुदेष्णाबाई म्हणाल्या,

"आपला पोषाख होतो आहे, तोंपर्यंत येईलच बाबू टॅक्सी घेऊन."

कोट घातल्यानंतर जाकिटावरची घड्याळाची सांखळी चांचपीत दादासाहेबांनीं आपला प्रश्न पुन्हा विचारला,

"पण टॅक्सी काय म्हणून? :माझी मोठी गाडी कां नाहीं?"

आतां प्रश्न टाळणें शक्य नाहीं, हें उमजून सुदेष्णाबाई म्हणाल्या,

" विलासनं नेली आहेन् वाटतं."

" कां ? त्याच्या धाकट्या गाडीला काय झालं आहे ?"

या प्रश्नाचें उत्तर सुदेष्णाबाईंना माहीत असूनहि सांगता येण्यासारखें नव्हतें.

आदल्या रात्रीं विलासनें आपल्या गाडीला मोठा अपघात करून घेतला होता, व त्या अपघाताच्या वेळीं त्याच्याबरोबर दोन अँग्लो-इंडियन मुली सांपडल्या होत्या, इत्यादि हकीगत त्यांना माळ्याकडून सकाळी कळली होती.

पण असली हकीगत मुलाची आई मुलाच्या बापाला कधीं सांगेल काय ?

म्हणून सुदेष्णाबाई गप्प बसल्या.

दादासाहेबांनीं पुन्हा विचारलें,

" विलासच्या गाडीला काय झालं आहे ?"

" कुणास ठाऊक ! '

" अन् माझी गाडी घेऊन कुठं गेला आहे ?"

" कुणास ठाऊक !"

" केव्हां परत येणार आहे ?"

" कुणास ठाऊक !"

दादासाहेबांनीं आपल्या जाकिटाच्या दोन्ही बाजू ताणून ओढल्या, आणि आपल्या टक्कल पडलेल्या डोक्यावरून हात फिरविला.

पुष्कळ बोलावेंसें वाटत असूनहि बोलून कांहीं उपयोग नाहीं, जें बोलावयाचें तें मनाशींच बोललेलें बरें, असें जेव्हां ते ठरवीत, तेव्हांचा त्यांचा हा अभिनय अगदीं ठरलेला होता.

ते मनांतल्या मनांत म्हणाले,

" विलास कुठं गेला आहे, केव्हां परत येणार आहे, तुला कांहींच माहीत नाहीं ना ? छान ! तुझ्या या अशा वागण्यानंच मला विलासशीं कडकपणानं वागतां येत नाहीं. तुला वाटतं, आपल्या

मुलासारखा मुलगा नाहीं जगांत. त्याला मन मानेल तसं वागूं द्यावं. त्याच्या अंगीं गुण नाहींत. असं नाहीं माझं म्हणणं. पण अगदींच शिस्त सोडून वागायचं म्हणजे काय? माणसाला शिस्त पाहिजे बुवा. आम्ही येवढं शिकलोंसवरलों, मोठ्या हुद्यापर्यंत चढलों, तें शिस्तीच्या जोरावर. पण काय सांगायचं तुम्हांला? अलीकडच्या जगांत शिस्त कुणालाच नकोशी झालेली आहे..."

तितक्यांत खालीं पोर्चमध्यें येऊन दाखल झालेल्या टॅक्सीचा फुगा वाजला, आणि सुदेष्णाबाईंनीं त्यांची साहेबी टोपी आणि काठी पुढें केली. त्यामुळें दादासाहेबांचें तें आत्मगत भाषण तेवढ्यावरच थांबलें.

ते खालीं गेले व टॅक्सींत बसून ऑफिसकडे रवाना झाले.

मोटार बंगल्याच्या बाहेर जाऊन दिसेनाशी झाली, तरी पतीबरोबर खालीं आलेल्या सुदेष्णाबाई तशाच दारांत उभ्या राहिल्या.

पोर्चच्या पलीकडे कारंजाचा फवारा उडत नव्हता, तरी कारंजाची कुंडी कांठोकांठ भरली होती. उजव्याडाव्या बाजूस विलायती फुलांचे रंगीबेरंगी ताटवे उभे होते, आणि समोर मोठ्या राजरस्त्यावर सरळ उंच झाडें होतीं, त्यांवर लांबट पांढरीं फुलें बहरलेलीं दिसत होतीं.

आज कितीक वर्षे सुदेष्णाबाईनीं हे दृश्य सतत पाहिलें होतें. त्यांचें लग्न होऊन त्या प्रथम दादासाहेबाच्या बंगल्यावर आल्या, व दुसऱ्याच दिवशीं सकाळीं पोर्चखालच्या या मुख्य दरवाजांत कांहींशा चोरट्या मनानें येऊन उभ्या राहिल्या, तेव्हां त्यांना हेंच दृश्य दिसलें होतें. पुढें त्यांचा नवखेपणा जाऊन दादासाहेबांच्या संसाराशीं त्या अधिकाधिक समरस होत गेल्या; त्या काळांतहि कितीदां तरी त्या अशाच या दारांत येऊन उभ्या राहिल्या होत्या, व हेंच दृश्य त्यांना दिसलें होतें. पुढें विलासच्या जन्मानंतर त्याला सुंदरशा हातगाडींत दाई त्याला बागेंतून फिरवी, तो थोडा वाढल्यावर मोटारींत चढून आपल्या दोन्ही

हातांनीं मोटारीचा फुगा दाबण्याचा प्रयत्न करी, आणखी मोठा झाल्यावर बागकाम करणाऱ्या माळ्याच्या खांद्यावर चढे, त्यानंतर कांहीं वर्षांनीं घरांतून कितीहि हांका मारल्या तरी तो बागेंतच इकडून तिकडे धांवत राही— हीं सारीं दृश्यें या दारांत उभें राहूनच सुदेष्णाबाईंनीं पाहिलीं होतीं. त्यामुळें बंगल्यापुढच्या त्या बगीचा-बद्दल त्यांच्या अंतःकरणांत कांहींएक विशेषच कोमल भाव निर्माण झाला होता. त्या बगीचाकडे पाहिलें. कीं आपल्या आयुष्याचा चित्रपटच आपल्या डोळ्यांपुढून झर्रदिशीं जात आहे, असा भास होऊन त्यांना अवर्णनीय सुख होत असे.

अलीकडे मात्र त्या दारांत उभें राहून पुढच्या त्या बगीचा-कडे दृष्टि टाकली, कीं आपल्या मनांत खोल कोठेंतरी दुःखाचे तरंग उठत असल्याची सुदेष्णाबाईंना जाणीव होत असे.

माणसांचीं कांहीं दुःखें मोठीं चमत्कारिक, सूक्ष्म स्वरूपाचीं असतात. दिवसाकांठचे नित्याचे उद्योग करतांना तीं त्याला कळत नाहींत; परंतु मध्येंच एखाद्या क्षणींच त्यांची बोंच त्याला जाणवते. हाडांत कुठेंतरी चमक भरली असली म्हणजे ती एखादे वेळीं इतकी सूक्ष्म आणि गुप्त असते, कीं ती ज्याची त्यालासुद्धां मध्येंच केव्हां-तरी अमुक एक हालचाल झाली तरच कळते. कांहीं मानसिक व्यथांचें असेंच आहे.

सुदेष्णाबाईंना अलीकडे जडलेली मनोव्यथा अशाच स्वरूपाची होती. बंगल्यापुढच्या त्या बगीचाकडे दृष्टि लावून त्या उभ्या राहिल्या, म्हणजे त्या व्यथेचें अस्तित्व त्यांच्या एकदम लक्षांत येई. जणुं ती बाग म्हणजे त्यांची एखादी रहस्यांतील मैत्रीणच होती, व त्यामुळें तिचा सहवास घडतांच त्यांच्या अंतःकरणांतील सारें गुप्त सुखदुःख उचंबळून वर येई.

आत्तांहि असेंच झालें.

त्या जेव्हां बगीचाकडे पहात उभ्या राहिल्या तेव्हां श्रीमंती संसारांतील विविध सुखांमुळें उत्पन्न झालेल्या आल्हादाचा तर त्यांना

प्रत्यय आलाच, पण लगेच विलासचा विचार मनांत येऊन त्यांचें चित्त अस्वस्थहि झालें. अलीकडे विलासबद्दल त्यांना विलक्षण चिंता वाटूं लागली होती. त्याचें पुढे कसें होणार, असें त्यांना वाटूं लागलें होतें. दादासाहेब त्याच्याविषयी कांहीं कठोर शद्व बोलले, कीं त्या वेळी सर्वस्वी त्याचा कैवार घेऊनच त्या बोलत, व त्यांना गप्प करीत. परंतु त्या एकट्या असल्या, आणि विशेषत: बगीचाकडे पहात एकट्या उभ्या राहिल्या, की त्यांचें मन म्हणे, " विलासची वागणूक कधी सुधारणार ? आणि त्याचं लग्न होऊन तो संसारांत रमूं लागल्याचं दृश्य मला केव्हां दिसणार ? "

सुदेष्णाबाई चांगल्या सुधारक घराण्यांत वाढलेल्या, आणि पुष्कळ सुशिक्षित होत्या. पण स्त्री सुशिक्षित असली, तरी स्वत:च्या अपत्याविषयीं विचार करतांना शिक्षणापेक्षां वात्सल्याला शोभतील असेच विचार तिच्या मनांत येतात. त्यामुळें सुदेष्णाबाईंना वाटे, आपल्या विलासनें आपला अवखळपणा आतां सोडावा, आणि लग्न करावें.

तो एंजिनियरिंगची परीक्षा पास होऊन आणखी शिकावयास विलायतेस गेला, त्याच्या आधींपासून कितीतरी थोरामोठ्यांच्या सुशिक्षित मुली त्याला सांगून आल्या होत्या. एकदोघी मुलींचें तर त्याच्यावर निस्सीम प्रेम होतें, हेंहि सुदेष्णाबाईंना स्पष्ट दिसत होतें; पण विलासचें चित्त कोठेंहि स्थिरच होत नव्हतें. सर्व प्रकारच्या मर्दानी खेळांच्या आणि मोटार व मोटारसायकल हांकण्याच्या शर्यती जिंकण्याचा त्याला जो असामान्य छंद होता, त्यापुढें जणुं जगांतील दुसरी कोणतीहि गोष्ट त्याचें मन जिंकूं शकतच नव्हती. लोक म्हणत, विलाससारखा ऐटबाज पटाईत खेळाडु:नाहीं. पण लोक असेंहि म्हणत, कीं विलास व्यसनी झाला आणि वांया गेला; त्याच्यापासून आईबापांना सुख मिळणें कठीण ! हीं दोन्ही तऱ्हेचीं बोलणीं सुदेष्णाबाईंच्या कानांवर येत, आणि मग त्यांच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक होई. विलास आपल्याला सुखी करणार

नाही, असें कबूल करावयास त्यांचें प्रेमळ मन तयार नसे; पण विलासपासून आपल्याला कोणत्या प्रकारें सुख होईल, याचा हिशोब करूं. लागतांच, नको तो विचार, म्हणून त्यांच्या मनाला माघार घ्यावी लागे...

एकदोन वेळां त्यांनीं विलासजवळ लग्नाचा विषय काढूनहि पाहिला होता. सामान्यपणेंच नव्हे, तर त्याच्या प्रेमासाठीं उत्सुक दिसणाऱ्या कल्पना आणि सुनेत्रा या दोन्ही मुलींचीं नांवें घेऊन. पण त्यावर विलासनें दिलेलें उत्तर मोठें चमत्कारिक होतें.

त्यानें त्यांना विचारलें होतें,

" आई, खरं खरं प्रेम जडल्यावांचून लग्न करायचं नाहीं, या माझ्या म्हणण्यांत तुला वावगं काय दिसतं ?"

सुदेष्णाबाई म्हणाल्या होत्या,

" मी कुठं म्हणतें वावगं ? पण तुझ्या पसंतीस एकसुद्धां मुलगी येऊं नये, याचं नवल वाटतं ! इतक्या मुलींत तूं मिसळतोस, खेळतोसवरतोस, आणखी–"

" अग आई, खेळण्यासवरण्याचं काय सांगतेस ? मला त्या सगळ्याच मुली आवडतात; पण माझं खरं प्रेम म्हणशील, तर कुणावरच नाहीं! "

" सुनेत्रावर तरी ?"

" अंहं. !"

" मग कल्पनेवर ?"

" छे ! त्यासुद्धां इतर मुलींप्रमाणंच माझ्या दृष्टीला कचकड्याच्या सुंदर भावलीसारख्या वाटतात ! शिकल्यासवरल्या आहेत, धिटाईनं पुरुषांत मिसळतात, खेळतात, गोड गोड बोलतात, हंसतात-खिदळतात– मजा येते त्यांच्या सहवासांत. पण त्यापलीकडे माझ्या मनाला त्या ओढूं शकत नाहींत. कांहीं झालं तरी त्या कचकड्याच्या भावल्याच ! माझं मन जिंकणारी स्त्री कशी असायला पाहिजे आहे, कुणास ठाऊक ? पण ती अजून मला भेटली नाहीं, येवढं खास. ती भेटली, कीं एका क्षणाचाहि विलंब

न करतां तिला घेऊन तुझ्यापुढं येईन, अन् सांगेन– ' आई, संभाळ आपली सून. ' आई, मला माहीत आहे, दादासाहेब आणखी तूं आतांशा माझ्यावर थोडीशीं रुष्ट आहांत. पण खरंच सांग, मी तुला हेतुपुरस्सर दुःख देईन का ?"

यावर कोणतीहि आई जें करील, तेच सुदेष्णाबाईंनीं केलें होतें.

त्यांनीं विलासच्या मस्तकावर हात थोपटला होता, आणि खालचा ओंठ दाबून डोळ्यांतील आंसवें परतविलीं होती.

आतां बगीचाकडे पहातां पहातां याच प्रसंगाचें सुदेष्णा-बाईंना स्मरण झालें; व जणुं त्या प्रसंगीं आंवरलेले अश्रु त्यांच्या डोळ्यांवाटें या वेळीं बाहेर पडूं लागले.

ते पुसण्यासाठीं त्यांनीं आपला पदर हातीं घेतला, तोंच आंत दिवाणखान्यांत टेलिफोन खणखणून वाजला.

त्यामुळें दरवाजांतून आंत वळतांना त्यांना मनाशीं म्हणतां आले, " मला वाईट वाटलं म्हणून नाहीं, तरी टेलिफोन घेतला पाहिजेच म्हणून बगीचाकडे पाहायचें सोडून मी आंत परतलें. "

त्या टेलिफोनजवळ गेल्या, आणि रिसीव्हर उचलून त्यांनीं विचारलें,

" हॅलो, कोण आहे ?"

टेलिफोनच्या दुसऱ्या बाजूनें उत्तर आलें,

" मी, सुनेत्रा बोलतें आहे. आई, तुम्ही का आहांत टेलिफोन-वर ?"

" हो, कां ग ?"

" विलासाचं बरं आहे ना आज ?"

सुदेष्णाबाईंना तो प्रश्नच कळेना. विलासचें बरें आहे म्हणजे ? त्याला कधीं काय झालें होतें ? त्या कांहींच बोलल्या नाहींत.

सुनेत्राच तिकडून म्हणाली,

" काल एकाएकीं त्यांचं पोट दुखायला लागलं होतं ना ? काल संध्याकाळीं त्यांना आइस्क्रीम पार्टीला मीं बोलावलं होतं.

कलकत्त्याचे हायकोर्ट जज्ज आमच्याकडे पाहुणे आले आहेत, त्यांच्याशीं विलासची ओळख करून देणार होते बाबा. पण विलास-कडून ऐन वेळीं टेलिफोन आला कीं, माझं पोट फार दुखतं आहे, मी अंथरुणावर पडून आहे. तें कळल्यापासून समाचार घ्यायला समक्षच यायसाठीं सारखी धडपडतें आहे मी; पण पाहुण्यांच्या लटांबरांत गुरफटलें आहे, ती कांहीं केल्या सुटका म्हणून होत नाहीं. शेवटीं आतां म्हटलं टेलिफोन तरी करावा—"

"असं असं..."

"बरं आहे ना आतां त्यांचं पोट? का अंथरुणांतच आहेत?"

"छे छे, अंथरुणांत नाहीं. बरं आहे आतां"

"ठीक. मीं विचारलं म्हणून सांगा हं."

"हो हो. तुझं बरं आहे ना सुनेत्रा?"

"अगदीं फर्स्ट क्लास! फक्त पाहुण्यांच्या त्रासानं डोकं चढलं आहे थोडंसं, येवढंच!"

"असं काय बोलतेस ग?"

"खरंच आई. बरं, मला आंघोळ करायची आहे अजून. पण आई, विलासला सांगायला विसरूं नका हं."

"छे ग."

यावर दुसऱ्या टोंकाला टेलिफोन बंद केल्याचा आवाज झाला, व मग सुदेष्णाबाईंनींहि रिसीव्हर जागच्या जागीं ठेवला.

शेजारच्या खुर्चीवर त्या बसल्या, व विचार करूं लागल्या, "काय हा विलासचा खोटेपणा!..."

तितक्यांत टेलिफोन पुन्हा वाजला, म्हणून त्यांनीं पुन्हा रिसी-व्हर उचलून कानाला लावला.

कोणींसें विचारलें,

"हॅलो, विलास?"

"नाहीं, मी, सुदेष्णाबाई. कोण? कल्पना का ग?"

"होय. आई, विलास आहेत का घरांत?"

होय किंवा नाही, काय उत्तर द्यावें तें सुदेष्णाबाईंना न ठरवितां येण्यासारखाच मधांचा टेलिफोनमधला संवाद झाला होता. म्हणून समयसूचकतेनें त्यांनीं उलट विचारलें,

" कां ?"

" नाही, ते घरांत नसले, तर माझा एक निरोप ठेवणार आहे तुमच्याजवळ. सांगाल का ? "

" हो."

" काल संध्याकाळी माझ्याबरोबर सिनेमाला यायचं केलं होतं कबूल त्यांनी. पण आयत्या वेळेस त्यांनीं मला टेलिफोन करून सांगितलं, की सुनेत्राचे वडील त्यांना न्यायला आले आहेत, म्हणून येतां येत नाहीं. माझी फार निराशा झाली आई !"

" काय करावं आमच्या विलासला ?"

" तेव्हां त्यांना सांगा, कीं आज संध्याकाळीं तरी चुकतां कामा नये सिनेमा. "

" बरं बरं. सांगेन हं. "

असें म्हणून सुदेष्णाबाईंनीं संभाषण बंद केलें.

बसल्या जागेवरून त्यांना उठवेना.

विलास या मुलींशीं वागण्यांत इतका खोटेपणा करीत असेल, अशी त्यांची कल्पना नव्हती

विलासच्या ज्या मैत्रिणी त्यांच्या स्वतःच्या थोड्याफार परिचयाच्या झाल्या होत्या, त्या सर्वांत सुनेत्रा व कल्पना या दोघीं-विषयीं त्यांचें विशेष चांगलें मत झालेलें होतें. त्या दोघींपैकीं कोणींतरी एक केव्हांतरी आपली सून म्हणून आपल्या घरांत येईल, अशी त्यांना आशा होती; व एकदोन प्रसंगीं झालेल्या संभाषणांत विलासनें जरी त्यांना चमत्कारिक उत्तरें दिलीं होतीं, तरी तेव-ढ्यावरून त्यांनीं ती आशा सोडून दिली नव्हती. त्यांना वाटे, आज नाहींतर उद्यां, विलासला लग्न करावेंसें वाटेल, व मग त्याचें मन सुनेत्रा व कल्पना या दोघींपैकींच कुणातरी एकीवर जडेल.

पण, आज मात्र त्यांच्या या आशेला चांगलाच धक्का बसला; व ज्यायोगें तो धक्का बसला, तो प्रकार त्यांच्या बुद्धीला समजेनासा असल्यामुळें, त्याच्या आघातानें त्या विशेषच भांबावून गेल्या. त्या विचार करूं लागल्या,

"विलास या मुलींशीं असं कां बरं वागतो? त्याला त्यांचं कांहींच आकर्षण वाटत नाहीं?... मागं एकदां तो काय बरं म्हणाला होता?... या साऱ्या कचकड्याच्या भावल्या?.... कचकड्याच्या भावल्या! म्हणजे काय?"

---

# प्रकरण २ रें

टेनिस-टूर्नमेंटमधील मोठा चुरशीचा सामना असल्यामुळें त्या दिवशी संध्याकाळीं कोर्टावर मनस्वी गर्दी झाली होती. प्रेक्षकांसाठीं मुद्दाम तयार केलेल्या अवाढव्य स्टँडवर तर एकहि जागा रिकामी राहिली नव्हतीच, पण स्टँडच्या समोरच्या उन्हांतली जागाहि माणसांनी फुलून गेली होती. प्रेक्षकसमुदायांत स्त्रियांचा मोठा भरणा होता. त्यामुळें त्यांच्या विविध रंगांच्या साड्यांनीं आणि झग्यांनीं एकंदर दृश्याला विशेष मोहकपणा आला होता. टेनिसचें कोर्ट इतकें स्वच्छ केलेलें दिसत होतें कीं, त्यावर मोजक्या अंतरानें आंखलेल्या पांढऱ्याशुभ्र पट्टयांची मर्यादा मान्य करून खोडकर स्वभावाच्या वाऱ्यानेंहि तेथें धूळ उडवूं नये. कोर्टाच्या दोन्ही बाजूंस खाकी कपडे आणि तांबड्या टोप्या घालून चेंडू फेंकणारीं मुलें जय्यत तयार होऊन उभीं होती, त्यांपैकी एकजण दुसऱ्याच्या छातीवरील बिल्ला आपल्या थुंकीनें साफ करीत होता. व्यवस्थापक मंडळी आपल्या बुटांचा पाय कोर्टावर चुकूनसुद्धां पडणार नाहीं, अशी दक्षता ठेवून लगबगीनें इकडे तिकडे हिंडत होती, व मधूनच एकमेकांच्या कानांत कुजबुजत होती. त्यांच्यांतील एक ठेंगणा मनुष्य आपल्या जाकिटाच्या खिशांतील घड्याळ पुनःपुन्हा काढून त्याकडे पहात होता. वरचेवर असें करण्याऐवजीं त्यानें कायमचेंच तें घड्याळ हातांत कां धरलें नव्हतें, हें एक त्याचें त्यालाच माहीत ! बाकी घड्याळाकडे पुनः-पुन्हा पहाण्याचा चाळा तोच एकटा करीत होता असें नव्हे. प्रेक्षकांच्या गर्दीतील स्त्रीपुरुषांचाहि तोच चाळा चालला होता. जो तो वरचेवर आपल्या मनगटावरील घड्याळ पहात होता, किंवा शेजारच्या व्यक्तीचें घड्याळ पहावयास मागत होता. मॅचमध्यें विलास यशस्वी होणार कीं त्याच्याविरुद्ध खेळणारा टोमो नागा नांवाचा

जपानी खेळाडु यश मिळवणार, याबद्दल प्रेक्षकांत जिकडे तिकडे कुजबूज चालली होती. कमींत कमी दोनअडीचशें जपानी स्त्रीपुरुष मॅच पहावयास आले होते; त्यांनीं त्या स्टॅंडवर एक स्वतंत्र वसाहत केल्यासारखें दिसत होतें. ती मंडळी बसली होती, त्या भागाकडे पहातांच स्त्रियांच्या रंगीबेरंगी पायघोळ वस्त्रावरील उडत्या फुलपांखरांच्या अगर उमलत्या फुलांच्या आकृति, जपानी पद्धतीनें वळविलेल्या आणि बांधलेल्या विपुल केशभारांवरील कंगवे, आणि हातांत सारखे हालणारे चित्रविचित्र रंगांचे पंखे नजरेंत भरत होते. त्या स्त्रीपुरुषांचे आपसांतलें बोलणें अर्थातच असें होतें कीं, टोमो नागा जिंकणार. ती कुजबूज करतांना ते स्त्रीपुरुष पुनःपुन्हा हंसत त्या वेळीं त्यांच्या रुंदट दांतांवर बसविलेलें सोनें उन्हांत चमके, तें मोठें गमतीदार दिसे. दक्षिणी आणि गुजराथी मंडळींत जो तो विलासविषयी अभिमानानें बोलत होता, आणि तसें बोलतांना स्त्रियांच्या चेहऱ्यावर उत्साहाची छटा विशेषच चमकत होती. जणु त्या तोंडानें जरी विलासच्या खेळण्यांतल्या चातुर्याबद्दल बोलत होत्या, तरी मनांतल्या मनांत त्याच्या असामान्य देखणेपणाबद्दल त्या विचार करीत होत्या.

विलासला स्वतःला अर्थातच या कसल्या गोष्टीची या वेळीं दाद नव्हती.

ड्रेसिंग रूममध्यें तो आपला मॅच खेळण्याच्या वेळचा जामानिमा करण्यांत गुंतला होता. आरशापुढें उभें राहून तो आपल्या केंसांचा भांग काढीत होता. तें करताना परीटघडीच्या शुभ्र गॅंजिफरॉकच्या आंखूड बाहृयांतून त्याच्या गोऱ्यापान दंडाचे स्नायु मागेंपुढें होतांना त्याला आरशांत दिसत होते, व त्यांकडे पाहून तो मनाशीं मोठा खुषींत होता. आपल्या अगच्या शरीरसामर्थ्याचा प्रत्यय कोणत्या पुरुषाला उल्हसित करणार नाहीं ?

त्यानें कंगवा आणि ब्रश खालीं ठेवला, आणि आनंदभरानें शीळ घालीत आपल्या तीनचार रॅकेट्स् हातीं घेण्यासाठीं तो आरशापासून दूर झाला.

तितक्यांत जिमखान्याचा एक शिपाई दार लोटून आंत आला, व सलाम करून म्हणाला,

" साहेब–"

विलासला वाटलें, मॅचची वेळ झाली हें सुचविण्यासाठीं व्यवस्थापकानें त्याला पाठविलें असावें. म्हणून तो म्हणाला,

" वेळ झाली, माहीत आहे मला. जा तूं."

शिपाई म्हणाला,

" वेळेबद्दल नाहीं साहेब. बाहेर एक बाई आल्या आहेत, त्या तुम्हाला भेटायला मागतात."

" बाई ?" असें म्हणून विलासनें कपाळाला आंठ्या घालून विचारलें, " कोण बाई ? तूं सांगितलं कां नाहींस या वेळीं मला कुणालाहि भेटतां येत नाहीं म्हणून ? '

" सांगितलं साहेब. पण त्या कांहीं केल्या जात नाहींत."

" नांव विचारलंस ? "

" नाहीं साहेब. पण त्या देखण्या आहेत."

त्या उत्तरानें विलासला हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाला,

" महामूर्ख आहेस तूं ! "

मग विलासनें आपला रेशमी स्कार्फ गळयाभोंवतीं लपेटला, कोट चढविला, सिगारेट शिलगाविली, आणि सगळया रॅकेट्स् गोळा करून निघाला.

त्यानें दाराबाहेर पाऊल टाकलें, तों तेथें सुनेत्रा उभी असलेली त्याला दिसली.

तिनें दोन पावलें पुढें टाकलीं, व हास्य करीत आपला उजवा हात किंचित् पुढें केला.

विलासनें तो हातीं घेतला, पण त्या वेळीं त्याच्या तोंडावर हास्य चमकलें नाहीं. तोंडांतली सिगरेट दूर न करतां त्यानें बोबडया शब्दांत विचारलें,

" इथं भेट घ्यायची मासी ? वेड लागलं काय तुला ? "

" लागलं नाही. पण तुमच्या निष्ठुरपणानं लवकरच लागेल मात्र ! "

" निष्ठुरपणा ? मीं काय केला बुवा निष्ठुरपणा ?"

असें बोलतांना त्यानें तोंडांतच ठेवलेल्या सिगारेटचे पुढचें जळतें टोंक अक्षरागणिक वरखाली झाले.

सुनेत्रा म्हणाली,

" छे छे ! तुम्हीं कुठं केला आहे निष्ठुरपणा ? फार ममताळु तुम्ही हो ! माझी अन् तुमची भेट झाल्याला किती दिवस झाले, माहीत आहे का ?"

" मी नाहीं मोजले बुवा ! माझा गणित विषय अगदीं कच्चा आहे. "

" करा, करा चेष्टा. दुसऱ्याचा जीव चालला तरी–"

इतकेंच बोलून सुनेत्रानें हुंदका दिला, आणि रुमाल डोळ्यांना लावला.

त्या रुमालांतला सुगंध एकदम हवेंत दरवळला. विलासचें लक्ष तिच्या अश्रूपेक्षां त्या सुगंधाकडेच गेले कीं काय, कुणास ठाऊक, तो स्तब्धच उभा राहिला.

तो कांहींतरी बोलेल, अशा अपेक्षेने थांबलेल्या सुनेत्रानें वर मान करून रागानें त्याच्याकडे पाहिलें, तेव्हां विलासला तिच्या शब्दांचें स्मरण झालें. त्यानें विचारलें.

" अग, पण जीव चालला म्हणजे काय ? काय वाटेल तें काय बोलते आहेस ?"

" हो– हो ! वाटेल तें खरंच ! मला वाटतं, मी मेलें तरीसुद्धां–"

" स्! सुनेत्रा ! या ठिकाणीं तुला सीन का करावयाचा आहे ? मला मॅच जिंकायची आहे, तुझ्या लक्षांत नाहीं ? माझं मन ह्या वेळीं प्रसन्न पाहिजे "

सुनेत्राच्या मनांत आलें, " हीच हीच यांची दुसऱ्याला निरुत्तर करण्याची ठरलेली चतुराई ! हिनंच मोह घालतात हे. " तिनें मोठ्यानें म्हटलें,

" तें मला माहीत आहे. मला एक वचन द्या, म्हणजे मी आनंदानं जातें."

" हो हो, दिलं वचन. जा, बैस आपल्या जागी जाऊन."

" इश्श, पण मीं कोणत वचन मागतें, ते कधी ऐकलंत ?"

" हो खरंच. विचारायचं विसरलोंच. सांग ?"

" मॅच संपल्याबरोबर आमच्या गाडींतनं आमच्या बंगल्याकडे आलं पाहिजे."

" All right, all right, run up now. Please. ( अच्छा, अच्छा. पळ पाहूं आतां.) "

सुनेत्रा आनंदभरानें तेथून गेली.

इतका वेळ आंत राहिलेला शिपाई दार लोटून बाहेर आला व साहेबांचें आणि त्यांच्या मैत्रिणीचें झालेलें भाषण आपण ऐकल्याचा संशयसुद्धां साहेबाना येऊं नये, म्हणून जणू आपण कामाला जातों आहोंत, अशी बतावणी करण्यासाठीं पळाला.

विलासने संपत आलेली सिगारेट टाकून दिली, आणि तितक्यांत पलीकडच्या ड्रेसिंग रूममधून त्याचा खेळण्यातील प्रतिस्पर्धी टोमो नागा बाहेर आला. त्याला पाहून त्यानें मोठ्यानें म्हटलें,

" Hullo. Ready ?"

टोमो नागा जवळ येताच विलासने त्याचा हात प्रेमभरानें पकडला, व मग ते दोघे खेळाडू जेव्हां हातात हात घालून खेळण्याच्या जागीं प्रविष्ट झाले, तेव्हां सर्व प्रेक्षकांनी टाळयांचा कडकडाट केला.

नंतर पांचच मिनिटांत खेळ सुरू झाला.

दोघां खेळाडूंच्या रॅकेट्सचे झणत्कार व्हावयास लागले; पांढरे शुभ्र चेंडू तीरांसारखे इकडून तिकडे व तिकडून इकडे सुटू लागले; आणि खुर्चीवर बसलेल्या अंपायरचा आवाज ऐकू येऊं लागला,

"Thirty all... Thirty forty... Game... Game for Tomo Naga."

विलासला काय झालें होतें, कुणास ठाऊक! पण त्याचा खेळ कांहीं केल्या जमेना, एवढें खरें! प्रतिस्पर्ध्याला हमखास चकविणारे त्याचे नेहमींचे तडाखे पुनःपुन्हा चुकत होते. त्यानें मारलेले चेंडू मर्यादेपलीकडे तरी जात, किंवा मध्येंच जाळ्यामध्यें तरी अडकून पडत. त्याच्याविषयी प्रेम व सहानुभूति बाळगणाऱ्या प्रेक्षकांच्या मुद्रेवर चिंता दिसूं लागली. विलासनें स्वतः पहिला सेट मिळविण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला, पण अखेर तो त्याच्या हातून गेलाच.

प्रेक्षकांतील जपानी स्त्रीपुरुषानी टोमो नागाला शाबासकी देण्यासाठी टाळ्यांचा गजर केला; व चीत्कार केल्यासारखे विलक्षण आवाज काढले तेव्हां त्यांनीं इंग्रजी शब्द उच्चारले की जपानी शब्द उच्चारले, तें एक भगवान बुद्धालाच माहीत!

विलासच्या चहात्यांना फार खेद झाला, व जपानी लोकांच्या त्या उल्हासाची चीड आली.

कोणीसें शेजारच्या इसमाला मोठ्यानें म्हटलें.

"काय माकडं हंसताहेत पहा! पण शेवटीं रडावं लागेल तेव्हां समजेल!"

शेजारचा इसम म्हणाला,

"पण विलास खेळला पाहिजे रे."

"तो खेळणार; मी सांगतों तुला. स्वारी ऐटीनं हंसते आहे; बघ तरी."

खरोखर विलास हंसत होता.

मधल्या विश्रांतींत ग्लासांतल्या सरबताचे चार घोंट घेऊन एका लठ्ठ टर्किश टॉवेलनें तो आपला घाम पुशीत होता, व प्रसन्न मुद्रेनें स्वतःशींच हंसत होता.

तितक्यांत चेंडू फेंकणाऱ्यांपैकीं एका मुलानें त्याला एक चिठी आणून दिली. किंचित् आश्चर्यानें त्यानें ती उघडून पाहिली चिठींत लिहिलें होतें,

"Buck up my boy! Don't worry. Your Elsie
(धीर धर, फिकिरीचं कांहीं कारण नाहीं.— तुझी मैत्रीण, एल्सी.)

तो मजकूर वाचून विलासच्या चेहऱ्यावरील हास्य अधिकच प्रफुल्लित झालें. त्यानें चिठी आणून देणाऱ्या पोऱ्यास विचारलें,

" कुणीं दिली रे ही चिठी तुझ्याजवळ ?"

पोऱ्यानें बोट दाखविलें.

विलासनें वळून पाहिलें, तों खरेंच कडेच्या खुर्च्यांच्या पहिल्याच रांगेंत एल्सी बसली होती.

तिनें आपला रुमाल हालवून हास्य केलें, व तिचे लालभडक ओठ हालले, त्यावरून विलासनें तिच्या अस्फुट शब्दांचा तर्क केला.

विलासनें हास्य करून जी नेत्रपल्लवी केली, तिचा उघड अर्थ असा होता कीं, " बघ तरी आतां कसं खेळतों तें."

दुसरा सेट सुरू झाला.

फटके फाड फाड वाजूं लागले.

टाळ्यांच्या लहरी उसळूं लागल्या.

अंपायरचा खोल, गंभीर आवाज पुन्हा ऐकूं येऊं लागला—

" Thirty love.. forty love... game...game for Vilas."

टाळ्यांचा गजर झाला.

त्या सर्व समुदायांत टाळ्या न वाजवणारी एकच व्यक्ति होती.

ती म्हणजे सुनेत्रा.

ज्या गोऱ्या मुलीशी विलासनें नेत्रपल्लवी करून हास्य केल्याचे तिनें मघांशीं पाहिलें होतें; तिच्याकडे ती सारखी रोखून पहात होती

त्या मुलीनें तांबड्या जांभळ्या ठिपक्यांचा पांढरा रेशमी झगा घातला होता, आणि तसल्याच ठिपक्यांच्या कापडाची टोपी डोक्यावर तिरपी बसविली होती. त्या टोपीनें तिचे उजव्या बाजूचे केंस बहुतेक झांकले गेले होते, पण डाव्या बाजूच्या लालसर सोनेरी झुलपांचा विपुल भार तिच्या गोंऱ्यापान मानेपर्यंत रुळत होता. तीं झुलपें ती मुलगी आपल्या डाव्या हाताच्या पंजानें पुनःपुन्हा चाचपी, तेव्हां रंगवून लाल केलेलीं तिचीं नखाग्रें आणि तिच्या आंगठींतील टपोरा लाल खडा उन्हांत चमकलेला दिसे.

**ही कोण मुलगी असावी ?...**

**आणि विलासची हिच्याशीं कोणत्या प्रकारची ओळख असावी ?...**

हजारों स्त्रीपुरुषांच्या देखत तिनें विलासला रुमाल उडवून दाखवावा, आणि विलासनें उलट तिच्याकडे पाहून हास्य करावें, हें सुनेत्राला अगदी आवडलें नाहीं.

विलासच्या त्या प्रसन्न हास्याबद्दल सुनेत्राला विलक्षण मत्सर वाटला इतक्या लोकांच्या देखत विलासनें अशा हास्याचा वर्षाव आपल्यावर केला असता का, असा प्रश्न तिच्या मनांत उत्पन्न झाला. मात्र. त्यानें तसा हास्यवर्षाव आपल्यावर केला असता तर त्याची आपल्याला लाज वाटली नसती का. असाहि उलट प्रश्न तिच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

विलासनें तिला कधी तरी म्हटलेलें आठवलें, कीं "तुम्ही हिंदु मुली कितीहि सुशिक्षित झालांत, तरी मिथ्या विनयाचीं जीं असंख्य आवरणं तुमच्याभोंवती लपेटलेली आहेत, त्यांचा भेद करणं तुम्हांला शक्य नाहीं. त्यांतून तुम्ही बाहेर कधीं निर्भयपणानं डोकावणार नाहीं. तुमच्यावर ज्याला प्रेम करायचं असेल, त्यानंच उलट तुमच्याभोंवतालच्या या कोशांतून आंत शिरून चोरटेपणानं तुमची गांठ घेतली पाहिजे. आपल्याला नाहीं बुवा असा चोरटेपणा साधायचा. खऱ्या प्रेमाचा पहिला गुण मी हा समजतों, कीं तें करणाऱ्याला त्याचं सर्वस्वीं भूषण वाटलं पाहिजे, आणखी जगापासून तें लपविण्याची यत्किंचित्‌हि गरज त्याला वाटतां कामा नये..."

विलासच्या या उद्‌गारांची आठवण करीत सुनेत्रा त्या गोऱ्या मुलीकडे सारखी टक लावून पहात होती.

विलासला हवें तसें प्रेम या मुलीनें त्याला दिलें होतें कीं **काय ?....**

**कोण बरें असावी ही मुलगी ?....**

पण त्यानें पाहिलें तिला आनंद झाला, व पुढें होऊन तिनें विचारलें,

"येणार ना आमच्या बंगल्यावर ?"

"हो, जाऊं या."

असें म्हणून विलासनें त्या भोंवतालच्या मंडळींचा निरोप घेतला.

रस्त्यावर येऊन विलास व सुनेत्रा सुनेत्राच्या मोटारींत बसत होतीं, इतक्यांत मागून कोणींतरी येऊन विलासच्या पाठीवर थाप मारली, व म्हटलें,

" Congratulations ! (शाबास)"

विलासनें वळून पाहिलें.

थाप मारणाऱ्या त्या तरुणानें विचारलें,

"ओळखलंस का नाहीं ?"

विलासनें त्या तरुणाच्या चेहऱ्याकडे क्षणमात्र गोंधळलेल्या नजरेनें पाहिलें, पण लगेच हर्षभरानें त्याचा हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन गदगदां हालवीत म्हटलें,

"ओ हो ! शरच्चंद्र काय ?"

"ओळखलंस म्हणायचं ?"

"म्हणजे माझी स्मरणशक्ति अगदींच टाकाऊ आहे, अशी तुझी कल्पना आहे कीं काय ? आज पांच वर्षांनीं तुझी भेट होत असली तरी ज्याच्याबरोबर टेनिसचे कित्येक चुरशीचे सामनें खेळलों, त्या तुला मी विसरेन काय ?"

"त्याचा काय नेम बाबा ? बड्या अंमलदाराचा तूं मुलगा ! विलायतेस जाऊन एंजिनियरिंगची मोठी पदवी घेऊन आलेला ! तेव्हां—"

"मग तूं काय कमी बडा आहेस वाटतं ?"

असें विचारून विलासनें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं; व सुनेत्राची व आपल्या जुन्या स्नेह्याची आपण ओळख करून दिली

नाहीं, हें तितक्यांत त्याच्या लक्षांत आल्यामुळें तिच्याकडे मान दर्शवून त्याला म्हटलें,

" माझी मैत्रीण, सुनेत्रा. हा माझा जुना मित्र, शरच्चंद्र. हां... तूं कोण आहेस म्हणून सांगूं रे शरच्चंद्र ? माफ कर, पण मलाच कांहीं पत्ता नाहीं. सांग, कुठं असतोस ? काय करतोस ?"

शरच्चंद्र हंसला, व स्तब्ध राहिला.

विलासनें पुन्हा विचारलें,

" नुसता हंसतोस काय ? सांग ना ? काय उद्योग करतोस ?"

शरच्चंद्र पुन्हा हंसला, व पुन्हा म्हणाला,

" तुरुंगांत जायचा उद्योग करतों !"

" म्हणजे काय रे ? . चळवळींत पडला आहेस कीं काय ?... तरीच तुझ्या पोषाखांत एवढा फरक पडला आहे ! असं काय ?..."

शरच्चंद्रानें विचारलें,

" आतां माझी तुला भीति वाटायला लागली असेल ?"

" ती कां बुवा ?"

" मी ज्यांच्या ज्यांच्याशीं बोलतोंचालतों, त्यांचं नांव काळ्या यादींत गेल्याशिवाय रहात नाहीं. आमच्या छोटयाशा मित्रमंडळावर सरकारची चांगलीच मेहेरबानी आहे."

" म्हणजे, तुमचं मित्रमंडळ आहे तर ?"

" हो. आणि त्या मंडळाची एक अधिष्ठात्री देवताहि आहे."

" असं ? काय तिचं नांव ?"

" आशा !"

विलासनें मनाशीं " आशा !" " आशा " असें तें नांव दोनदा उच्चारलें. जणुं तें त्याला मोठें गमतीचें वाटलें.

पण मग लगेच तो शरच्चंद्राला उघड म्हणाला,

" तुमचं मित्रमंडळ मोठं गमतीचं असेल, नाहीं ?"

" वा ! आम्ही फार गंमत करतों. आम्ही निरनिराळीं बुकं वाचतो, वाचून दाखवतों, लेख लिहितों, एकमेकांशीं भांडतों, सभा भरवतों, मिरवणुकी काढतो, तुरुंगांत जातों– मजा मजा करतों आम्ही. "

शरच्चंद्राचे तें बोलणें ऐकताना विलासच्या चर्येवर होणारी हालचाल पहावीसें सुनेत्राला वाटलें. विलासची मजेची कल्पना काय आहे, तें तिला माहीत होतें; आणि त्याचा आज अकल्पितपणें भेटलेला हा जुना मित्र ज्या मजेचें वर्णन करीत होता, ती विलासच्या कल्पनेशीं सर्वस्वीं विरुद्ध होती. तिनें विलासच्या चर्येकडे अगदीं निरखून पाहिलें

पण ज्या तऱ्हेच्या मुद्रेची तिने अपेक्षा केली होती, त्या तऱ्हेची विलासची मुद्रा झाली नाहीं उलट विलासने शरच्चंद्रास म्हटलें,

" अरे वा वा ! तुझं हें वर्णन ऐकून तुझी अन् तुझ्या मित्रमंडळींची ओळख करून घ्यावीसं वाटायला लागलं आहे बुवा मला ! "

" केव्हांहि करून देईन ओळख केव्हा येतोस ? आतां चलायचं आहे ? "

सुनेत्राच्या छातींत एकदम धस्स झालें. तिला भय वाटलें, की विलास आता आपल्या हातून सुटणार, आणि शरच्चंद्राबरोबर जाणार. विलास काय लहरीपणा करील तें कोणी सांगावें ?

तिला रहावलें नाहीं. तिनें आपल्या मनगटावरील घड्याळांत पाहिलें, व हलकेंच विलासला म्हटलें,

" सव्वासात व्हायला आले बरं का. "

विलासनें तिच्याकडे पाहून मान हालविली, आणि शरच्चंद्रास म्हटले,

" आत्ता नको. यांच्याबरोबर गेलंच पाहिजे मला. "

" अच्छा. पण ये जरूर केव्हां तरी हं ! "

" O, yes, ! O, yes ! "

" असें म्हणून विलासनें शरच्चंद्राशीं पुन्हा प्रेमभरानें हस्तांदोलन केलें, आणि वळून सुनेत्राला म्हटलें,

" चला, जाऊं या."

तीं दोघें मोटारींत चढलीं, व मोटार चालू झाली.

गाडीचा वेग वाढला, तेव्हां संध्याकाळच्या गार वाऱ्याचे झोत सुनेत्राच्या व विलासच्या अंगावरून विशेषच जोरानें वाहूं लागले. त्यांच्या गाडीच्या पुढच्या बाजूस कितीतरी मोटारगाड्यांची रांगच्या रांग लागली होती. त्यांतील स्त्रीपुरुषांच्या गाठमोऱ्या आकृति प्रकाशाविरुद्ध घेतलेल्या छायाचित्राप्रमाणें दिसत होत्या. डाव्या बाजूनें धाड्धाड् आवाज करीत जाणाऱ्या आगगाड्यांतील माणसांच्या चेहऱ्याचा मिश्र थवाच्या थवा दिसत होता व लगेच अदृश्य होत होता. दूरच्या क्षितिजरेषेच्या वरच्या बाजूस तऱ्हेतऱ्हेच्या तांबूस रंगांचे लहानमोठे शिड्कावे उडाले होते.

तें सारें दृश्य पाहून सुनेत्रा आनंदित झाली, आणि आपण आज अखेर विलासला गांठलें, व त्याला घेऊन आपण आपल्या बंगल्यावर चाललों आहोंत, या विचारानें तिच्या आनंदाला विशेषच भरती आली.

विलासचें लक्ष मात्र तिच्या त्या आनंदाकडे होतें कीं नाहीं कुणास ठाऊक !

---

# प्रकरण ३ रें

---

विलास फार दिवसांनीं आपल्या घरीं आला आहे, तेव्हां तो घटका दोन घटका तरी आपल्याशीं बोलत बसेल अशी सुनेत्राची अपेक्षा होती. म्हणून बंगल्यावर पोंचतांच तिनें ड्रायव्हरला सांगितलें,

" तू आतां गेलास तरी चालेल. साडेआठ वाजतां यांना यांच्या बंगल्यावर परत पोंचवायचं आहे हें लक्षांत ठेव म्हणजे झालं. "

परंतु विलास तिला म्हणाला,

" शाबास ! म्हणजे एक तासभर मला इथं कोंडून ठेवायचा विचार आहे कीं काय तुझा ?"

हें त्याचें बोलणें सुनेत्राला अगदीं मर्मभेदक वाटलें. थट्टेनें का होईना, पण आपल्या सहवासाला विलासनें कोंडण्याची शिक्षा म्हणावें याचें तिला दुःख झालें. तिच्या मनांत आलें, ' मग आलांत तरी कशाला ? जा परत !' असें म्हणून आपला राग व्यक्त करावा. पण तसें म्हटल्यावर तो खरोखरीच निघून जाईल अशी तिला भीति वाटली. कारण विलासनें तसें वर्तन केल्याचे एक दोन प्रसंग तिला पक्के आठवत होते. म्हणून, बोलणें थट्टेवारीं नेणेंच अधिक बरें असा विचार करून ती म्हणाली,

" मी पुष्कळ कोंडून ठेवीन, पण तुम्ही रहाल तेव्हां ना ? चहा तरी घेणार आहांत का नाहीं ?"

" चहा काय मला क्लबवर मिळत नव्हता होय, म्हणून इकडे आणलंस ?"

" तुम्हांला मिळाला असता चहा, पण आमच्या घरचा चहा देण्याचं समाधान मला कसं मिळालं असतं ?"

" असं. एकूण स्वार्थी हेतूनंच मला इथं आणलं आहेस तर ?"

"हो हो, तसं का होईना? चला, आंत चला. मोटार उभी राहील; काळजी नका करूं."

असें म्हणून सुनेत्रा दिवाणखान्यांत शिरली, व विलास तिच्या मागोमाग गेला.

सुनेत्राला वाटलें, आपण मोठ्या चतुराईनें बोलून भांडणाची वेळ टाळली. ती आंत चहा आणावयासाठीं गेली ती मोठ्या प्रसन्न मनानें गेली.

पण तिची ही प्रसन्नता फार वेळ टिकली नाही.

कारण, ती आणि विलास दोघें दिवाणखान्यांत एकटीच होतीं तोंपर्यंत विलास बऱ्याचशा उल्हासानें तिच्याशीं बोलत होता हें जरी खरें, तरी कांहीं वेळानें तिची आई आणि वडील तेथें येऊन बसताच विलासची चर्या एकदम पालटून किंचित् त्रासल्यासारखी दिसूं लागली हें तिच्या सहज लक्षांत आलें. आतां विलास फार वेळ रहाणार नाहीं हें तिला स्पष्ट दिसलें, व त्याला रहावेंसें वाटावें असा एकहि उपाय आपल्या हातीं नाहीं असेंहि तिच्या मनांत आलें.

कारण, विलास तिला अनेक वेळां म्हणाला होता,

"या वडील माणसांची मला फार चीड येते. तरुणं माणसं एकान्तांत बसलीं, कीं तिथं आल्यावांचून यांना जसं राहवतच नाहीं! आम्ही मुलींना खाऊन टाकूं असं यांना वाटतं कीं काय कुणास ठाऊक?"

या त्याच्या बोलण्यावर काय आणि कसें उत्तर द्यावें हें सुनेत्राला कधींच कळलें नव्हतें; व मग दर वेळेस विलासच पुढें म्हणाला होता,

"आणखी तुम्हां मुलींचाहि मला कमी राग येतो असं नाहीं. तुम्हांला सुद्धां आई, बाप, मामा, मामी कुणीतरी भोंवतीं असावंच लागतं. आमचा एकान्त सहवास तुम्हांला मनांतनं हवा असतो पण, तो हवा म्हणायचं धैर्य कुठं असतं तुम्हांला? तुमचे राग,

द्वेष, प्रेम– सगळया भावना दडपलेल्या, खुरटलेल्या ! धिटाईनं पूर्ण वाढलेली एकहि हिंदू मुलगी आमच्या समाजांत मला दिसत नाहीं. ..”

हें विलासचें बोलणें सुनेत्राला या वेळी आठवलें, व ती अस्वस्थ झाली.

आणि तिचे वडील जेव्हां विलासशी त्याला नको त्या विषयावर संभाषण उकरून काढण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां तर तिची अस्वस्थता अधिक वाढली.

कांहीं लोकांना वर्तमानपत्रांत वाचावयास मिळणाऱ्या चालू राजकीय अथवा इतर घडामोडींची जो भेटेल त्याच्याशी चर्चा करण्याचें व्यसन असतें त्या चर्चेंतून काही सार काढून त्याप्रमाणें त्यांना आपलें स्वतःचें वर्तन ठरवावयाचें असतें असें नव्हे; तर केवळ जिभेची मिरमीर शमविण्यासाठी, आणि चालू वादाच्या दोन्ही पक्षांतील मोठमोठ्या पुढाऱ्यांना जें कळत नाही तें आपल्याला कळतें असें दाखविण्यासाठी त्यांना वादविवाद हवा असतो. सुनेत्राचे वडील अशा लोकांपैकीच होते. ते विलासला विचारूं लागले,

“परवां नागपूरच्या काँग्रेसमधें बहिष्कारत्रयी पुकारण्यांत गांधीनं मोठी चूक केली असं नाही तुम्हांला वाटत ?”

विलासनें खिशांतली सिगरेटची पेटी काढीत म्हटलें,

“तुमच्या बोलण्यावरनं मला प्रथमच कळतं आहे, कीं यंदाची काँग्रेस नागपूरला भरली होती !”

या त्याच्या उत्तरावरून योग्य ती गोष्ट न उमजतां सुनेत्राचे वडील म्हणाले,

“मी तुम्हाला खास सांगतों, कीं गांधींच्या या नव्या चळवळीचा देशाला कांहीं एक फायदा होणार नाही. तिचा परिणाम एवढाच होईल, कीं नेमस्त लोकच नव्हे तर गांधींच्या बहिष्काराला जे मान्यता देऊं शकत नाहींत ते जहालसुद्धां राजकारणांतून

आपलं अंग काढून घेतील. म्हणजे काय, देशाच्या एकंदर सामर्थ्याचे तुकडे तुकडे पडतील. सरकारच्या सुद्धां ही गोष्ट ध्यानांत आलेली दिसत नाहीं. उगाचच भेदरून गेला आहे व्हॉइसरॉय, आणि करायला लागला आहे खलबत प्रांतिक सरकारांशीं. मी त्याच्या जागी असतो तर कांहीएक न करतां स्वस्थ बसलो असतों करूं दिली असती गडबड गांधीला वाटेल तेवढी अहो खादीनं का कुठं स्वराज्य मिळालं आहे ? माझ्याजवळ हिंदुस्थानच्या शेतीबद्दल आणखी आर्थिक स्थितीबद्दल इतके आकडे तयार आहेत, की मीं नुसते ते आंकडे कागदावर लिहून तो कागद गांधीपुढें धरला तर त्याला गप्प बसावं लागेल ! तुम्ही असं पहा विलास– "

पण त्यांचें वाक्य पुरें होऊं न देता विलास म्हणाला,

" आत्तां नको, आत्तां नको. पुन्हा येईन केव्हांतरी तुमचं म्हणणं ऐकायला ! मी टेनिसची मॅच खेळून दमून आलो आहे, तेव्हां हा अवघड विषय मला आतां नीटसा समजेल असं वाटत नाहीं. "

" अहो त्यात विशेष अवघड असं कांही नाही. मी तुम्हांला चारच आंकडे सांगतों. "

" अहो पण मला टेनिसमधल्या मार्कांच्या आकड्यांखेरीज दुसरे आंकडे कळताहेत कुठं ? "

" पण मी तुम्हांला अगदी सोपे करून सांगतों ना. अहो, देशांत ही असहकारितेची प्रचंड चळवळ उसळली आहे, तिच्यांत प्रत्यक्ष भाग घेऊं नये, पण उलट सुलट बाजूचे सगळे मुद्दे माहीत असावेत. "

" माफ करा. मला वाटतं, जो आपल्याला भाग घ्यायचा नसेल तर मुद्दे माहीत नसलेलेच बरे ! ज्या गांवाला आपल्याला जायचं नाहीं त्याची चांगली वाट कोणती ती चर्चा करायची कशाला ? "

" छे छे छे छे ! चुकतां आहांत तुम्ही. अहो, गांधीची ही चळवळ तुमच्या आमच्या घरादारांपर्यंत येऊन भिडली आहे आतां. सुनेत्राच्या दोनतीन मैत्रिणींनीं काल कॉलेज सोडलें ना ! हो ना ग ?"

सुनेत्रानें अगदी वाईट चेहरा करून म्हटलें,

" हं. "

तिच्या वडिलाना तेवढा हुंकार पुरे झाला, व ते म्हणाले,

" अन् येवढ्यावरच भागनं आहे समजलांत कीं काय ? एक कोणशी मुलगी तर म्हणे प्रत्येक कॉलेजपुढें जाऊन व्याख्यानं देत आहे. काय तिचं नांव पहा मोठ विचित्र नांव आहे थांबा हं, क्रॉनिकल आणून दाखवतों तुम्हाला. "

" कशाला ? राहू दे. "

असें विलासनें म्हटलें, पण सुनेत्राच्या वडिलाचा जीव कोठला रहायला ? क्रॉनिकल आणायला ते आत गेलेच.

विलासला वाटलें, एकपरी बरें झालें.

तो उठला, व हॅट उचलीत सुनेत्राला म्हणाला,

" मी जातों बुवा आतां "

सुनेत्रा कांहींच बोलली नाही. तिचा चेहरा मात्र अतिशय रडवा झाला होता.

बाहेर व्हरांड्यांत आल्यावर तिने विचारले,

" आतां पुन्हा केव्हां याल ?"

विलासने वळून तिच्याकडे पाहिलं, व म्हटलें,

" कशाला यायचं मला समजतच नाही. राणीच्या बागेत गेलं, की पिंजऱ्यात बसलेले सिंह, वाघ दुरून पाहयला मिळतात तसं आम्ही पुरुषांनी तुम्हा मुलींना पहात उभ रहाव. असं तुझं म्हणणं कीं काय ? आपण नाही बवा उगाच असे पाय थकवून घ्यायला तयार !"

या त्याच्या शब्दानी सुनेत्रा अगदी गोंधळून गेली.

ती फक्त पुटपुटली,

" असं काय करतां ? मी वाट पहात असते तुमची रोज."

यावर विलास काय उत्तर देणार होता कुणास ठाऊक ?

पण नितक्यांत सुनेत्राचे वडील तेथें आले, व विलासला म्हणाले,

" सांपडलं त्या मुलीचं नाव ! आशा ! हा घ्या क्रॉनिकलचा अंक; ठेवा तुमच्याजवळ."

" आशा ?" विलास स्वतःशीच उद्गारला.

कोणीतरी नुकतेंच त्याला हे नाव सांगितलें होतें...

पण त्याला धड आठवेना. मनाशी तो आठवण करीत करीतच तो मोटारमध्यें बसला.

मोटार चालू होणार इतक्यात सुनेत्राचे वडील म्हणाले,

" अहो हा अंक राहिला ना ? घ्या घ्या, वाचा."

असें म्हणून त्यांनी क्रॉनिकल गाडींत टाकलाच.

गाडी चालू झाल्यावर विलास कपाळावर हात चोळीत स्वतःशीं म्हणाला,

" आशा ? आशा ?..."

तितक्यांत वाऱ्याचा मोठा झोत आला, आणि क्रॉनिकलचीं पानें उडून एखाद्या पक्ष्याच्या पंखासारखी पसरलीं व विलासच्या अगदीं अंगाला येऊन बिलगलीं.

विलासनें तीं लगेच दूर ढकलली.

ज्या वृत्तीने त्यानें आजपर्यंतच्या आपल्या आयुष्यांत राजकारणादि गंभीर विषयांचा विचार स्वतःच्या मनाला शिवूं दिला नव्हता त्या वृत्तीचीच त्याची ती कृति द्योतक होती !

त्याने आयुष्याकडे आजपर्यंत सर्वस्वी विलासी वृत्तीनेंच पाहिलें होतें. घरची श्रीमंती असूनहि त्यानें अभ्यासाकडे दुर्लक्ष केलें नव्हतें इतकेंच नव्हे, तर इंग्लंडमध्यें जाऊन एंजिनियरिंगच्या एका विशिष्ट शाखेंत बहुमानाची पदवी संपादली होती हें खरें;

परंतु याव्यतिरिक्त जीवनाच्या गंभीर स्वरूपाकडे त्यानें आपली दृष्टि आजपर्यंत कधींहि जाऊं दिली नव्हती. टेनिससारखे मर्दानी खेळ, मोटारच्या शर्यतीसारख्या धाडशी करमणुकी, नाना प्रकारचे सुखोपभोग, आणि तरुण स्त्रियांचा विहित अगर निषिद्ध सहवास यांतच त्यानें आपले तारुण्यांतील दिवस घालविले होते. आणि चमत्कार असा, कीं या सुखोपभोगांची, विविध प्रकारच्या खेळांची, तरुण पुरुषास ज्याची सहज मोहिनी पडते त्या स्त्रीसहवासाचीहि त्यानें गुलामगिरी पत्करली नव्हती. पटाईत खेळाडूंच्या अंगीं जयापजयाबद्दल साहजिकच एक प्रकारची बेपर्वाई उत्पन्न होत असते. खेळतां खेळतां जो आनंद मिळतो तेवढ्याचीच भूक त्याच्या ठिकाणीं शिल्लक उरते. बाकी कसलीच तो सहसा फिकीर करीत नाही. पुढें आलेला आनंद निर्भयपणें भोगल्यावांचून सोडूं नये आणि अगतिक होऊन कोणत्याहि आनंदाच्या मागें लागूं नये अशी चमत्कारिक मनोवृत्ति सर्वच निष्णात खेळाडूंच्या ठिकाणीं कालांतरानें निर्माण होते कीं काय तें सांगतां येत नाहीं ! पण, विलासच्या ठिकाणीं ती सिद्ध झाली होती येवढें मात्र खरें.

म्हणूनच सुनेत्रा आणि कल्पना यांच्यासारख्या कित्येक मुली त्यांच्याशीं विवाहबद्ध होण्यास उत्सुक असतांनाहि त्यानें लग्न करूं नये, आणि चांगल्या मोठमोठ्या नोकऱ्या त्याला सांगून येत असतांहि त्यानें नोकरी पत्करूं नये, याबद्दल त्याच्या आईबापांना, आप्तेष्टांना व मित्रांना जरी आश्चर्य वाटत होतें तरी त्याला स्वतःला त्यांच्या आश्चर्याचेंच मनस्वी आश्चर्य वाटत होतें. जीविताकडे खेळकर आणि खोडकर वृत्तीने पहाण्याची त्याची वृत्ति होती. इतरांना आपल्या वृत्तीचा कितीहि विस्मय वाटला तरी ती वृत्ति आपल्याला कधीं सोडतां येईल असें त्याला वाटत नव्हतें. ज्या खेळांची, साहसांची, आणि उपभोगांची त्याला आवड होती त्यांतून आपलें चित्त काढण्याची त्याची इच्छा नव्हती. आणि या व्यतिरिक्त इतर गोष्टी इतरांच्या दृष्टीनें कितीहि महत्त्वाच्या

असल्या, तरी त्या आपलें चित्त वेधूं शकतील अशी त्याची अपेक्षा नव्हती. राजकारणादि गंभीर विषय त्यानें नेहमी दूर ठेवले होते व पुढेंहि दूरच ठेवण्याचा त्याचा बेत होता.

म्हणूनच आत्तां त्याच्या हाताची सहज अहेतुक हालचाल होऊन अंगाला चिकटणारीं क्रॉनिकलची पानें त्यानें दूर सारलीं.

त्यानें सिगरेट पेटवली आणि मनाशी विचार सुरूं केला—

उद्या काय काय बरे करावयाचें? हो; सकाळीं जरा लवकर उठलें पाहिजे. पुढच्या तेवीस तारखेला मोटार– सायकलची शर्यत व्हावयाची आहे ना? तेव्हां आपली नवी मोटरसायकल आपल्या मांडीखालीं चांगली घटवून ठेवली पाहिजे. उद्यां सात ते नऊ हा कार्यक्रम ठरला. त्यानंतर काय बरें? हो, उद्यां रविवार नाहीं का? कुलाब्याच्या पोहण्याच्या तलावावर भेटावयाचें कबूल केलें आहे आपण एल्सीला. पोहल्यानंतर दुपारच्या जेवणासाठीं तिच्या खोलीवर जायचेंहि आपण कबूल केलें आहे. तेथून परत आल्यावर काढूं सपाटून झोंप. मग चार वाजतां टेनिस, आणखी....

इतक्यांत मोटार बंगल्यांत शिरली, आणि विलासची विचारमालिका तुटली.

बंगल्यांत शिरतांच सुदेष्णाबाई त्याला म्हणाल्या,

"कल्पना इतका वेळ वाट पाहून गेली. किती वेळ केलास रे?"

विलास म्हणाला,

"आई, मला सपाटून भूक लागली आहे. आज काय काय केलं आहे आचाऱ्यानं? तुझा तो कांद्याचा आणि टोमॅटोचा रस्सा केला असेल कीं नाहीं, तर मी एकटा सगळा संपवणार! आणखी प्रथम थंड पाण्यानं मला भरपूर स्नान करायचं आहे बुवा. आई, मीं टेनिसची मॅच जिंकली बरं का."

" अरे कल्पनेनं सांगितलं आहे– "

" आई, मला आंघोळीला पाणी अगदी खूप पाहिजे हं ?"

असें म्हणून विलास धावत जिन्याच्या पायऱ्या चढून वर गेला सुद्धां.

आपण टेनिसमध्यें केलेल्या पराक्रमाचें आपल्या आईला कांहींच कौतुक वाटूं नये याचें मनाशीं किंचित् आश्चर्य करीत त्यानें हातांतल्या रॅकेट्स ठेवल्या, आणि पोषाख उतरण्यास प्रारंभ केला !

आपण कल्पनेबद्दल काय सांगत होतो ते आपल्या मुलानें धड ऐकूनहि घेऊं नये याचें सुदेष्णाबाईंस विलक्षण आश्चर्य वाटलें. त्या खिन्न मनानें सैंपाकघराकडे गेल्या !

जेवतांना दादासाहेब विलासला म्हणाले,

" तुला एक महत्वाची गोष्ट सांगायची आहे. "

" काय ?"

" सोराबजी दिनशा कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर मला मुद्दाम भेटायला संध्याकाळी आले होते, त्यानीं तुझ्या नोकरीचा प्रश्न मला पुन्हा एकदा विचारला. "

" होय का ? आई, मला रस्सा आणखी पाहिजे बरं का. मीं तुला नोटीस दिली होती ती विसरलीस वाटतं ? "

दादासाहेबांनीं विचारलें,

" ऐकतो आहेस ना मी काय म्हणतों तें ? "

" हो ऐकतों आहे ना ? सांगा. "

" सोराबजी दिनशा कंपनी मुंबईच्या गिरण्यांना विजेचा पुरवठा करण्यासाठीं एक मोठा कारखाना काढणार आहे, आणि त्यासाठीं लोणावळ्याच्या पूर्व बाजूस तळवली गांवाजवळ एक प्रचंड धरण बांधण्याचा त्यांचा बेत आहे– "

" लोणावळ्याचे टोमॅटो तुला आठवतात का आई ? एकएक

येवढाला, नाहीं ? आणि लालबुंद तरी किती ? त्यांची सर यायची नाहीं या मुंबईच्या टोमॅटोंना."

दादासाहेब म्हणाले,

"तेव्हां त्या कंपनीला तलाव बांधण्याच्या कामात तज्ञ अशा कांहीं एंजिनिअरची जरुरी आहे. तू Dam Construction मधला स्पॅशॅलिस्ट होऊन आला आहेस हें मॅनेजिंग डायरेक्टरांना माहीत आहे. तेव्हां त्याच म्हणणं तू त्याचं काम पत्करावंस."

विलासने चटकन् उत्तर दिलें नाही.

तो मनाशी विचार करूं लागला, याना का बरे अशी घाई झाली आहे मीं नोकरी पत्करावी म्हणून ?....

दादासाहेबांनीं त्याच्याजवळ नोकरीचा प्रश्न आज कांहीं पहिल्यानेंच काढला नव्हता. कितीतरी वेळां या नाहीं त्या नोकरी-बद्दल त्यांनीं त्याला विचारलें होतें. विलासनें दरवेळीं उडवा-उडवीचीं उत्तरें दिलीं होती, आणि त्याबद्दल कितीहि राग आला तरी तो त्यांनीं बोलून दाखवला नव्हता. दादासाहेबांसारख्या व्यक्तींना आपली मुलें शिस्त सोडून वागतात याबद्दल जसा राग येतो, तसाच मुलांबद्दल त्याच्या अंतःकरणाच्या खोल कप्प्यांत प्रेमाचा उमाळाहि असतो. एवढेंच, की तो राग अथवा तो उमाळा मुलाच्यापुढें स्पष्ट बोलून दाखविण्याची, कां कोण जाणे, त्यांना आवड नसते. म्हणून विलासने नोकरी पत्करण्याचें लांबणीवर टाकावें याचा त्याना राग येई हें जसें खरें, तसेंच त्याच्यावरील प्रेमामुळें तो प्रश्न पुनःपुन्हा काढल्यावांचून त्यांना रहावत नसे हेंहि खरें. त्याना वाटे, विलास एकदा नोकरी करूं लागला, की त्याच्या अंगीं शिस्त हळुहळू आपोआप उत्पन्न होईल, आणि मग लग्नाकडेहि त्याचें मन वळल्यावाचून राहाणार नाहीं.

मात्र ही विचारसरणी त्यांनी आपल्या पत्नीजवळ जरी एक दोन वेळां उघड केली होती, तरी विलासला तर त्यांच्या या विचारसरणीची कल्पना येणें शक्यच नव्हते त्याला मधून

मधून एवढेंच वाटे, कीं आपला अमर्याद खर्च तर आपल्या दादासाहेबांना झेपेनासा होत नसेल ? आणि तसें असेल तर नोकरी न करतां आणखी किती दिवस आपण राहणें बरें होईल ?

आत्तांसुद्धां बापलेक आपापल्या मनाशीं आपापल्या विचार-सरणीनें विचार करीत कांही वेळ स्तब्ध राहिले.

कांहीं वेळानें दादासाहेब म्हणाले,

" मग काय ? तू पत्करणार का ही नोकरी ?"

विलासच्या मनांत एकदम काय काय घडामोडी झाल्या कुणास ठाऊक ? आजपर्यंत तोंडांतून कधीं न गेलेलें उत्तर त्याच्या तोंडांतून निघून गेलें. तो म्हणाला,

" ठीक आहे ! पत्करतों "

सुदेष्णाबाईनीं दादासाहेबांना विचारलें,

" पण पगार चांगला मोठा आहे ना ?"

" अहो तर ? सोराबजी दिनशा म्हणजे मोठी गबर कंपनी आहे."

" पण, नोकरीसाठीं विलासला मुंबई सोडून जावं लागेल कीं काय ?"

" हो. तलाव बांधण्याचं काम तिकडे तळवलीला होणार. इथें कसा राहील विलास ! "

" मग आपल्या आचाऱ्याला त्याच्याबरोबर पाठवावा म्हणतें मी. त्याच्या खाण्यापिण्याचे हाल व्हायला नको बाई."

विलासला आपल्या आईबापाचें हें संभाषण मुळींच ऐकूं आलें नाहीं. कसले तरी अस्पष्ट परंतु फार जड असे विचार त्याच्या मनांत एकदम उद्‌भवले होते. जीविताच्या गंभीर स्वरूपा-कडे त्यानें आजपर्यंत दृष्टि टाकली नव्हती. पण, आतां कोणीतरी आपलें मस्तक बलात्कारानें फिरवून तें गंभीर स्वरूप पहावयास आपणांस भाग पाडीत आहे असें त्याला वाटलें.

तो थोडेंसें पाणी प्याला, आणि पानावरून उठला.

हात धुतल्यावर तडक वर आपल्या खोलींत जाण्याची त्याची इच्छा होती.

पण दादासाहेबांनी त्याला म्हटलें,

" उद्यां सकाळीं तुला वेळ होईल का ?"

" कां ?"

" नाही; मॅनेजिंग डायरेक्टरांनीं सांगितलं आहे, की तुला नोकरी पत्करायची असेल तर तूं उद्यां त्यांच्याकडे सकाळीं चहाला जावंस. म्हणजे–"

" मला सकाळी नाही वेळ व्हायचा."

" मग संध्याकाळी जाशील ? तसा मी टेलिफोन करीन त्यांना."

" बरं आहे, करा."

असें म्हणून विलास माडीवर गेला.



# प्रकरण ४ थें

---

त्या रात्री विलासला झोंप कांही नीटशी लागली नाहीं.

आजपर्यंत जीविताच्या सागरांतील निळसर लाटांवर आरूढ होऊन मन मानेल त्याप्रमाणें त्यानें संचार केला होता. जी लाट आपल्या अंगाखाली आहे ती केव्हा तरी आपल्या डोक्यावर चढेल ही कल्पनाच त्यानें कधी केली नव्हती. केवळ मौजेनें जलपृष्ठावर तरंगण्याची क्रीडा त्यानें आजपर्यंत केली होती; तो जल-सागर वस्तुतः किती खोल आणि गंभीर आहे याचा विचार त्यानें कधींच केला नव्हता. पण आतां एकाएकीं जीवितसागराची लाट उसळून त्याच्या मस्तकावर चढली होती. तें पाहून तो त्रासला, आणि बराचसा अस्वस्थ झाला.

मात्र दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून आपली नवी मोटरसायकल गराजमधून काढून जेव्हां तिच्यावर स्वार होऊन ताशीं साठसत्तर मैलांच्या वेगानें तो शर्यतीच्या मैदानाकडे निघाला, मोटारसायकलचा फट्फट् फट्फट् असा होणारा तालबद्ध आवाज कानीं पडूं लागला, आणि प्रातःकालच्या वाऱ्याचा झोंत अंगावरून जाऊं लागला तेव्हां त्याचें मन नेहमींप्रमाणें प्रसन्न झालें.

आणि दीडदोन तास सायकल फिरविल्यानंतर जेव्हां तो थांबला, आणि अंगभर आलेला घाम जाडशा टॉवेलनें पुसून काढीत झाडांच्या छायेखालीं उभा राहिला तेव्हां तर त्याचें मन पूर्णपणें उल्हसित झालें.

त्यानें मनगटावरच्या घड्याळाकडे पाहिलें व स्वतःशीं म्हटलें, "एल्सी वाट पहात असेल."

आणि त्याचा तो अदमास खोटा ठरला नाहीं.

तो कुलाब्यावरच्या पोहण्याच्या तलावावर जाऊन पोंचला तों दाराशींच एल्सी उभी असलेली त्याला दिसली.

मोटरसायकल तिच्या अगदीं पायाशीं भिडवीत त्यानें म्हटलें
" Good Morning, Elsie."

एल्सीनें एखाद्या घोड्याचा लगाम पकडावा त्याप्रमाणें त्याच्या सायकलचा दांडा धरून म्हटलें,

" Good Morning. मला वाटतं तुझ्या मनगटावरचं घड्याळ बदलायला पाहिजे. वेळ दाखवीत नाहीं तें बरोबर."

" एल्सी, माफ कर हं. मला उशीर झाला खरा थोडा. पण तूं मोठी क्षमाशील आहेस, मला माहित आहे."

" बस्स् कर. तुझं मिठास बोलणं मला माहीत आहे."

" पण आतां वादांत कां वेळ घालवायचा ? पाण्यांत केव्हां बुडी मारीनसं झालं आहे मला. चल चल.'

असें म्हणून विलासनें तिच्या कमरेभोंवतीं हात टाकला, व तिला दारांतून आंत नेले.

बाहेरच्यापेक्षां आंत कितीतरी गारवा वाटत होता. फरसावर जिकडे तिकडे पाणी उडालें होतें. जलाशयांत पोहणाऱ्या माणसांच्या हातापायांच्या आघातांनीं आणि बुचकळ्यांनीं पाण्याच्या पृष्ठावर लाटा उसळून तऱ्हेतऱ्हेचे आवाज निघत होते. पोहणारी मंडळी एकमेकांची थट्टामस्करी करीत, त्यामुळें हंसण्याखिदळण्याचा आवाजहि मधेंच ऐकूं येत होता. समुद्राच्या पाण्याच्या ठरीव विचित्र ओलसर दर्पांत पोहणाऱ्या मंडळींनीं वापरलेल्या साबणांचा मिश्र सुगंध मिसळत होता. कोणी कपडे उतरण्यासाठीं, तर कोणी ते पुन्हा चढविण्यासाठीं बाजूच्या लहान लहान खोल्यांत धांवत फिरत होते. कोणी ओलत्या अंगानं कांठावर उगीचच बसले होते. कोणी कांठावर टॉवलनें अंग घाशीत उभे होते. एक पुरुष ओलेत्यानेच सिगरेट ओढीत होता; आणि एक स्त्री पूर्ण पोषाख करून कांठावर उभी होती, ती पाण्यात डुबत रहाणाऱ्या आपल्या मित्राला लवकर आटपतें घेण्यास सांगत होती, व उलट तो तिच्या अंगावर पाणी उडविण्याची भीति तिला दाखवीत होता.

हें तेथील दृश्य नेहमीचें ठरलेलें असल्यामुळें विलासचें किंवा एल्सीचें त्याकडे विशेष लक्ष गेलें नाहीं. दोघें दोन निरनिराळ्या खोल्यांत शिरलीं, आणि आपापले पोषाख उतरून, व पोहण्याच्या चड्डया घालून बाहेर आलीं.

विलासनें हंसत एल्सीचा हात पकडला, तिला वेगानें ओढीत उडी मारण्याच्या फळीच्या टोंकापर्यंत नेलें, व मग दोघांनीं एकदम पाण्यांत सूर मारला.

दोघांनाहि कितो पोहूनें तरी तृप्ति होत नव्हतीसें दिसलें. बाकीची सारी मंडळी हळुहळू तेथून निघून गेली तरी त्या दोघांचें पोहणें चाललेंच होतें. एकमेकांपासून दूर अंतरावर पोहतां पोहतां मधूनच तीं दोघें सपासप हात मारीत एकमेकांच्या जवळ येत, आणि मग कांहीं वेळ एकमेकांच्या कमरेभोंवतीं हात टाकून तरंगत रहात.

अशा वेळीं एल्सीच्या हंसऱ्या चेहऱ्याकडे, आणि पाण्याच्या पृष्ठभागाखालीं दिसणाऱ्या तिच्या गोऱ्यापान बांधेसूद शरीराकडे पहातां पहातां विलासच्या मनांत येई,

"काय विलक्षण आहे ही मुलगी !"

टेनिसच्या निमित्तानें Y. M. C. A. च्या क्लबावर तिची त्याची प्रथम ओळख झाली होती, आणि नंतर ती सारखी वाढत गेली होती. इजिप्तमधल्या एका अगदी गरीब ख्रिश्चन कुळांत तिचा जन्म झाला होता. तिच्या लहानपणींच तिचे आईबाप वारले होते; पण आपल्या बुद्धीच्या व निर्भयपणाच्या जोरावर स्वतःचें शिक्षण तिनें पुरें केलें होतें. इतकेंच नव्हे, तर अखेर हिंदुस्थानांत येऊन तिनें चांगली नोकरीहि मिळवली होती. आज सी. आय्. डी. च्या मुख्य ऑफिसांत शॉर्टहँड टायपिस्ट म्हणून ती दोनशें रुपये मिळवीत होती, व स्वतःचा चरितार्थ चालवून इजिप्तमध्यें असलेल्या आपल्या वृद्ध मावशीला नियमितपणें पैसे पाठवीत होती. त्यामुळें केवळ एक स्वरूपसुंदर मुलगी

म्हणून नव्हे, तर एक कर्तृत्वाची स्त्री म्हणून विलास तिच्याकडे नेहमीं पहात असे. किंबहुना, तिच्या सहवासांत जो आनंद आपल्या अनुभवाला येतो त्याचें कारण तिचें रूप, कीं तिच्या किंचित् तांबूस डोळ्यांत व्यक्त होणारी तिची निर्भयता, कीं तिचें मोकळें खेळकर अंतःकरण याबद्दल विलासच्या मनाचा कधींच निश्चय झाला नव्हता.

आत्तां या वेळी तिच्या अंगाला अंग लावून जलक्रीडा करीत असतांना सुद्धां तो होण्यासारखा नव्हता.

म्हणून हाताच्या बोटांनीं तिचा कटिभाग धरून ठेवून तिच्याकडे पहातां पहातां अखेर तो मनाशीं एवढेंच म्हणाला,

" काय विलक्षण आहे ही मुलगी ! "

एल्सीदेखील त्याच्या हातावर हलका भार टाकून तरंगतां तरंगतां त्याच्याबद्दलचेच विचार करीत होती कीं काय कुणास ठाऊक ? कारण, तिनें मध्येंच एकदम विचारलें,

" विलास, बरेच दिवस झाले, मी एक प्रश्न विचारणार आहें तुला. "

विलासनें तिच्याकडे पाहून हंसत म्हटलें,

" होय का ? मग फारच मनोरंजक प्रश्न असेल तुझा. "

" थट्टेवारीं नेणार असलास तर विचारीतच नाहीं. "

" बरं बरं. अगदी छातीवर हात ठेवून सांगतों, कीं खरं तेंच सांगेन. "

असें म्हणून विलासनें आपला मोकळा हात तिच्या छातीवर ठेवला.

एल्सीनें आपल्या हाताचा पाण्यावर फटकारा मारून त्याच्या तोंडावर खूपसें पाणी उडविलें, व त्या पाण्यानें तो ठसकूं लागला, तेव्हां हंसत म्हटलें,

" आतां तरी थट्टा थांबवशील का ? "

" बरं बरं. विचार तुझा प्रश्न. "

" तूं लग्न कां करत नाहींस ? "

" कां ? मीं तुला विचारावं असं तुझ्या मनांत आहे कीं काय ? "

" केलीस का पुन्हा थट्टा सुरू ? खरं साग विलास, तुला नाहीं वाटत तूं आतां लग्न केलं पाहिजेस ? "

" लग्नच काय, मला चार मुलंबाळं आज असती तर बरं झालं असतं, असं पुष्कळांना वाटत असेल. "

" हद्द आहे तुझ्यापुढं. मनापासून बोलनांच येत नाही कीं काय तुला ? जा. "

असें म्हणून एल्सीने एकदम त्याचा विळखा सोडून दिला व भराभर त्याच्या अंगावर पाणी उडवून मग उलटे हात मारीत ती त्याच्यापासून दूर गेली.

अशा प्रकारें त्या दोघांनी बराच वेळ जलक्रीडा केली.

मग पाण्याबाहेर येऊन त्यांनी अंग पुसले व कपडे केले, आणि विलासच्या मोटार सायकलवरून ती दोघे एल्सीच्या खोलीकडे गेलीं.

हंसत, बोलत चालत जेवण झाल्यावर विलास जेव्हा उठला, व ' जातों ' म्हणाला, तेव्हां एल्सीनें विचारले,

" हे काय ? इतक्यांत निघालास ? माझा आज सुटीचा मजेचा दिवस आहे, हें विसरलास वाटतं ? "

" पण माझी सुटी आज संपणार आहे. मला जायलाच पाहिजे. "

" म्हणजे काय ? मी नाही समजलें. तुझी सुटी संपणार म्हणजे काय ?"

" एल्सी, आज मी एक नोकरी पत्करणार आहें, आणखी आजपर्यंत उपभोगलेल्या सुटीचा शेवट करणार आहें. ज्याची नोकरी पत्करायची त्याला आज संध्याकाळी भेटायचं मीं कबूल

केलं आहें. अन् त्यांच्याकडे जायच्या आधी मला चांगली दोन तीन तास झोंप काढायची आहे."

" मग इथें झोंप की."

हें म्हणतां म्हणतां तिनें त्याचा हात धरला, व त्याच्या नजरेला नजर लावली.

विलास तिची नजर न चुकविता म्हणाला,

" Thank you. पण घरी जाणंच मला अधिक आवडेल."

" You are hurting me, Stay here," (तूं गेलास तर मला वाईट वाटेल. रहा ना इथे ! )

" Im' sorry Elsie. But I think, I'll go" (माफ कर, पण मला रहावसं वाटत नाही ! )

" Don't be silly" ( हें काय बरं ? )

पण विलासनें ऐकलें नाही. तो निघालाच.

एल्सीनें विचारलें,

" मग आतां पुन्हां केव्हां भेटशील ?"

" कुणास ठाऊक ! नोकरीसाठीं मला मुंबई सोडून जावं लागेलसं दिसतंय."

" O what a pity !" (हा दैवा ! )

" Good bye,Elsie. (एल्सी, जातों.) "

असें म्हणून विलासनें अस्पष्ट हास्य केलें, आणि तो चालता झाला

त्याच्या मोटारसायकलचा आवाज सुरू होऊन ऐकूं येईनासा झाला तरी कांही वेळ एल्सी तशीच जागच्या जागीं उभी होती.

मग ती वळली, व खोलींतल्या मोठ्या आरशासमोर उभें राहून स्वतःच्या कांतिमय गोऱ्यापान देहाच्या प्रतिबिंबाकडे तिने कांहीं वेळ टक लावून पाहिलें.

अखेर ती स्वतःशींच पुटपुटली,

" काय विलक्षण आहे हा विलास ?"

विलास निघाला तो लवकरच कुलाब्याचा भाग ओलांडून फोर्टच्या भागांतून वेगानें जाऊं लागला.

तो सुटीचा दिवस असल्यामुळें त्या भागात त्या वेळी रहदारी अगदी नव्हती. दुतर्फाची दुकाने बंद होती, इतर दिवशीं वेगाने एका पाठोपाठ जाणाऱ्या मोटारी आज दिसत नव्हत्या, आणि राजरस्त्याच्या दुतर्फाचे एरवी माणसानी गजबजलेले [illegible] फरसबंद फूटपाथहि जवळजवळ शून्यच दिसत होते. मध्येंच एखादी मोटार वेगाने रस्त्यांतून जाई तिचा ड्रायव्हर केवळ सवय म्हणून तिचे हॉर्न वाजवी, आणि मध्येच आपल्या लोहमार्गावरून डौलानें धावत जाणाऱ्या ट्रॅमचा ड्रायव्हरसुद्धां घंटेचा बसकट खणखणाट करी. त्यांत जरुरीपेक्षां संवयीचाच भाग अधिक दिसत असे. वेगाची हौस असलेल्या विलासला त्या शुकशुकाटाने एक प्रकारें बरें वाटले. त्याने मध्येंच पेट्रोलचें थ्राटल उघडलें आणि ताशी पंचेचाळीस मैलावर आपली आवडती मोटारसायकल घातली त्या वेळी त्या आज्ञाधारक यंत्रानें फर्रर्रर्रं असा आवाज करून त्याच्या इच्छेला जो जबाब दिला तो ऐकतांच त्याला मोठी गंमत वाटली. अधिक खुषीत येऊन तो आपल्या सायकलचा वेग आणखी वाढवणार होता.

पण तितक्यांत त्याला आपला हात आंवरता घ्यावा लागला.

कारण, तेवढ्या दीड दोन मिनिटांत तो बोरीबंदरासमोरच्या विस्तीर्ण चौकापर्यंत येऊन पोंचला होता, व तेथें त्याने पाहिलें तों हजारों माणसांनी रस्ता नुसता फुलून गेला होता.

विलासनें गाडीला ब्रेक लावले, आणि जोरजोरानें फुगा दाबण्यास सुरूवात केली.

पण त्या प्रचंड गर्दीतील एक मनुष्य बाजूला सरकेल तर शपथ. सारे लोक जणू बेहोष झाले होते.

त्या अवाढव्य गर्दीत खादी परिधान न केलेला मनुष्य प्रयत्नानें शोधावा लागला असता. जिकडे तिकडे खादीचे शुभ्र सदरे आणि खादीच्या पांढऱ्या शुभ्र टोप्या दिसत होत्या. अथांग श्वेतवर्णाचा जलसागरच एकदम उचंबळून आपल्या ठरीव सीमा ओलांडून हेलकावे खात असल्याचा भास व्हावा अशी त्या जन-संमर्दाची हालचाल होत होती.

विलासनें लांबवर दृष्टि टाकून पाहिलें, तों लोकांच्या त्या गर्दीचें दुसरें टोंक त्याला दिसेना.

धोबी तलावापर्यंत ती गर्दी पसरली असली पाहिजे.

विलासनें आजूबाजूच्या लोकांस ती गर्दी कशाबद्दल आहे तें विचारून पाहिलें. पण, कोणालाच त्याच्याशीं बोलावयास फुरसत नव्हतीसें दिसलें. शेवटीं एका सार्जंटजवळ चवकशी केल्यावर त्याला कळलें, कीं चार वाजतां एस्प्लनेडच्या मैदानावर महात्मा गांधीचें व्याख्यान होणार होतें. त्यासाठीं आतांपासून लोकांची ही प्रचंड गर्दी जमली होती. मैदानाची विस्तीर्ण जागा लोकांनीं खचून भरून गेल्यामुळें हजारों लोक आतां राजरस्त्यावर उभे राहिले होते. सुमारें अर्ध्या मैलाचा टापू लोकांनीं व्यापून टाकला होता. ट्रॅमगाड्यांची वाहतूकदेखील त्या भागांत बंद पडली होती. जो तो मैदानाकडे जाण्यासाठीं गर्दीतून मार्ग काढूं पहात होता, व तसा मार्ग काढणें अशक्य आहे असें दिसून आल्यावर जागच्या जागी अस्थिरपणें उभा रहात होता. जणूं तिष्टत उभें राहणें कंटाळवाणें वाटू नये म्हणून गर्दीत पुढें मागें हेलकावे खाणारे ते लोक मधून मधून ‘ महात्मा गांधी की जय ! ’ अशी गर्जना करीत होते. पुष्कळशा लोकांनीं गर्दीत मिसळण्याचा साधा मार्ग सोडून झाडांच्या फांद्यांवर आणि इमारतींच्या छपरांवर जागा पटकावल्या होत्या, आणि रस्त्यावरच्या गर्दीत गांधींच्या नांवाचा जयघोष झाला म्हणजे उंचउंच जागीं बसलेले हे लोकहि त्या जयघोषांत आपल्या आरोळ्या मिसळीत होते. गर्दीच्या सीमा-

रेषेवर लहान मोठे पोलीस अधिकारी उभे होते. पण त्या जनसंमर्दाचें नियंत्रण करणारे अंमलदार नव्हे तर केवळ तो जनसंमर्द जें जें करील तें मुकाट्यानें पहाणारे असहाय्य साक्षीदार असेंच त्यांचें वर्णन करावें लागलें असतें. त्या अंमलदारांची असहाय्यता लोकहि पुरतेपणीं जाणून होते. ज्याला नेहमीं सत्ता गाजवितांना पाहिलेलें असतें त्याला एखाद्या वेळेस दुबळ्या असहाय्य स्थितींत पाहिलें, कीं सामान्य लोकांना त्याची गंमत वाटते, आणि त्याची कुचेष्टा करून स्वतःची करमणूक करून घेण्याचा मोह सामान्य लोकांना आंवरतां येत नाहीं. त्यामुळें दोन तास रस्त्यांत उभें रहावयास सिद्ध झालेले त्या गर्दीतील ते लोक मधून मधून पोलीस अंमलदारांची थट्टा करावयास कमी करीत नव्हते. त्यांच्याकडे पाहून लोक ओरडत,

"पगडी काढा, पगटी काढा! गांधी टोपी घाला!"

इतकेंच नव्हे, तर त्या प्रचंड गर्दीतल्या कांहीं लोकांनीं विलायती कापडाचे कोट, खमीस, टोप्या आजूबाजूच्या लोकांपासून मागून अगर हिसकावून घेण्यासहि प्रारंभ केला होता. विलायती कापडाची होळी करण्याचा त्यांचा बेत होता, व ती होळी शक्य तेवढी मोठी व्हावी अशी त्यांनीं खटपट चालविली होती. सारांश १९२०-२१ सालची नमुनेदार गर्दी होती ती! तसल्या गर्दीचे देखावे त्या दिवसांत शहरोशहरी रोज पहावयास सांपडत असत.

विलासला मात्र तो देखावा प्रथमच दिसला होता.

महात्मा गांधींनीं सबंध देशभर उत्साहाची केवढी लाट उसळविली होती याची त्याला या क्षणापर्यंत दाद नव्हती. पण तें असामान्य दृश्य पहातांच त्याला त्याची ओझरती पण स्पष्ट कल्पना झाली. महात्मा गांधींचें नुसतें दर्शन घ्यावयास, व तुम्ही सांगाल त्या मार्गानें तुमच्या मागोमाग यावयास आम्ही तयार आहोंत एवढें आश्वासन त्यांना द्यावयास पंचवीस तीस हजार लोकांनीं तासन् तास सभेच्या जागीं, व आजूबाजूच्या रस्त्यावर तुफान गर्दीनें उभें रहावें हा खरोखरच मोठा चमत्कार होता. सबंध राष्ट्र खडबडून जागें झालें होतें यांत काय संशय?

जें दृश्य कधीं पाहिलें नाहीं किंवा ज्याची कधीं कल्पनाहि केली नाहीं तें प्रत्यक्ष दिसतांच ज्या भांबावलेल्या नजरेनें माणूस पहात रहातो त्या नजरेनें विलास त्या अफाट गर्दीकडे क्षणभर पहात राहिला.

तितक्यांत चारपांच लोक त्याच्याजवळ आले, व म्हणाले,

" मेहेरबान, तुमची टोपी द्या इकडे."

विलासनें गोंधळून विचारलें.

" टोपी ? कां ?"

" ती विलायती आहे. "

" मग ?"

" ती तुम्ही होळींत टाकली पाहिजे. "

" कुठली होळी ?"

" ती पहा. द्या, द्या टोपी. "

असें म्हणत एका अतिप्रसंगी माणसानें विलासच्या टोपीला हात घातलाच.

अंगावर आलेला चेंडू फटकावण्यास सरावलेला विलासचा उजवा हात एकदम हालला, व त्याची टोपी काढूं पहाणारा तो इसम कोलमंडून खालीं पडला.

तें पहातांच दहावीस लोक विलासभोंवतीं एकदम गोळा झाले, व ' टोपी निकालो ', ' कोट निकालो, ' असा त्यांनीं एकच गिल्ला केला.

विलासनें कदाचित् त्या सगळ्यांशींच मारामारी सुरू केली असती, पण तितक्यात त्याच्याशी मघांशीं बोलणारा सार्जंट पुढे आला.

त्यानें विलासभोंवतालच्या लोकांना थोडेंसें बाजूला हटविलें, व विलासला आर्जवानें म्हटलें,

" तुम्ही इथून जाल तर बरं होईल. तुम्हांला कुणीकडे जायचं आहे ?"

विलासनें उत्तर दिले,

"मला नेपिअन सी रोडकडे जायचं आहे. पण, मी जाईन नाहींतर उभा राहीन. हे लोक काय म्हणून– "

सार्जंट आर्जवानें म्हणाला,

"तें आपल्याला कळायचं नाहीं, अन् मला सांगतां यायचं नाहीं. पण, आपण मेहेरबानी करा, आणखी क्वीन्स रोडच्या वाटेनं जा. माझ्यासाठी; Please."

मग विलासनें मोटरसायकल वळविली, आणि सुरूं केली.

"गांधी महाराज की जय!" अशा आरोळ्या त्याच्या कानांवर आल्या.

मोठ्या रस्त्याला लागतांच तो खूप वेगानें जाऊं लागला. त्या रस्त्यावर मुळीच गर्दी नव्हती. पण, जी तुफान गर्दी त्यानें नुकतीच पाहिली होती ती त्याच्या मनश्चक्षूसमोर सारखी तरगत होती. रस्त्याच्या डाव्या बाजूस समुद्र ऐन भरतीला आला होता. या समुद्रानें आजपर्यंत कितीतरी मोठमोठी जहाजें आपल्या पोटांत गडप करून टाकली होतीं. तेहत्तीस कोटी हिंदी लोकांचा प्रचंड सागर खरोखरीच प्रक्षुब्ध झाला असेल तर तो आपल्या पोटांत कोणत्या कोणत्या गोष्टी गडप करील तें कोणीं सांगावें ?....

पण, हिंदी जनतेचा महासागर कां खवळला होता, आणि त्याला काय गडप करावयाचें होतें याची विलासला कांहीच कल्पना नव्हती.

आजपर्यंत कधींच न केलेले विचार आपल्या मनांत डोकावत आहेत असें त्याला वाटलें ..

ते विचार त्याला नको होते.

त्यानें मान हालवली आणि सायकल जोरांत हांकली.

त्या दिवशीं महात्मा गांधींच्या व्याख्यानाची सभा संपल्यावर तेथून सुटलेल्या त्या प्रचंड जनसंमर्दानें उत्साहाच्या भरांत नाना तऱ्हेचे आततायी प्रकार केले. रस्त्यानें जाणाऱ्या माणसांचे कपडे हिसकून घेण्यांत आले, दुकानदारांच्या कापडमालावरहि धाड

पडली, आणि ठिकठिकाणी लहानमोठ्या होळ्या पेटवण्यांत आल्या. कापडाप्रमाणेंच इतर मालाच्या दुकानांतहि शिरून नास-धूस करण्यास लोकांनीं कमी केलें नाहीं. अखेर या टोळधाडीमुळें चिराबाजारापासून तों गिरगांवपर्यंत दुकानें भराभर बंद झालीं. मोटारीवर आणि ट्रॅमगाड्यांवर दगड फेंकण्यांत आले. जो उठला तो धांवत सुटला. कोणी आत्मरक्षणासाठीं पळाले, तर कोणी बेफामपणाचा आपली लहर पुरविण्यासाठीं लोकांच्या त्या वेड्या गर्दींत सामील झाले. कसल्यातरी अनामिक उत्साहाच्या वावटळींत सारे लोक सांपडले होते. अनत्याचाराचा संदेश सांगून महात्मा गांधी स्वत: आपल्या निवासस्थानीं परत गेले होते, व मोठमोठ्या पुढाऱ्यांशीं अनात्याचारी युद्धाच्या पुढील डावांचीं खल-बतें करीत होते; आणि त्याच्या युद्धांत त्यांच्या निशाणाखालीं लढावयास सज्ज होणारे हजारों लोक आपल्या वेड्या उत्साहाच्या ज्वाळा जिकडे तिकडे पसरवीत होते !

विलासला अर्थातच या कोणत्याहि घटनेची दाद नव्हती.

तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठला त्या वेळेस एवढाच विचार त्याच्या मनांत होता, कीं आपल्याला आज दुपारच्या एक्स्प्रेसनें लोणावळ्यास जावयाचें आहे.

आदल्या दिवशीं मॅनेजिंग डायरेक्टरच्या मुलाखतींत त्यानें नोकरी पत्करली होती. एवढेंच नव्हे, तर लोणावळ्यास कंप-नीनें जो कँप उघडला होता तेथें ताबडतोब जाऊन कामावर रुजू होण्याचें त्यानें कबूल केलें होतें.

त्यामुळें ती मुलाखत आटपून घरीं परत आल्यापासून लोणावळ्यास जाण्याची तयारी करण्याची त्याची धांदल उडाली होती.

आतां सकाळीं तो उठला तों उरलेल्या तयारीचे विचार करीतच उठला.

दुपारीं स्टेशनवर पोंचेपर्यंत त्याची तयारी चालूच होती; व तेथें पोंचल्यावरहि तो दादासाहेबांस व सुदेष्णाबाईंस माझें अमूक राहिलें, तमूक राहिलें असें पुनः पुन्हा सांगतच होता.

त्याला पोंचवावयास सुनेत्रा व कल्पना स्टेशनवर आल्या होत्या. आधींच दुर्मिळ असलेला विलास आतां तर आपल्याला अधिकच दुर्मिळ होणार या विचारानें दोघींचेहि चेहरे खिन्न झाले होते; व एरवीं एकमेकींचा मत्सर करणाऱ्या त्या दोन तरुण मुली इतरांच्यापासून किंचित् दूर एकत्र उभ्या राहून आपसांत कांहीं-तरी बोलण्याचें मिष करीत होत्या

सुनेत्राचे वडील आले होते त्यांनीं तेथें भर प्लॅटफॉर्मवरसुद्धां संधि सांपडेल त्याप्रमाणें गांधींच्या चळवळीबद्दल साधक बाधक माहिती लोकांना सांगण्याचें आपलें व्रत चालूं ठेवलें होतें.

मध्येंच ते विलासला म्हणाले,

"हें बघा, हा क्रॉनिकल, हा टाईम्स, ज्ञानप्रकाश, आणखी ताजा केसरी असूं द्या तुमच्याजवळ. प्रवासांत कांहींतरी वाचायला पाहिजेच ना? ती इंग्रजी कादंबरी वाचायला घेतली आहे वाटतं? अहो, देशांत केवढी आग पसरली आहे, आणि कादंबऱ्या कसल्या वाचतां? घ्या, घ्या हें सगळं पुडकं! थांबा हं; ताजा 'हिंदु' मिळाला तर आणतों. 'हिंदु' सारखं पत्र नाहीं बघा. केसरी म्हणजे काय आतांशा केसरी नांवाचा झाला आहे! बाकी मी देतों आहे. तो अंक वाचल्याशिवाय राहूं नका हं. अहो माणसानं सारखं वाचावं!"

विलासचें लक्ष त्यांच्या बोलण्याकडे नव्हतें. त्याच्या सिगारे-टचा डबा त्याला सांपडत नव्हता. तो शोधतां शोधतां तो त्यांच्या बोलण्याला कसेंबसें हं हं करीत होता.

शेवटीं डबा बॅगमध्य घालायला आपण विसरलों ही जेव्हां त्याची खात्री झाली तेव्हां तो गाडीखालीं उतरला, व सुनेत्राला म्हणाला,

"मी सिगारेट्स घेऊन येतों हं."

तो घाईघाईनें प्लॅटफॉर्मवरच्या स्टॉलवर गेला.

तेथें घेतलेला डबा फोडून त्यांतली ताजी सिगरेट काढून पेटविण्यासाठीं त्यानें तोंड खालीं केलें होतें, इतक्यांत समोरून कोणीसें येऊन म्हटलें,

" ओहो, विलास कीं काय ? "

विलासनें वर पाहून म्हटलें,

"हॅलो, शरच्चंद्र ? "

" कुठें निघालास ? या गाडींतच आहेस ? "

" हो. मी लोणावळयास जातों आहे. तूं आहेस कीं काय गाडींत ? "

" मी ? नाहीं बुवा. मी पोंचवायला आलों आहे. "

" कोण जातं आहे रे " ?

" आशा ! "

" आशा ? "

" हो. लोणावळयाच्या जरा पुढें तळवली स्टेशन आहे ना ? तिथें जायचं आहे तिला. "

" असं का ? अच्छा, Good bye. "

असें म्हणून व शरच्चंद्राशीं हस्तांदोलन करून विलास आपल्या डब्याकडे परत आला. पण नंतर आपल्या आईबापांशीं, सुनेत्रा-कल्पनेशीं, व इतरांशीं हास्यवदनानें बोलत असतां एकीकडे तो आपल्या मनाशीं म्हणत होता,

" आज तीन दिवस या एका नांवानं काय माझा पाठलाग चालवला आहे ! आशा ? आहे तरी कोण ही ? "

गाडी सुटली तरी त्याच्या मनाचा तो किंचित् आश्चर्यजनक व किंचित त्रासाचा चाळा सुटला नाहीं.

सुनेत्राच्या वडिलांनीं त्याच्या वळकटीवर ठेवलेलीं सारीं वर्तमानपत्रें वाऱ्याच्या झोतानें एकामागोमाग उडून बाहेर गेलीं तरी त्याचें तिकडे लक्ष नव्हतें.

तो मनाशीं पुनः पुन्हां म्हणत होता,

" आशा ? कोण ही ? "



# प्रकरण ५ वें

---

१९२१ सालीं बमनजी इराणी नांवाचे एक पारशी गृहस्थ लोणावळ्यास स्टेशनमास्तर होते. ते वयानें जरी पन्नाशीच्या सुमाराचे होते तरी स्वभावानें फार गोड आणि एकाद्या अवखळ लहान मुलाप्रमाणें खोडकर व विनोदी असल्यामुळें त्यांच्याविषयीं केवळ रेल्वेच्या नोकरांसच नव्हे, तर गांवांतील सर्वच नागरिकांस आदर आणि प्रेम वाटत असे ते दिसण्यांत मोठे भव्य आणि रुबाबदार दिसत, आणि येणाऱ्या जाणाऱ्या गाड्यांच्या ठराविक वेळेस स्टेशनमास्तरच्या ऑफिसच्या दारात नियमितपणें उभी असलेली त्यांची उंच जाडजूड आकृति पाहिली की गाडींतल्या उतारूंच्या मनावर त्यांच्या अंगच्या दक्षतेचा, शिस्तीचा, आणि करारीपणाचा ठसा चट्कन् उमटत असे. पण, कामाव्यतिरिक्त इतर वेळा बमनजी कोणाच्याहि दृष्टोस पडले, की त्याच्या गमत्या स्वभावाचा त्याला तावडतोब प्रत्यय आल्यावांचून रहात नसे. सारें गांव बमनजी मास्तरना ओळखीत होतें; व रस्त्याच्या कडेला बैदूल खेळणारी अगर पतंग उडवणारी लहान मुलेंमुद्धां त्यांना पहाताच 'साहेबजी' म्हटल्यावांचून रहात नसत. त्याना पायीं रपेट करण्याना फार शोक होता; आणि त्यांच्या कामाच्या वेळा सोडल्या तर ते केव्हां कोठें दिसतील त्याचा नियम नसे सर्व प्रकारच्या लोकांत ते सारख्याच हौसेनें मिसळत. लोणावळ्यास स्थायिक झालेल्या, किंवा मोसमापुरत्या येणाऱ्या बड्या लोकांच्या घरीं तर ते जात येत असतच, पण गांवकऱ्यांनीं तमाशा केला तर त्यालामुद्धां ते आवरून जात. सर्वांनाच बमनजी मास्तर आपला माणूस आहे असें वाटत असे; आणि त्यांच्या बंगल्यावरून जातां येतां ते दृष्टीस पडले तर त्यांना अभिवादन केल्यावांचून, किंवा

ते दिसले नाहींत तर बागेंत काम करणाऱ्या माळ्याजवळ "काय रे, मास्तर स्टेशनवर गेले वाटतं ?" अशी चवकशी केल्यावांचून कोणीहि मनुष्य सहसा रहात नसे

अर्थात् तरुण लोक जेव्हां त्या बंगल्यावरून जातांना आपली गति मंद करीत, व मास्तर स्टेशनवर गेले असें माळ्याकडून समजल्यावरहि – अथवा समजलें म्हणजेच– बंगल्यापुढें अधिक घोंटाळत, तेव्हां त्यांच्या मनांत बमनजी मास्तरांचा समाचार घेण्याची साधी इच्छाच फक्त असे, असें कोणी समजूं नये. कारण, बमनजी मास्तरांना एक तरुण देखणी मुलगी होती. तिचें खरें सबंध नांव काय होतें कुणास ठाऊक, पण तिला मास्तर 'ज्यानी' असा उच्चार होणाऱ्या 'जानी' या लाडक्या नांवानें हांक मारीत; व त्यामळें सगळे लोक त्या नांवानेच तिला ओळखीत. मास्तरांची विनोदप्रियता जशी तिच्या स्वभावांत उतरली होती, तशीच त्यांची उत्कृष्ट शरीरसंपत्तीहि तिच्या ठिकाणी प्रकट झाली होती; आणि मास्तरांच्याप्रमाणेंच तीदेखील साऱ्या गांवाला प्रिय झाली होती. ती रस्त्यानें निघाली, की लहान मुलें तिच्याजवळ चॉकोलेट मागितल्यावांचून रहात नसत; ती बाजारांतून चालली कीं, तिनें आपल्या दुकानांत येऊन कांहीतरी खरेदी करावें– निदान कसलातरी भाव विचारण्यासाठीं कां होईना आपल्या दुकानांत यावें, असें प्रत्येक दुकानदाराला वाटल्यावांचून रहात नसे; ती दृष्टीस पडतांच तरुणांचे ऊर भरून आल्यावांचून रहात नसत; आणि 'आतां बमनजी मास्तर जानीचं लग्न करून टाकतील तर बरं होईल !' अशी दिवसांतून एकदां तरी आपसांत चर्चा केल्या-खेरीज गांवांतल्या म्हाताऱ्या माणसांना राहवत नसे.

स्वतःच्या लग्नाचे विचार जानीच्या मनांत कितीदां येत असत– अथवा कधीं येत असत किंवा नाहीं– कुणास ठाऊक ? दुरून पाहणाऱ्याला तरी असें वाटे, कीं या मुलीला आयुष्यांत दोन गोष्टींचाच काय तो छंद आहे. एक टेनिस खेळणें, आणि दुसरा

पत्रें लिहिणें. एकदां ती टेनिस खेळायसाठीं घराबाहेर पडली, की ती केव्हां परत येईल याचा जसा नेम नसे, तसाच पत्रें लिहिण्यासाठीं ती एकदां खोलींत बसली, कीं ती केव्हां बाहेर येईल त्याचाहि नेम नसे. अशा वेळीं कोणीहि तिला कितीहि हाका मारल्या तरी त्यांचा कांहींहि उपयोग होत नसे. बमनजी मास्तरना तिची ही खोड माहीत झाली होती, व ते तिला एक हाक मारून पहात व मग तिचा नाद सोडीत.

आज असेंच झालें.

स्टेशनवर जाण्यापूर्वी तिसऱ्या प्रहरचा चहा टेबलावर मांडला गेला तेव्हां त्यांनीं ओरडून विचारलें,

" जानी ! येतेस ना चहाला ?"

जानीनें आंतून उत्तर दिलें,

" बाप्पा, मी पत्रं लिहितें आहे. "

मग मास्तरांनीं तिला हांक मारली नाहीं.

त्यांनीं चहा घेतला आणि स्टेशनचा रस्ता सुधारला.

ते गेल्याची जानीला दादहि नव्हती

ती आपल्या खोलींत पत्र लिहिण्यांत अगदीं दंग झाली होती.

पत्राचा पहिला कागद संपून पालथा टाकला गेला असल्यामुळें त्या पत्राच्या आरंभीं जानीनें काय मायना लिहिला होता ते कळावयास मार्ग नव्हता. परंतु एक कागद संपल्यावर दुसरा कागद लिहावयासाठीं पुढें घेतांना जानीची जी चर्या झाली, त्या चर्येवरून कुणालातरी मोठें लांबलचक पत्र लिहावयास ती बसली होती, व तें संपविण्याच्या घाईपेक्षां शक्य तितकें लांबविण्याचीच इच्छा तिच्या मनांत होती हें स्पष्ट दिसण्यासारखें होतें.

पहिल्या पानांत अपुऱ्या राहिलेल्या अखेरच्या वाक्याचे उरलेले पांचसहा शब्द दुसऱ्या पानाच्या प्रारंभीं लिहिल्यावर जानी थोडीशी थांबली. उजव्या हातांतील फाउंटन पेन अर्धांवरीं धरून, व डाव्या हाताचीं दोन बोटें अधरोष्ठांवर टेकल्या-

सारखीं करून समोरच्या खिडकींतून दिसणाऱ्या आकाशभागाकडे तिनें टक लावून पाहिलें. जणूं आतां कोणत्या गोष्टीबद्दल लिहावयास प्रारंभ करावा याचा ती आपल्या मनाशीं निश्चय करीत होती. ती क्षणमात्र तशी बसली असतांना एक लहानसा भुंगा तिच्या सुंदर फुगीर केंसांभोंवतीं फिरत राहून जणूं कोणातरी सवंगड्याला कांहींतरी गमतीची बातमी सांगायला एकदम खिडकीबाहेर निघून गेला तें तिच्या लक्षांतहि आलें नाहीं. तिच्या मनाचा निश्चय होतांच तिची दृष्टि आनंदानें चमकली व मग तिनें एकदम जो इंग्रजी मजकूर लिहावयास प्रारंभ केला त्याचें मराठी भाषांतर पुढें दिलें आहे–

" आठदहा दिवसांपूर्वीं इथं लोणावळ्यास एक पाहुणे आले ! त्यांचं नांव विलास. हे कोण तुझ्या लक्षांत आलं का ? मुंबईचे प्रसिद्ध टेनिस चँपियन विलास तुला माहीत आहेत ना ? तेच हे. ते इथं आले आहेत नोकरीच्या निमित्तानं. पण, त्यांचं लक्ष नोकरींत फारसं दिसत नाहीं. किंवा खरं सांगायचं म्हणजे. आम्ही त्यांना नोकरींत फारसं लक्ष घालूं देत नाही. सकाळ संध्याकाळ त्यांना ओढून आणतों आम्ही टेनिसकोर्टवर, अन् खेळायला लावतों दोनदोन तास. ते जर इथं पुष्कळ दिवस राहिले तर माझा खेळ पुष्कळच सुधारेल अशी माझी खात्री आहे. टेनिसप्रमाणंच मोटार हांकण्यांत हे विलास मोठे पटाईत आहेत बरं का. कितीहि वेगानं मोटार चालली तरी मी भिणार नाहीं अशी माझी कल्पना होती; पण परवां माझं चांगलंच गर्वहरण झालं. ते आणखी मी दोघंच होतों त्यांच्या गाडीत. खंडाळ्याला जातांना मिशनच्या शाळेसमोर एक मोठी चढण लागते, तुला माहीत आहे ना ? त्या चढणीवरून एकदम साठ मैलांच्या वेगानं सोडली त्यांनीं गाडी. मी भ्यालें, पण आपल्या भीतीची कबुली देणार नव्हतें मी. पण तितक्यांत त्या वळणाच्या माथ्यावर एक भली मोठी भाड्याची मोटार चुकीच्या बाजूला उभी असल्याचं मला दिसलं. मला

वाटलं, आतां अपघात टळत नाहीं. तुला खोटं वाटेल, पण टक्कर झाल्याचा आवाजसुद्धां मला एकू आला, आणखी लोकांच्या कर्कश किकाळयासुद्धां माझ्या कानांवर पडल्या. मीं डोळे मिटले, किकाळीसुद्धां फोडली वाटतं, आणखी मग काय केलं तें त्या वेळेस मला कांऽऽहीं कळलं नाहीं. मी शुद्धीवर येऊन पहातें तों आमची मोटार सुखरूप उभी होती, आणखी माझं मस्तक विलासच्या छातीवर होतं. त्यांनीं मला हंसत विचारलं,

'भ्यालीस वाटतं ?'

मीं म्हटलं,

'नाहीं. ... पण आतां तुमच्याबरोबर मोटारींत मात्र कधींच येणार नाहीं.'

अन् खरंच अजून गेलें नाहीं.

मात्र गेलें नाही याचं कारण मोटारच्या वेगाची मला भीति वाटते असं नाहीं, तर विलासची अन् माझ्या मनाची मला भीति वाटते. हो, तुझ्यासमक्ष खरं सांगायला काय हरकत आहे? माझ्या या म्हणण्याचा अर्थ तुला कळायचा नाहीं कदाचित्. तो कळायला विलाससारखाच एखादा तरुण तुला भेटायला पाहिजे. अन् त्यांच्यासारखाच एकादा तरुण या जगांत असणं शक्य नाहीं, तेव्हां विलासच तुला भेटले पाहिजेत असंच मी म्हणतें.

ते मलाच फार आवडतात असं नाहीं, तर इथल्या सगळ्याच लोकांना फार आवडतात. आमच्या बाप्पांची तर फार मर्जी आहे त्यांच्यावर. कारण, त्यांच्यासारखाच विलासनाहि शिकारीचा फार षोक आहे. मागच्या शनिवारीं रात्रीं दोघांनीं मिळून इथल्या 'टायगर्स पॉइंट'च्या बाजूला जाऊन एक मोठं धूड मारून आणलं. दुसऱ्या दिवशीं साऱ्या गांवांत तोच एक चर्चेचा विषय होता. बाप्पा आणखी विलास शिकारीच्या गोष्टी काढून एकदां बोलत बसले, कीं मग त्यांच्या गप्पा काहीं केल्या थांबत नाहींत. परवां रात्रीं तर एकदां पुण्याहून येणाऱ्या रात्रीच्या पॅसेंजरच्या वेळेस

स्टेशनवर हजर राहयचं भान उरलं नाहीं बाप्पांना. अन् मग त्यांना आठवण झाल्यावर जी त्यांची धांदल उडाली, ती पाहून हंसतां हंसतां पुरेवाट झाली आम्हांला.

सारांश, विलास इथं आल्यापासून खूप मजा चालली आहे. तूं ये ना एकदां मध सवड काढून केव्हांतरी.

इथली हवा छान आहे सध्यां. उन्हाळ्याचा सीझन अजून लांब आहे; पण यंदा खूप गर्दी होणार अशीं चिन्हं आत्तांच दिसायला लागलीं आहेत. बहुतेक बंगले भाड्यानं गेले सुद्धां.

आमचा जॅक मजेंत आहे. विलास लांब रस्त्यावर दिसले कीं तो मोठ्यानं भोंकतो. अगबाई, हा जॅकच भोंकता कीं! पत्र पुरं करतें हं; माफ कर."

असें लिहून जानीनें खरोखरीच चट्कन् सही करून पत्र पुरें केलें.

लिफाफ्याच्या बाजूवरून जीभ फिरवीत ती उठला, आणि तिनें खिडकींतून बाहेर पाहिलें–

तों खरोखरच विलासची गाडी बंगल्याच्या फाटकापुढें थांबली होती, व विलास खालीं उतरला होता.

मात्र विलास आल्याचें आपण खिडकींतून पाहिलें हें त्याला कळावें अशी जानीची इच्छा दिसली नाहीं. तिने झटकन् बंद केलेलें पत्र टेबलावर टाकलें, व तेवढ्या घाईंतहि भिंतीवरच्या आरशांत स्वतःच्या प्रतिबिंबाकडे ओझरती नजर टाकून, व आपले केंस नीटनेटके करून ती झटकन् कोंपऱ्यांतल्या पियानोपुढच्या उंच स्टुलावर जाऊन बसली. तिनें पियानोच्या पट्ट्यांवर अशा कांहीं आविर्भावानें बोटें टाकलीं, कीं बाहेरून ऐकणाऱ्याला वाटावें, कीं आत वादनाचा अभ्यास बराच वेळ चालला आहे.

विलासनें दारावर टक्टक् असें केलें तें तिला ऐकूं आलें, पण तिनें कांहीं वेळ वर पाहिलेंच नाहीं. आणि शेवटीं पाहिलें तेव्हां तिनें चर्येवर मोठा विस्मय दाखविला.

विलासनें दारांतूनच विचारलें,

"येऊं का आंत ?"

जागेवरून न उठतां जानीनें हंसत 'नको' अशा अर्थी मान हालविली.

"अच्छा. मग उद्यां येईन तर." असें म्हणून विलास जावयासाठीं वळला.

जानीला वाटलें तो खरोखरच जाणार, म्हणून ती एकदम ओरडली,

"हें काय ! या ना."

आणि मग विलास हास्य करीत जवळ आला तेव्हां तिनें विचारलें,

"खुशाल चाललां होतांत काय ?"

"तूं नको म्हणालीस म्हणून मी जात होतों."

"वा ! नको म्हणजे खरंच नको समजलांत वाटतं ?"

"मग नको याचा दुसरा अर्थ काय बुवा ?"

"नको म्हणजे 'हो' येवढंसुद्धां कळत नाहीं ?"

विलासनें किंचित् हास्य करून म्हटलें,

"असं असं. पण बायकांचा शब्दकोश नेहमींच नाहीं ध्यानांत रहात."

जानीनें त्याच्याकडे रोखून पाहिलें. तिच्या मनांत आलें, हा तरुण मुग्धपणाचें असें सोंग कां बरें करीत आहे ? कां याला यौवनसुलभ स्त्रीविषयक आकर्षण पूर्ण बंदिवान करूं शकतच नाहीं ?—

तितक्यांत विलासनें विचारलें,

"पियानोचं प्रॅक्टिस करीत होतीस वाटतं ? हा गुण इतके दिवस कां लपवून ठेवलास माझ्यापासून ?"

"छीः ! गुण कुठला ? थोडंसं वाजवतें आणि गातें झालं."

" का होईना. पाहूं तरी ?"

" छे, छे. तुम्ही जवळ असल्यावर मला भीति वाटते."

" ठीक आहे. मी बाहेर व्हरांड्यात जाऊन ऐकतो."

" तसं नाहीं, पण तुमची मला खरंच भीति वाटते. हा पहा माझा हात घामानं किती ओला झाला आहे."

असें म्हणून जानीनें आपला उजवा तळहात त्याच्या डाव्या गालावर टेंकला.

तिच्या हातावर आपला डावा तळहात टेंकून विलास म्हणाला,

" खरंच, किती गार आहे तुझा हात ! अन् कांपतो आहे तरी किती !"

" म्हणूनच म्हणतें, दुसऱ्या एखाद्या वेळेस दाखवीन वाजवून "

" वा ! असं कसं ? दुसरी वेळ येईल म्हणून वाट पहाण्या-सारखा दुसरा मूर्खपणा नाही, असं मीं कुठंसं वाचलंय्. हूं चल, वाजव."

" पण नांवं ठेवायचीं नाहीत हं !"

असें लाडिकपणें म्हणून जानीनें पियानोच्या पट्ट्यांवर दोन्ही हातांचीं बोटें दाबण्यास प्रारंभ केला, व भीतभीत आपला आवाज पियानोच्या आवाजांत मिसळला. पियानोची भरपूर साथ घेत ती म्हणूं लागली—

O, lovely moon
Come out soon !
To my honey
I want to croon
Love's tune !

त्या पदाचीं पुढचीं कडवीं यांहूनहि अधिक प्रणयभावानें भरलेलीं होतीं, तीं म्हणतां म्हणतां जानीची मुद्रा कांहीं एका

विलक्षण प्रसन्नतेनें शोभूं लागली. एकीकडे पदांतील शब्दोच्चार भावपूर्णतेने करतांना तिनें जी निश्चल नजर विलासकडे लावली होती, तिच्यांत आनंदाचें चांचल्य आणि आर्जवाचें जडत्व दोन्हीं सारखीच भरलीं होतीं.

जणूं स्वतःच्या चेहऱ्यावर चढलेला उल्हास आणि नजरेंत कांठोकांठ भरलेला मादकपणा जानीला उत्तरोत्तर असह्य होत गेला, आणि सगळीं कडव्यीं संपवून अखेर पालुपदाच्या प्रारंभांतील 'Moon' हा शब्द तारसप्तकांतील गंधारावर जेव्हां तिनें सोडला, तेव्हां तिचें स्वतःचें भानहि सुटले, आणि आपल्या दोन्ही हातांचा विलासच्या मानेभोंवतीं झट्कन् विळखा टाकून तिनें त्याचें मस्तक जवळ आणून त्याच्या मुखाचें चुंबन घेतले.

त्या क्षणी तिच्या अंगांतील कंप इतका वाढला होता, कीं त्यामुळें आपल्या शरिराचे अणून् अणू वेगवेगळे होऊन गळून तर पडत नाहींत ना, असें विलक्षण भय तिला वाटले विलासच्या सशक्त डाव्या हाताचा विळखा तिला नीटसा कळला नाहीं. त्याच्या प्रतिचुंबनाची गोडीहि तिच्या ओंठांना धड कळली नाहीं. आपल्या देहाचा कंप असाच कल्पांतापर्यंत चालूं रहाणार कीं काय, तिला कळेना !

नंतर ती विलासबरोबर टेनिसकोर्टवर गेली ती अर्धवट बेशुद्धींतच, आणि खेळूं लागली तीहि बेशुद्धींतच ! तिला चेंडू दिसेना, कोर्टवरच्या पांढऱ्या स्वच्छ रेषाहि दिसेनात, आणि तिच्या हातांतून रॅकेट पुनःपुन्हा गळून पडूं लागली !

विलासकडे सरळ निर्भयपणानें पहाण्याचें तिला धैर्य होईना, पण तिनें दोनचार वेळां झटकन् चोरून पाहिलें तेवढ्यांत तिला दिसलें, कीं त्याची वृत्ति यत्किंचित्हि चळली नव्हती ! तो नेहमींप्रमाणेंच सावधान होता, आणि नेहमीप्रमाणेंच खेळत होता.

त्या गोष्टीचें तिला मनस्वी आश्चर्य वाटलें !

ती मनाशी विचार करूं लागली, ज्या ज्वालेनें मी भस्मसात् झालें, तिचा चटकाहि या पुरुषाला लागला नाहीं ? सारेच पुरुष

असे असतात काय ? कीं या तरुणाचीच ही एक असामान्य वृत्ति आहे ? मोठा विलक्षण आहे हा विलास !........

खेळ आटपल्यावर विलास तिला हळूच म्हणाला,

"मी तुला घरीं पोंचवतों; बैस गाडींत."

"नको, मी जाईन चालत."

"छे, तुझी तब्येत नाहीं बरोबर दिसत."

"मला काय झालंय ?"

"मला काय माहीत ? हं चल चल, बैस गाडींत."

असें म्हणून त्यानें तिला बसविलेंच व गाडी सुरू केली.

गाडी आपल्या बंगल्याकडे जाण्याऐवजीं बाजाराकडे निघालेली पाहून जानीनें आश्चर्यानें विचारलें,

"हें काय ? इकडे कोणीकडे निघालांत ?"

"आपण आइस्क्रीम घेऊं थोडं; तुला बरं वाटेल."

असें उत्तर देऊन विलासनें गाडीला अधिक वेग दिला.

पण ज्या हॉटेलमध्यें विलासच्या मनांत जावयाचें होतें त्याच्या अलीकडील चौकांत येतांच गाडी थांबविणें त्याला भाग पडलें.

कारण, तीनचारशें लोकांचा एक मोठा जमाव समोरून येत होता. जमावांतले लोक 'गांधीमहाराज की जय' 'सत्याग्रह की जय' अशा आरोळ्या ठोकीत होते. जमावाच्या अग्रभागीं दोन उंचउंच बांबूंना बांधलेला एक लांबरुंद कापडाचा पट्टा ध्वजासारखा हातीं धरून लोक चालले होते. त्यावर मोठमोठ्या अक्षरांनीं लिहिलें होतें, 'गरीब शेतकऱ्यांना वांचवा ! तळवलीच्या सत्याग्रहांत सामील व्हा !' याच किंवा अशा अर्थाच्या दुसऱ्या मजकुराचीं लहानमोठीं निशाणें बऱ्याच लोकांनीं हातीं धरलीं होतीं; ते तीं मधूनमधून उंच करीत, व त्यावरील मजकुराचा ओरडून जयघोष करीत. जमावांत बहुतेक कमरेला रुंद लंगोटी, अंगावर एखादें कांबळें, आणि डोक्यावर अस्ताव्यस्त मुंडासें अशा थाटाचे शेतकरीच होते. पन्नाससाठ शेतकरी बायाहि त्या गर्दींत शिरल्या होत्या, आणि वहावीस लहान मुलेंहि ओरडत आरडत चाललीं होतीं.

तो जमाव अंगावरून जात असतां जानीनें विलासला विचारलें,

"काय, आहे तरी काय हा प्रकार ?"

विलास म्हणाला,

"कुणास ठाऊक ! मलाहि माहीत नाही."

तितक्यांत त्या गर्दीतला एक माणूस मध्येंच थबकला, आणि रस्त्याच्या कडेला उभ्या असलेल्या लोकांना उद्देशून म्हणाला,

"मुंबईची एक पारशी कंपनी आमच्या जमिनीवरून आणखी घरादारावरून नांगर फिरवायसाठीं आली आहे. आम्हांला वांचवा. आमच्या सत्याग्रहाला मदत करा."

हे शब्द त्यानें पुन पुन्हा तीनचार वेळां उच्चारले, आणि मग तो गर्दीबरोबर पुढें गेला.

जानी विलासला म्हणाली,

"तुमच्या कंपनीचं नांव घेतलं ना त्यानं ?"

"आं.... हो, असं दिसतंय्."

असें जवळ जवळ स्वगतच विलासनें म्हटलें, व त्याचा चेहरा त्रस्त आणि गंभीर झाला.

मोगाबजी दिनशा कंपनीनें योजिलेल्या तलावाविरुद्ध तळवळीने शेतकरी सत्याग्रह करणार असतील हे आतांपर्यंत त्याच्या ध्यानीमनीहि नव्हतें आणि शेतकऱ्यांनी सत्याग्रह का करावा हे तर त्याला मुळींच समजेना. जी नोकरी करण्यासाठीं तो लोणावळ्यास येऊन दाखल झाला होता, त्या नोकरीच्या क्षेत्रांत सत्याग्रहाच्या चळवळीची वावटळ उठेल अशी त्याची यत्किंचित्हि कल्पना नव्हती. जें वातावरण त्याने आजपर्यंत कटाक्षानें टाळलें होतें—किंबहुना ज्या वातावरणाच्या स्वरूपाची कधीं एखाद्या चित्रांत पाहिलेल्या वादळाच्या देखाव्याइतकीहि त्याच्या नजरेला संवय नव्हती, त्या वातावरणांत आपण नोकरीच्या निमित्तानें अचानक सांपडत आहोंत, या घटनेचा त्याला विलक्षण आचंबा वाटला, आणि कांहींसा रागहि आला.

आणि रात्रीं जेव्हां कँपवर गेल्यावर तेथें सोराबजी दिनशा कंपनीचे डायरेक्टर्स व कांही सरकारी अधिकारी एकत्र जमून एका खोलींत गुप्त खलबत करीत असल्याचें त्याला कळलें तेव्हा तर त्याची मनःस्थिति अधिकच त्रस्त झाली.

म्हरांड्यांतील एका ईझीचेअरवर त्यानें अंग टाकले, आणि नोकरांकडून व्हिस्की मागवून घेऊन ती प्राशन करून सिगारेट ओढीत तो स्वस्थ पडला.

तितक्यांत कोणीसें त्याच्याजवळ येऊन म्हटलें,

" वा विलास, एकटा एकटा घेतो आहेस काय व्हिस्की ? "

विलासनें वर पाहिलें तों आपल्यापुढें मुंबईतल्या गुप्त पोलीस कचेरींतील इन्स्पेक्टर भार्गवराम उभा असल्याचें त्याला दिसलें.

विलासची व त्याची विशेष ओळख होती असें नव्हे; पण कधींमधी तो विलासला क्लबावर अथवा एखाद्या हॉटेलांत भेटत असे. विलासनें त्याच्यासाठीं आणखी एक ग्लास नोकराकडून मागविला, व मग त्याला विचारले,

" तूं इकडे कोणीकडे ?"

ग्लासांतील व्हिस्की पिऊन रुमालानें ओंठ चांचपीत भार्गवराम म्हणाला,

" तळवलीला मोठा सत्याग्रह होणार असा रंग दिसतो. म्हणून इथं हजर रहाण्याबद्दल मला हुकूम झाला आहे. "

विलासनें विचारलें,

" सत्याग्रह म्हणजे काय करणार आहेत हे लोक ?"

" जिथं तुम्ही तलाव खोदणार आहांत तिथं जमिनीवर पालथे पडून रहाणार आहेत. गोळ्या घातल्या तरी उठणार नाहींत. "

" अस्सं ? इतकी अक्कल आली आमच्या शेतकऱ्यांना ?"

" त्यांची स्वतःची नाहीं ही अक्कल. त्यांना शिकविणारी व्यक्ति निराळीच आहे. ती एक स्त्री आहे. "

" काय ?"

" हो, ती एक स्त्री आहे. तिचं नांव आशा."

" आशा ?"

विलासच्या स्वरांत विलक्षण तीव्रता कां यावी तें भार्गवरामाला कळलें नाहीं. तो त्याबद्दल त्याला विचारणार होता.

पण विलास एकदम खुर्चीवरून उठला आणि व्हरांड्याच्या टोंकाला जाऊन कठड्याला टेंकून उभा राहिला.

समोर खोल दरीचें अजस्र मुख होतें तें दाट काळोखानें भरून गेलें होतें. भोंवतालचा अंधःकार इतका निबिड होता, कीं लहानमोठ्या झाडांचें अस्तित्व केवळ वाऱ्यावर सळसळणाऱ्या पानांचा आवाज ऐकल्यानेच समजत होतें. दूरवर कोठेंतरी एखादें हिंस्र श्वापद गुरगुरल्याचा अस्पष्ट भास झाला. तेवढ्यांत आत्तांपर्यंत न दिसलेली एक तेजस्वी चांदणी क्षितिजरेषेवर उदय पावली.

त्या चांदणीकडे निरखून पहात विलास हळूच म्हणाला,

" आशा ! "

---

# प्रकरण ६ वें

---

तिन्हीसांजा उलटून जरी काळोख पडला होता, आणि काल्र्यापासून लोणावळ्यापर्यंतचा पुणें-मुंबई रस्त्याचा भाग जरी नेहमीं खाचखळग्यांनीं भरलेला होता, तरी विलासनें आपली मोटर जोरांत सोडली होती. कारण, गाडी त्याच्या हातांत रुळलेली असून तिचे दिवे अतिशय चांगले होते. शिवाय गाडी मंद गतीनें हांकणें विलासच्या स्वभावाला माहीतच नव्हतें. आणि तशांत दिवसभराच्या कामानें विलास त्रासून गेला होता, व केव्हां एकदां कँपवर पोंचून विश्रांति घेऊं अशी त्याला घाई झाली होती.

तलावाच्या कामावरील कंपनीचा मुख्य एंजिनिअर सरकारी एंजिनिअराचा पाहुणचार झोडण्यासाठीं गेले दोन दिवस कार्ला येथील पी. डब्ल्यू. डी.च्या बंगल्यांत येऊन राहिला होता, व त्यामुळें आपलें काम समजावून घेण्यासाठीं विलासला रोज काल्र्यापर्यंत हेलपाटा घालावा लागत होता. या हेलपाटयांची तर विलासला चीड आलीच होती. कारण, त्यामुळें त्याचें टेनिस बंद पडलें होतें. पण त्या हेलपाटयांपेक्षांहि कामाच्या स्वरूपाचा, काम करतां करतां मध्येंच तळवलीच्या सत्याग्रहाबद्दल जी चर्चा निघे त्या चर्चेचा, आणि एकंदरींत इमानेंइतबारें वर्षानुवर्षं नोकरींत मुरल्यामुळें ज्यांचीं पोटें सुटलीं होतीं, हनुवटया दुहेरी झाल्या होत्या, आणि डोक्यावरील केंस आणि डोक्यांतील सुविचार विरळ झाले होते, अशा त्या दोघां बडया एंजिनिअरसाहेबांच्या संगतीचा त्याला अधिक वीट आला होता. नकाशांच्या कागदांचीं तीं मोठमोठीं भेंडोळीं, त्यांचीं जस्ती झांकणें, ड्रॉइंगचे मोठमोठाले बोर्ड, आणि कंपास-पट्टयांसारखीं भाराभर हत्यारें त्याला दृष्टीसमोर नकोशीं वाटूं लागलीं होतीं. कमानींचे आणि भिंतींचे नकाशे वरिष्ठांस

पुनःपुन्हा दाखवून आणि दुरुस्त करून तो हळुहळु चिडू लागला होता. आणि त्याचा वरिष्ठ एंजिनिअर जेव्हां कारण नसतां मध्येंच एकदम विचारी,

"काय हो, या सत्याग्रहाबद्दल तुमचं काय मत आहे?"

तेव्हा दर वेळीं त्याला उत्तर द्यावेसें वाटे की,

"तुमच्याबद्दल माझं फार वाईट मत आहे येवढं खास!"

पण हें उत्तर मनातल्या मनांत ठेवणें भाग असे, व वरिष्ठ एंजिनिअर सत्याग्रहाबद्दल जे जे बोलतील त्याला हू हूं करीत तो तें सारें ऐकून घेत असे.

वरिष्ठांच्या त्या बोलण्यावरून त्याला एवढे मात्र स्पष्ट समजले होतें, की तळवलींचा सत्याग्रह आपण हां हां म्हणतां दडपून टाकूं अशी जी कंपनीच्या डायरेक्टर लोकांनीं प्रथम कल्पना केली होती, ती हळुहळु व्यर्थ ठरूं लागली होती; आणि आशा नांवाची जी कोणी मुलगी लोकांच्या चळवळीचीं सूत्रें हालवीत होती तिची डायरेक्टर लोकाना चांगलीच दहशत वाटूं लागली होती. वरिष्ठांची बोलणी ऐकतां ऐकतां तो मनाशीं विचार करी,

"ही आशा आहे तरी कोण? पाहिली पाहिजे एकदां."

आत्तां मोटार वेगानें मोडून रस्ता कांपतां कांपतां देखील काल्यांच्या बंगल्यावर दिवसभर पुनःपुन्हा ऐकलेली चर्चा जरी विसरण्याचा तो प्रयत्न करीत होता, तरी एकीकडे त्याचें मन म्हणत होतें,

"ही आशा आहे तरी कोण? पाहिली पाहिजे एकदां."

आतां अंधार खूपच वाढला होता. रस्त्याच्या दोन्ही कडा लक्षपूर्वक न्याहाळाव्या लागत होत्या. मध्येंच एखादी मोटार भेटे, व तिनें उठविलेला धुळीचा थरच्या थर दिव्यांच्या झगझगीत प्रकाशांत बराच वेळ दिसे. एखाद्या ठिकाणीं चरून उशीरां परतलेलीं गुरें अस्ताव्यस्तपणें रस्ता ओलांडीत असत. निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या वृक्षांचे व झाडपाल्यांचे कमीअधिक

उग्र अगर सुखदायक दर्प ओलांडून गेल्याचा भास होई. मध्येंच रस्त्याच्या उजव्या कडेनें नदी वहात असावीसें विलासला वाटलें. कारण, त्याच्या अंगावरून वहाणाऱ्या वाऱ्यांत एकदम बराचसा थंड ओलावा आढळून आला. त्यानें कोटाच्या कॉलरीच्या दोन्ही बाजू उलटया फिरवून गळचापाशीं डाव्या हातांत धरल्या. तितक्यांत रेल्वेचें फाटक लागलें म्हणून त्यानें गाडीचा वेग कमी केला, आणि मग फाटक मागें टाकल्यावर जणूं मंद गतीची भरपाई करण्यासाठीं गाडी खूपच वेगानें मोडली.

सूं ... असा आवाज करीत गाडी निघालेली पाहून त्याला बरें वाटलें. त्याला सिगरेटची आठवण झाली. सिगरेट तोंडांत धरून, समोरच्या रस्त्यावरील लक्ष शक्य तितकें कायम ठेवून, जळत्या काडीवर सिगरेटचें टोंक टेंकण्यासाठीं त्यानें मान किंचित् खालीं केली.

त्याच वेळीं मोठ्या खड्ड्यांतून गेल्याप्रमाणें त्याच्या गाडीनें धडक खाल्ली. गाडी भलतीकडे वळूं नये म्हणून त्यानें झटकन् हांकण्याच्या चाकावर हात टाकले.

पण त्याच क्षणीं गाडीचे दिवे विझले. अंधाराखेरीज विलासला कांहींच दिसेना. रस्ता कोणीकडे आणि रान कोणीकडे त्याला कळेना. ब्रेक दाबण्याचें त्याच्या मनांत आलें, पण त्यानें ते दाबण्यापूर्वींच गाडी घसरून बऱ्याच खोलांत कोठेंतरी हापटल्यासारखें त्याला वाटलें. त्याच्या पावलांत कसलीतरी असह्य शिणीक चमकली. त्याच्या कानांत कर्कश आवाज झाले. डोळयांपुढें तांबडयालाल रंगाचा समुद्रच्या समुद्र उचंबळून आला. आणि मग काय झालें तें त्याला कांहींच कळलें नाही !

००० ००० ०००

“आशा ऊठ. आशा ऊठ.”

या शब्दांनीं तो प्रथम जागा झाला. त्या शब्दांचें त्याला विलक्षण आश्चर्य वाटलें.

"आशा ऊठ." आशेचा आपल्या खोलींत काय संबंध? चहा तयार असल्याची वर्दी देणाऱ्या आपल्या नोकराऐवजीं आशेला ऊठ म्हणून सांगणारें हें कोण मनुष्य आपल्या खोलींत आहे?.... कां आपल्या मनांत सतत चालू रहाणाऱ्या आशेबद्दलच्या विचारांनीं हा शब्दांचा भास निर्माण केला? .. "तसंच असलं पाहिजे" असें तो मनाशीं म्हणणार इतक्यांत त्याला पुन्हा ऐकू आलें,

"आशा ऊठ. आशा ऊठ."

मात्र या वेळीं तो शब्द मनुष्याचा नसून पोपटाचा आहे हें विलासच्या ध्यानांत आलें व आपण आपल्या कँपवरील खोलींत नसून दुसऱ्या कोठल्यातरी जागेंत आहोंत ही कल्पना त्याच्या मनांत ताबडतोब आली.

मग त्याला रात्रीचा अपघात आठवला; व अंगावरचें पांघरूण त्यानें चांचपून पाहिलें तेव्हां त्याची खात्रीच पटली कीं, आपण आपल्या स्वतःच्या अंथरुणावर नाही.

अशी खरखरीत घोंगडी त्याच्या अंथरुणावर असणें कधीं शक्य होतें काय?

आपण आहोंत तरी कोठें हें समजून घेण्यासाठीं विलासनें डोळे उघडून पाहिलें; परंतु त्याला नीटसें कांहींच दिसेना. उजवीकडे एक लहान बैठी खिडकी होती, तिच्यांतून धुक्यासारखा तांबूस मंद प्रकाश हलकेंच आंत शिरत होता. बाहेर कोठेंतरी पक्ष्यांची किलबिल चालली होती. अगदीं जवळ कुठेंतरी गुरांनीं लांकडी ओंडक्यावर आपलीं शिंगें घांसावीं तसा आवाज होत होता. मध्येंच एका बैलानें डरकाळी फोडल्यासारखें त्याला वाटलें. गुरांच्या गळ्यांतल्या घंटा हालल्या, त्यांचा आवाज त्याला ऐकू आला. कुणीतरी सडा शिपडीत असलें पाहिजे; कुणीं हलकेंच गाणें म्हणत होतें काय?.......

दुरंधार सपला। भारता। अरुणोदय झाला।
उठि लवकर नरवीरा। उदयाचलीं मित्र आला।

किती गोड होता तो आवाज ? आणि त्या भूपाळींतील शब्द किती नवीन होते ? स्वातंत्र्याचा अरुणोदय झाल्याचें आश्वासन देऊन भारताला उठविणारी कुणी देवता आसपास वावरत होती काय ? ......

दुरंधार संपला। भारता। अरुणोदय झाला।
उठि लवकर नरवीरा। उदयाचलीं मित्र आला।

अशी विलक्षण पहांट विलासनें आजपर्यंत कधीं अनुभविली नव्हती. गुडघाभर मऊमऊ गादींतच जागृतीचा पहिला क्षण अनुभविण्याची त्याला संवय होती. झोंप संपून डोळे उघडावेत तों सूर्यप्रकाश खोलींत जिकडे तिकडे भरलेला दिसावा असा त्याचा नेहमींचा अनुभव होता. पहांटेच्या प्रहरीं कधीं जागृति आलीच तर आदल्या दिवशींच्या श्रमानें अगर चैनीच्या अतिरेकानें सर्वांगावर आलेला थकवा तेवढा त्याच्या लक्षांत येत गेला होता.

आजच्यासारखी जागृति विलासच्या अनुभवाला प्रथमच येत होती.

बाहेरच्या सडासंमार्जनाचा आवाज थांबला.

भूपाळीच्या शब्दांचा तो मधुर नादहि ऐकूं येईनासा झाला.

झटकन् उठून बाहेर जावें, आणि क्षणमात्रच अनुभवाला आलेलें व लगेच नष्ट होऊं पहाणारें तें सुखकारक स्वप्न पकडून धरून ठेवावें अशी विलासला जबरदस्त इच्छा झाली.

त्या इच्छेनुरूप त्याच्या पावलांचे स्नायू हालले असावेत.

कारण, त्याच्या पावलांतून एकदम शिणीक उठली, त्या वेळीं त्याच्या लक्षांत आलें, कीं कालच्या रात्रींच्या अपघातांत आपल्या पावलालाच मोठी इजा झालेली असली पाहिजे.

पावलांत निघालेली कळ सहन करण्यासाठीं त्यानें डोळे मिटले. त्याच वेळीं समोरच्या त्या बैठ्या खिडकींतून वाऱ्याची थंड झुळूक वाहूं लागली. थोड्याच वेळांत विलास पुन्हा निद्रावश झाला.

नंतर दोनतीन घटकांनी विलास पुन्हा जागा झाला, तो खोलींत जिकडे तिकडे ताज्या फुलांचा नाजुक सुगंध दरवळला आहे असें वाटल्यानें जागा झाला

प्रथम क्षणमात्र डोळे झांकलेले ठेवूनच त्यानें त्या सुगंधाचा उपभोग घेतला. पण, दुसऱ्याच क्षणी माणसाची चाहूल झाल्याशी वाटल्यामुळें त्याच्या संकल्पाची वाट न पाहतां त्याचे डोळे एकदम उघडले. त्यानें पाहिलें तों एक तरुण स्त्री भिंतीवरच्या एका तसबिरीला हार घालीत होती !

तिची पाठमोरीच आकृति त्याला दिसत होती. पण तेव-ढ्यावरून तो उंच व सडपातळ असावीसें त्याला वाटलें. तिनें परिधान केलेलें वस्त्र जाडयाभरडया खादीचें होतें. परंतु, त्याची शुभ्रता अगदीं निष्कलंक होती. तसबिरीला माळ घालण्यासाठीं तिनें हात वर केले असल्यामुळें तिच्या उजव्या स्कंधावरून ढळ-लेल्या पदराचें टोंक जवळजवळ तिच्या उजव्या पोटरीला लागले होतें; आणि पदराच्या भागावर छापलेलें तिरंगी निशाण माळेंत ओंवल्याप्रमाणें हेलकावे खात होतें. तिच्या स्कंधभागावरून ओळखतां येणारा तिच्या देहाचा सडपातळपणा पुष्पहाराचीं टोंकें धरणाऱ्या तिच्या उघडया बाहूंवरून स्पष्टच व्यक्त होत होता; व त्या गौरवर्ण बाहूंवरून तिची अंगकांति अतिशयच मोहक अस-ल्याचें दिसत होतें. तसबिरीकडे मनोभावानें पहातांना तिची हनुवटी बरीचशी उचलली गेल्याकारणानें तिच्या अर्धमुक्त केश-कलापाचा भाग मानेवर रुळत होता. इतका विपुल केशभार विलासनें आजपर्यंत कोणत्याहि स्त्रीच्या ठिकाणीं पाहिला नव्हता. तो त्याकडे अगदीं टक लावून पहात राहिला

ती तरुण स्त्री एकदम वळली तेव्हां त्याला कल्पनाहि नव्हती कीं ती वळेल. नाहींतर आपली रोंखलेली नजर त्यानें दूर केली असती. पण, तितका अवकाशच त्याला मिळाला नाहीं; आणि तिची त्याची नजरानजर होतांच आपण असें

पकडले गेलों हे बरें नव्हे, असाच विचार विलासच्या मनांत प्रथम आला.

परंतु, दृष्टादृष्ट होताच त्या मुलीच्या चर्येवर जो भाव त्याला दिसला तो पहातांच आपल्या मनांतली शंका व्यर्थ आहे असें विलासला वाटलें. कारण, पुरुषांच्या नजरेंतील बऱ्यावाईट अभिप्रायाचा विचार करणाऱ्या स्त्रीची ती मुद्रा नव्हती ! स्त्रीचे मुख पहाताच त्याच्या सौदर्याचा अदमास घेण्यास सरावलेल्या विलासच्या दृष्टीला किंचित् गांगरल्यासारखें झालें. ही स्त्री सुंदर आहे की नाही असें त्याला त्या क्षणी कोणी विचारलें असते तर त्याला उत्तर देतां आलें नसते. कारण, त्या मुलीच्या मुख-मंडलावर जें विलक्षण तेज होतें ते पाहणाऱ्याच्या दृष्टीला पार्थिव सौंदर्याचा विचारच करूं देत नव्हतें. तिचे किंचित् बारीकसे परतु भेदक डोळे, सैल केशभारामुळें लहान दिसणारें परंतु शोभिवंत कपाळ, नासिकेच्या सरळ रेषेखाली कांहीशी अनपेक्षितच भासणारी तिच्या जिव्हणीची रुंद रेषा, आणि तिची चिंचोळी हनुवटी या कोणत्याहि गोष्टींपेक्षां तिच्या चेहऱ्याभोंवतीं जें तरल तेजोवलय हालल्यासारखें विलासला दिसलें त्याकडेच तो पहात राहिला.

ती आपल्याकडे पाहून हंसली की काय तें विलासला कळलें नाहीं. परंतु, 'आपण जागे आहांत काय ?' अशा किंचित् विस्मयजन्य व आर्जवी प्रश्नाचा अभिप्राय तिच्या त्या वेळच्या दृष्टींत होता असें विलासला खचित वाटलें.

आपण काय बोलावें याबद्दल विलासचा विचार पुरा झाला नाहीं तोंच ती तेथून गेलीहि.

विलासनें आजूबाजूस पाहिलें तों ज्या वस्तु पहाण्याची त्याच्या दृष्टीला संवय नव्हती अशा वस्तूंनींच ती खोली बहुतांशीं भरलेली होती. त्याच्या समोरच्या व बाजूच्या भिंतीवर सातआठ तसबिरी होत्या. त्यांपैकीं गांधींची व टिळकांची तसबीर त्यानें

चट्कन् ओळखली; पण बाकीच्या त्याला ओळखतां आल्या नाहींत. भिंतीवर वर्तमानपत्रांच्या दोनतीन फायली व्यवस्थित बांधून खिळयाला टांगल्या होत्या. त्यांतील एका फायलीवर 'YOUNG INDIA' असें ठळक नांव दिसलें. एका कोंपऱ्यांत लांकडी बैठकीवर एक चरखा ठेवलेला होता. चरख्याशेजारींच हातसुताच्या आणि हातविणीच्या शुभ्र खादीचा लहानसा गठ्ठा पडला होता.

या अपरिचित वस्तूकडे पहात विलास मनाशीं विचार करूं लागला– हें घर आहे तरी कुणाचें ?.... आणि क्षणमात्र डोळ्यां-पुढें दिसून जी अंतर्धान पावली ती स्त्री कोण असावी ? ... आशाच काय ?....

तितक्यांत ती मुलगी पुन्हा खोलींत आलेली विलासला दिसली. तिच्या हातीं कपबशी होती.

ती अगदीं जवळ आली, व वांकून म्हणाली,

"चूळ भरून थोडा चहा घेत असाल तर घ्या."

विलास उठून बसूं लागला तोंच त्याच्या पावलांत चमक आली व त्यानें विव्हळल्यासारखा शब्द केला.

तिनें चट्कन् कपबशी खालीं ठेवून म्हटलें,

"छे छे ! उठून चालायचं नाहीं. आमच्या भाऊंनी तुमचा पाय काल रात्रीं बांधला आहे. शक्य तों तुम्हीं पडूनच राहि पाहिजे."

मग पडल्यापडल्याच विलासनें चूळ भरली, व चहाचा कप हातीं घेतला.

ती जवळ बसली व म्हणाली,

"आपण उठाल म्हणून भाऊंनीं इतका वेळ वाट पाहिली, अन् ते आत्तांच शेतावर गेले. पण खरंच, मी ज्यांना भाऊ म्हणतें आहे, ते कोण अन् मी कोण याबद्दल आपणांला आश्चर्य वाटत असेल, नाहीं ? माझं नांव आशा. आणि भाऊ म्हणजे माझे वडील. इथं तळवलीला आमची थोडी शेती आहे."

तेवढ्यांत विलासनें चहा संपवला होता.

नेहमींच्या संवयीप्रमाणें त्यानें उशीखालीं हात घातला, व त्या वेळीं हवी ती वस्तु न सांपडल्यासारखी त्याची चर्या झाली.

तिनें विचारलें,

" काय हवं आहे ? "

" नाहीं; सिगरेट. माझ्या कोटाच्या खिशांत असेल. तुमची हरकत नसेल तर ओढतों. "

" हरकत कसली ? "

असें हंसत म्हणून ती उठली, व त्याच्या उशाच्या बाजूस कोठेंतरी त्याचा कोट होता त्यांतून सिगरेटची डबी व काड्याची पेटी आणून तिनें त्याच्यापुढें ठेवली.

सिगरेट ओढतां ओढतां विलासनें विचारलें,

" मी कोण आहे अशी तुमची कल्पना आहे ? "

" आमची कांहींच कल्पना नाहीं. आपण अपघातांत सांपड-लांत आणखी आमच्या घरीं सुखरूप आहांत हें कोणाला कळवायचं असेल तर आपणांला विचारावं म्हणून भाऊ इतका वेळ मुद्दाम थांबले होते. धाडायचा आहे का कुणाला निरोप ? "

" म्हणजे ? इथून मला लवकर हालतां यायचं नाहीं का ? "

" आपला पाय पुरता बरा होईपर्यंत आपण इथं रहावं हें चांगलं. आम्ही आपली उत्तम काळजी घेऊं. पण आपण कुठं आहांत हें न समजून काळजींत राहणारीं कुणी माणसं असतील तर त्यांना निरोप धाडलेला बरा. धाडायचा आहे का निरोप ? स्टेशनवरून तार करतां येईल. "

" मग लोणावळ्यास करा तर तार. "

" म्हणजे ? आपण लोणावळ्यास राहतां ? "

" नाहीं. आमचं घर मुंबईस आहे; पण सध्या माझा मुक्काम लोणावळ्यास आहे. मला वाटतं, तुम्हीसुद्धां नेहमीं मुंबईसच असतां, नाहीं ? "

विलासचा तो प्रश्न किंचित् अनपेक्षित होता. पण, तो ऐकून आशेनें विस्मय न दाखवता सहज उत्तर दिलें,

"होय. माझं कॉलिजांतलं शिक्षण पुरं झाल्यावर सामान्य क्रमाप्रमाणं कुठंतरी नोकरी पत्करण्याऐवजीं मीं मुंबईस जाऊन परळच्या भागांत एक लहानशी डेअरी काढली आहे. गरीब लोकांना अगदीं उत्तम दूध शक्य तितक्या स्वस्त भावांत द्यावं असा माझा प्रयत्न आहे. अन् शिवाय या डेअरीच्या निमित्तानं गरीब-गुरिबांशीं माझा संबंधहि पुष्कळ येतो, आणखी त्यांना त्यांच्या हिताच्या आणि देशकार्याच्या चार गोष्टीहि मला सांगतां येतात."

हें सांगताना आपल्या अत्यंत आवडीच्या गोष्टीबद्दल बोल-तांना माणसाची चर्या जशी प्रफुल्ल होते, तशी तिची चर्या झालेली विलासला दिसली.

का कुणास ठाऊक, तो झटकन् म्हणाला,

"तुमचं नांव मला प्रथम शरच्चंद्राकडून कळलं."

हें ऐकून मात्र आशेला आश्चर्य वाटलेंसें दिसलें. तिनें विचारलें,

"म्हणजे ? शरच्चंद्रांशीं आपला परिचय आहे ?"

"होय. पूर्वीं तो अन् मी मिळून पुष्कळच टेनिस खेळलों आहोंत."

"मग हें छान झालं कीं ! शरच्चंद्र आज इथं यायचेच आहेत."

आतां आश्चर्य करण्याची पाळी विलासची होती. त्यानें विचारलें,

"शरच्चंद्र इथं येणार आहे ? तो कशाला ?"

या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर दिल्यास पाहुण्यांना कळेल किंवा नाहीं अशा शंकेनें आशा क्षणमात्र थांबली, व मग म्हणाली,

"ते आल्यावर कळेल आपल्याला. आपण आतां स्वस्थ

पडा. आपणाला इतकं बोलण्याचा त्रास मीं दिला हेंच गैर झालं कीं काय कुणास ठाऊक ? ”

असें म्हणून आशेनें कपबशी, उचलली आणि ती आंत गेली.

विलासनें तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे टक लावून पाहिलें. तिच्या गोऱ्यापान मानेवरचा अर्धमुक्त विपुल केशभार त्याच्या नजरेला मग किती वेळ तरी दिसत होता आणि एकीकडे कल्पनाचक्षूंना दिसणारा तो केशभार पाहतां पाहतां आंत घरांत आशेची जो चाहूल चालली होती ती तो लक्षपूर्वक ऐकत होता.

---

# प्रकरण ७ वें

---

अगदीं भिन्न परिस्थितींतील आणि भिन्न स्वभावाच्या दोन व्यक्ती प्रसंगवशात् एकत्र आल्या व त्यांस एकमेकांचा थोडा-फार सहवास घडला तर दोघांच्याहि मनांत परस्परांविषयीं विस्मय आणि जिज्ञासा उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. समानधर्मीयांच्या-पेक्षांहि भिन्न प्रकृतीच्या स्त्रीपुरुषांत आकर्षण लवकर उत्पन्न होतें, असें कांहीं शास्त्रज्ञ म्हणतात. या आकर्षणाचा अर्थ प्रेम असा केला तर हा सिद्धांत नेहमींच खरा ठरेल किंवा नाहीं कुणास ठाऊक ? परंतु, जिज्ञासेच्या अर्थानें हा सिद्धांत मान्य करावयास हरकत नाहीं.

आणि सामान्य सिद्धांताची गोष्ट सोडून केवळ विलासपुरतेंच बोलावयाचें झालें तर तो आज दोन दिवस सारखा आशेचाच विचार करीत होता, असें म्हणावयास कांहीच हरकत नाहीं. आशेच्या मनांत त्याच्याविषयींचे विचार कितपत चालले होते तें कळा-वयास त्याला मार्ग नव्हता. प्रतिष्ठित हिंदु कुटुंबांतील सुशिक्षित मुलगी, घरीं आलेल्या पाहुण्याचें ज्या प्रकारें आदरातिथ्य करील त्या प्रकारें ती त्याचें आदरातिथ्य करीत होती यांत संशयच नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याच्याशीं ती जेव्हां जेव्हां एकटीच बोलत बसली होती तेव्हां तेव्हां कसलाहि परकेपणा अगर संकोच न ठेवतां तिनें आपल्या मनांतल्या देशभक्तीच्या कल्पना आणि महत्वाकांक्षा मोठ्या आगत्यानें बोलून दाखविल्या होत्या. आणि तिच्या या असल्या भाषणाला ' मीं या गोष्टींचा कधीं विचारच केला नाहीं ' असें विलासनें उत्तर देतांच ' तुमच्यापाशीं अधिक बोलायला मिळालं तर मी तुम्हांला विचार करायला लावीन ' असें ती दर वेळेस हंसत म्हणाली होती. परंतु एवढ्यावरून ती मनांतल्या मनांत आपल्याबद्दल विशेष विचार करीत असेल असें समजणें

विलासला शक्य नव्हतें. तसें समजण्यावांचून त्याचें मोठें अडलें होतें असेंहि नाहीं. तिच्याविषयीं त्याला विचार करावयास हवा होता, व त्याला तो करावयास मिळत होता.

आत्तांहि तो समोरच्या रम्य देखाव्याकडे पहात होता खरा; पण त्याच्या मनांत विचार चालले होते आशेविषयींच.

काल शरच्चंद्र मुंबईहून येऊन दाखल झाला होता, व आज सकाळीं तो आणि आशा मिळून पुण्यास गेलीं होतीं. पुण्याच्या पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन तळवलीच्या सत्याग्रहास त्यांची किती सहानुभूति व मदत मिळते तें त्यांना आजमावून पहावयाचें होतें. तीं दोघें शक्य तर आत्तां संध्याकाळीं परत येणार होतीं. आशेचे वडील– भाऊसाहेब– पुण्यास गेले नव्हते. त्यांना आशा म्हणाली होती,

"भाऊ, तुम्ही कशाला येतां? तुमची कल्पना अशी, कीं आपली ही चळवळ सर्वस्वीं आवश्यक आणि योग्य आहे, आपण आपली योजना सांगितल्याबरोबर गांवोगांवच्या लोकांनीं आपल्या मदतीला धांवून आलं पाहिजे. पण, पुण्याची मंडळी अशी एकदम तयार होतील असं थोडंच आहे! तिथले पुढारी शंका काढणार, वाद घालणार! तुम्हांला तें सहन व्हायचं नाहीं. तुम्ही चट्कन् त्यांना टाकून सुद्धां बोलाल."

"मग सोडीन कीं काय?" तिचे वडील म्हणाले होते, "पुढारीपणाचा हक्क सांगून स्वार्थत्यागाच्या वेळीं सबबी काढलेल्या मला नाहीं आवडत. टिळक आज असते तर–"

पण आशेनें त्यांना पुढें बोलूं न देतां म्हटलें होतें,

"म्हणूनच म्हणतें, तुम्ही येऊं नका आमच्याबरोबर. पुण्याच्या लोकांना वेळ पडली तर आर्जवून आपल्या मदतीला आणण्याचा हा प्रसंग आहे. तुम्ही रहा घरींच."

आशेचें हें भाषण ऐकतांना विलासला उगीचच शंका आली होती, कीं आपल्याला घरीं टाकून सर्वांनीं पुण्यास निघून जाणें तिला वावगें वाटत होतें म्हणून ती आपल्या वडिलांना नको म्हणत होती; आणि त्या शंकेमुळें तिच्या उदार आणि चतुर स्वभावाचे विचार तो करूं लागला होता.

ते विचार आत्तांहि त्याच्या मनांत पुनःपुन्हा येत होते.

आशेच्या घराच्या पुढच्या अंगणांत जो एक सारवलेला मोठा ओटा होता, त्यावर एक सतरंजी टाकून, व टेकायला लोड देऊन भाऊसाहेबांनीं त्याला बसविलें होतें. ते दोघे एकमेकांशीं फार थोडे बोलत होते. कारण, दोघांच्या मनांतील विचार साहजिकपणेंच भिन्न स्वरूपाचे होते आणि समोरचा देखावा पहाण्यांत आपण गर्क आहोंत असें दोघांनाहि एकमेकांस भासवितां यावें इतका तो देखावा खरोखरच रमणीय होता.

ते बसले होते तेथून सुमारें एकशेन हांकांच्या अंतरावर एक लहानसें शिवालय होतें. तळवली गांवाचे लोक हें आपलें जागृत दैवत समजत. देवळाच्या बाहेर दोन दीपमाळा होत्या, व त्यांच्या आजूबाजूस बेलाचीं व लिंबाचीं झाडें होतीं. लिंबाच्या झाडांच्या ऐन बहराचे दिवस येऊं लागल्यामुळें त्यांच्या बारीक बारीक फुलघोसांचा सुगंध त्यांच्या धर्माप्रमाणें या संध्याकाळच्या वेळीं हवेंत हळुहळु पसरूं लागला होता. पलीकडे थोड्याथोड्या अंतरावर तीन-चार पानमळे दिसत होते. त्यांच्या कुंपणाच्या उंच झाडावरील बारीक बारीक पानें वाऱ्यानें हालत होतीं; आणि आंतील मळ्याचा गारगार वारा जणुं कोंडवाड्याला कंटाळून आतां सूर्यास्त झाल्यावर तरी आपल्याला उघड्या मुलुखावर येतां येईल का म्हणून कुंपणाच्या फटीफटींतून डोकावून पहात होता. त्यापलीकडचा प्रदेश सखल होत गेला होता, व उतरतीच्या खालीं लहानशी नदी होती. नदीच्या पैलतीरावर जो उंचवठा होता, तेथल्या हिरव्यापिवळ्या गवतावर जनावरें अजूनहि रेंगाळून चरत होतीं. त्यांच्या पाठीवर

बसण्याचा खेळ खेळणारे बगळे पुनःपुन्हा बसण्याचें स्थान बदलून हवेंत तरंगत होते. बगळयांचे लहानमोठे थवे मध्येंच कोठून तरी येऊन, अस्पष्ट चिवचिवाट करून जणुं जनावराच्या पाठीवर बसलेल्या नादिष्ट बगळयांना संध्याकाळ झाल्याची सूचना देत वेगानें पुढें निघून जात होते. पलीकडच्या लहान लहान टेकडयांच्या रांगा लहानमोठया झाडांनीं कमीअधिक झांकलेल्या दिसत होत्या. तेथें ठिकठिकाणीं कसलीं झाडें होतीं कुणास ठाऊक ! त्यांच्या साऱ्या फांद्या लांबट फुलांच्या लालभडक गुच्छांनीं फुलून जाऊन तीं झाडें नसून रक्तवर्ण फुलांचे मोठमोठे गुच्छच कोणींतरी उभे केले आहेत असें वाटत होतें. या लाल रंगाला अधिकच उठाव देणारा निळसर काळसर रंग पाठीमागच्या भव्य डोंगरावर जिकडे तिकडे पसरला होता. आणि दोनतीन मैलांच्या टापूंतल्या त्या एकंदर सृष्टिभागावर संध्याकाळच्या वेळची सुवर्णरंगी पण किंचित् धूसर व अस्पष्ट अशी हवा एखाद्या अतिविरल वस्त्राच्या पडद्यासारखी तरंगत होती.

मात्र, या मनोहर देखाव्याकडे विलासचें चित्त मधूनमधूनच काय तें वळत होतें. त्याच्या मनांत विचार चालले होते ते या निसर्गशोभेबद्दल नव्हे, तर आशेबद्दल, आणि शरच्चंद्र येथें आल्यानंतर त्याच्याकडून तिची जी हकीकत त्याला कळली होती, त्या हकीगतीबद्दल.

आशा त्याच्या प्रथम दृष्टीस पडली तेव्हां तिच्या सौंदर्यापेक्षां तिचें तेजच त्याच्या नजरेंत अधिक भरलें होतें, आणि नंतरहि ती जेव्हां जेव्हां त्याच्यासमोर वावरली होती, तेव्हां तेव्हां तिच्या मुखमंडलावरील तेजाचा परिणाम त्याच्या मनावर झाल्यावांचून राहिला नव्हता. परंतु विलासने तिच्याकडे जों जों अधिक पाहिलें तों तों ती तेजस्वी नसली तरी असामान्य सुंदर समजली गेली असती असें त्याला अधिकाधिक वाटत गेलें, आणि तिची रूपसंपत्ति आणि तिची मनोवृत्ति यांतील विसंगतीविषयीं त्याचें मन अधिकाधिक

विचार करूं लागलें. आशेसारखें सौंदर्य त्याच्या प्रथमच दृष्टीस पडलें होतें असें मुळींच नव्हे. स्वदेशांत व परदेशांत उत्कट स्त्री-सौंदर्याचा परिचय व सहवास त्याला कांहीं थोडा झाला नव्हता. परंतु, जें त्याच्या दृष्टीपुढें आलें होतें, तें नेहमीं नाजूक तलम वस्त्रांनीं आलंकृत झालेलें, एवढ्याशा श्रमानें गोरेमोरें झालेलें, आणि ऐश्वर्यांत आणि विलासांत रमलेलें. त्यामळें जाडीभरडी खादी नेसणारी, गांधींच्या विचारसरणीबद्दल आणि कार्यक्रमाबद्दल विलक्षण निष्ठा दाखविणारी, देश-कार्याचे बेत करणारी आणि हालअपेष्टांना न भिणारी लावण्य-संपन्न आशा पाहून विलासच्या मनाचा खूपच गोंधळ उडाला. एखादी शोभेची वस्तु विशोभित अवस्थेंत पाहिल्यासारखें त्याला वाटलें. त्याच्या ओळखीचा एक नामांकित चित्रकार एका चित्रा-कडे बोट दाखवून एकदां म्हणाला होता, 'चित्र सुंदर आहे, पण त्याला ही चौकट नको होती.' या उद्गारांची विलासला राहून राहून आठवण होत होती.

सारांश, त्याच्या मनांतील आशेबद्दलच्या विचारांत कौतु-काचा व आनंदाचा भाग अधिक होता, कीं विस्मयाचा, संभ्र-माचा आणि किंचित् खेदाचा भाग अधिक होता, हें त्याचें त्यालाच समजत नव्हतें.

आत्तांसुद्धां विचार करतां करतां त्याच्या मनाची ही विचित्र अवस्था अतिशय तीव्र झाली, आणि मग अखेर त्यानें फक्त एक दीर्घ निःश्वास सोडला. त्याच वेळीं त्यानें सहज वळून पाहिलें तों आशेचे वडील आपल्याकडेच निरखून पहात होते कीं काय अशी त्याला शंका आली.

आपल्या खऱ्या मनःस्थितीचा त्यांना संशय येऊं नये म्हणून तो झट्कन् म्हणाला,

"किती सुंदर आहे हा देखावा!"

भाऊसाहेबांनीं किंचित् हास्य करून विचारलें,

"खरंच वाटतो का हा देखावा तुम्हांला सुंदर ?"

"हें काय विचारतां? ज्याला हा देखावा रम्य वाटणार नाहीं त्याच्या डोळ्यांच्या खांचा झाल्या आहेत असंच म्हणावं लागेल."

"पण विलास, बेतानं बोला. कारण, तुम्ही म्हणतां तो आरोप तुमच्यावरच लागू होण्यासारखा आहे!"

किंचित् गोंधळून विलासनें विचारलें,

"म्हणजे कसं म्हणतां ?"

भाऊंनीं एक सुस्कारा टाकला व म्हटलें,

"या सुंदर रम्य निसर्गशोभेवर बोळा फिरवायला संपन्न कारखानदार तयार झाले आहेत, अन् त्यांची नोकरी पत्करून तुम्ही या राक्षसी कृत्यांत सामील झालां आहांत. विलास, तुमच्या भावना दुखविण्याचा माझा हेतु नाहीं, पण आतांशा केव्हांहि इथं दारांत बसून या सुंदर देखाव्याकडे दृष्टि टाकली, कीं मनांत येतं, आतां थोड्याच दिवसांत ही सारी शोभा नष्ट होणार."

"ही शोभा अप्रतिम आहे अन् या तलावाच्या योजनेनं ती नाहींशी होणार या दोन्ही गोष्टी मला मान्य आहेत. पण, त्यांत येवढं दुःख करण्यासारखं काय आहे, तें मला खरंच कळत नाहीं. ही शोभा गेली तर तिच्या जागीं दुसऱ्या प्रकारची शोभा निर्माण नाहीं का व्हायची? काळ्याभोर पाण्यानं तुडुंब भरलेला प्रचंड तलाव काय कमी सुंदर दिसेल? त्या तलावाभोंवतीं सुंदर प्रशस्त रस्ता होईल, त्या रस्त्याच्या कडेकडेनं लावलेलीं झाडं कालांतरानं मोठीं होतील, आणि गर्द छाया निर्माण करतील. रस्त्याच्या मुख्य नाक्यावर टुमदार कमान बांधली जाईल, मोंगल बांधणीच्या धर्तीवर बांधलेले घुमट मोठे सुबक दिसतील, आणि तलावांतून खंडाळ्यापर्यंत काढलेल्या कालव्यांतलं पाणी साही ऋतूंत खळखळत वहात राहील तें काय कमी सुंदर दिसेल? वस्तूचं एक स्वरूप शोभिवंत दिसतं येवढ्याच कारणासाठीं त्या वस्तूला हात लावायचा नाहीं म्हटलं तर जगाची उलाढाल आणि प्रगति अशक्यच

होईल. जंगलांत अवाढव्य वाढलेलीं झाडं काय कमी सुंदर दिसतात ? पण कागद तयार करण्यासाठीं त्या सुंदर झाडांवर आपण खुशाल करवत चालवतोंच कीं नाहीं ? माझ्या या बोलण्याचा तुम्हांला कदाचित् राग येईल–"

भाऊसाहेब किंचित् मान हालवून म्हणाले,

" राग नाहीं, पण कींव मात्र येते. तुम्ही सांगतां तो उपयुक्ततावाद मी कांहीं आज नव्यानं ऐकत नाहीं. पण, केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनं या तलावाच्या प्रश्नाकडे निष्ठुरपणानं पहाणाऱ्या तुमच्यासारख्या माणसांची मला खरंच कींव येते. पिढ्यान्‌पिढ्या ज्या जमिनींची मशागत आम्हीं केली, ज्या जमिनींतलं पीक काढून आम्हीं आमचे देहपिंड पोसले, जिथं आम्हीं घरंदारं आणि देवळं बांधलीं, त्या जमिनी आमच्या हातून गेल्या तर आमच्या अंतःकरणाला किती पीळ पडेल त्याचा कांहीं विचार नको करायला ?"

विलासनें क्षणभर कांहींच उत्तर केलें नाहीं. असल्या प्रश्नांचा गंभीरपणानें विचार करण्याची, अगर त्यावर वादविवाद करण्याची त्याला संवय नव्हती. मात्र, एखादा कधींच खेळून न पाहिलेला नवा खेळ खेळण्याची वेळ यावी, आणि तो खेळूं लागतांच यांतहि आपला हात चालतो कीं, असा अनुभव यावा, तसें त्याला आतां वाद करतांना वाटत होतें. भाऊसाहेबांना द्यावयाचें प्रत्युत्तर मनाशीं जुळविण्यासाठीं थोडेंसें थांबून तो म्हणाला,

" हें पहा, हें जग असं आहे, कीं कुणाच्याहि भावनांना धक्का लावायचा नाहीं म्हटलं तर माणसाचे साधे व्यवहारसुद्धां चालायचे नाहींत. हा तलाव तयार झाला, आणखी कंपनीचा विजेचा कारखाना चालू झाला, कीं हजारों माणसांना ज्या सुखसोयी प्राप्त होतील–"

भाऊसाहेब एकदम म्हणाले,

"हा मुद्दा मीं पुष्कळदां ऐकला आहे हो. कंटाळा आला आहे मला तो ऐकून ! हजारों माणसांच्या सुखसोयींच्या गोष्टी कशाला

सांगतां ? सोराबजी दिनशा कंपनीचे मालक म्हणजे गोरगरिबांवर उपकार करायला निघालेले महात्मेच कीं नाहीं ! कोटयवधि रुपयांच्या नफ्याचं घबाड त्यांना स्पष्ट दिसत नसतं तर त्यांनीं हा कारखाना काढला असता का ? सांगा. गरीब शेतकऱ्यांच्या जमिनी बळकावयाच्या–"

"बळकावयाच्या कसं म्हणतां ? जमिनींची काय ठरेल वाजवी किंमत देऊनच कंपनी त्या घेणार ना ?"

"विलास, तुम्हीं कधीं एखाद्या वस्तूवर प्राणापलीकडे प्रेम केलं आहांत का ?"

या अनपेक्षित प्रश्नानें विलासच्या मनाचा गोंधळ उडाला; त्यानें आपलें अंतःकरण झट्दिशीं शोधून पाहिलें. त्यानें आजपर्यंत कशावरच प्राणापलीकडे प्रेम केलें नव्हतें ! कुणा स्त्रीवरसुद्धां केलें नव्हतें ! सुखविलासांनीं गजबजलेल्या रस्त्यानें तो पूर्ण बेफिकिरीनेंच चालत आला होता.....

तो स्तब्ध राहिला.

मग भाऊसाहेबच पुढें म्हणाले,

"तुमच्या आईवर तर तुम्हीं प्रेम केलं असेल. समजा, एखाद्या लिलांववाल्यानं तुमच्या आईचं चित्र मागितलं आणखी त्याची ठरेल ती वाजवी किंमत देतों असं तो म्हणाला........ माझं म्हणणं आलं असेल तुमच्या लक्षांत आतां. ह्या तुमच्या जमिनी आम्हांला इतक्या प्रिय आहेत, कीं त्यांच्या एकेका चौरस हात तुकड्यावर कुणीं मोहरांची रास घातली तरी तिला आम्ही स्पर्श करणार नाहीं. अन् दुसरं असं, कीं ठरेल ती वाजवी किंमत असं तुम्ही म्हणतां, पण ही वाजवी किंमत ठरवणार कोण ? आम्ही नाहीं, तर कंपनीचेच सगेसोयरे सरकारी अंमलदार. आमच्यांतले जे श्रीमंत जमीनदार आहेत त्यांना भरपूर मलिदा चारून, फितूर करून घेऊन, गरीब शेतकऱ्यांच्या जमिनी जवळ-जवळ फुकट लाटणार आहे तुमची कंपनी. पण जाऊं द्या.

तुमच्याशीं हा वाद कशाला ? तुम्ही आमचे दोन दिवसांचे पाहुणे. आमच्या सुखदु:खांत तुम्ही कशाला लक्ष घालतां ? आम्ही आहोंत अन् आमचीं संकटं आहेत. झगडूं आम्ही, आणखी झगडतां झगडतां मरूंहि कदाचित् !"

असा उद्‌गार काढून भाऊसाहेबांनीं एक सुस्कारा टाकला, आणि मान वळवून दुसरीकडे पाहिलें. त्यांच्या त्या उद्‌गारांतील भावनांची तीव्रता विलासच्या अंत:करणाला भिडल्यावांचून राहिली नाहीं. असली कष्टी भाषा त्यानें आजपर्यंत कधीं ऐकली नव्हती. मृत्यूला आणि सर्व नाशाला सिद्ध होणाऱ्या त्या गृहस्थाचे ते शब्द त्याला असह्य वाटले. कां कुणास ठाऊक, पण त्याला एकदम आशेची आठवण झाली. वेडेपणाच्या आततायी चळवळींत त्या सुकुमार सुंदर मुलीनें आपल्या असामान्य लावण्याची आणि बुद्धिमत्तेची आहुति द्यावी, आणि तिच्या या पित्यानें....... छे छे ! ती कल्पनाच भयंकर होती. तो एकदम म्हणाला,

" तुम्ही मृत्यूची भाषा सहजासहजीं कशी बोलतां हें मला कळत नाहीं. या तुमच्या चळवळीचा शेवट काय होणार तें उघड आहे. तुम्हीं काय वाटेल तें केलंत तरी कंपनी तलाव बांधल्या-वांचून रहात नाहीं. कंपनीजवळ पैशाचं अमर्याद बळ आहे सरकारी सत्ता त्यांच्या पाठीशीं उभी आहे. तुमची चळवळ चिरडून टाकायला कंपनीला फारसे प्रयास पडणार नाहींत. अशा वेळीं जबरदस्ताशीं विरोध मांडण्यांत सुविचार आहे असं नाहीं मला वाटत....'

विलासला मध्येंच थांबवून भाऊसाहेब म्हणाले,

" आम्हांला जें कर्तव्य वाटतं त्याला अविचार म्हणणारीं तुमच्यासारखीं पुष्कळ माणसं आहेत. पण मला वाटतं, हा अविचार आमच्या रक्तांत भिनला आहे, अन् त्याला कांहीं इलाज नाहीं. मनुष्याच्या श्वासांतून बाहेर पडणाऱ्या विषारी वायूवर झाडंझुडपं जगतात; त्यांचा तो धर्म आहे, अन् त्यांच्या-

कडून तो कधीं सुटणार नाहीं. त्याप्रमाणंच अविचार करण्यांत आयुष्य खर्च केलं तरच ज्यांना जगल्यासारखं वाटतं, अशीं आम्ही माणसं आहोंत. आजपर्यंत आमच्या घराण्यानं हेंच केलं. वासुदेव बळवंत फडक्याच्या बंडापासून सरकारच्या अवकृपेची झळ आम्हांला लागलेली आहे. टिळकांच्या चळवळीच्या दिवसांत मीं कांहीं थोडा छळ सोसलेला नाहीं. तीन वेळां तुरुंगांत जाऊन आलों. अन् आतां कदाचित् तुरुंगांतच अखेरचे डोळे मिटायचं नशिबांत असेल माझ्या. अन् माझ्या पश्चात् माझ्या एकुलत्या एक मुलीचं आयुष्यहि असंच जायचं असेल. पण, त्यांत मला दुःख खरंच नाहीं. उलट, अशी मुलगी माझ्या पोटी आली याचा मला अभिमान वाटतो."

ते त्यांचे शब्द ऐकतांना विलासनें त्यांच्याकडे अगदी निरखून पाहिलें. गृहस्थ पन्नाशीच्या सुमाराचा सहज होता. पण, मूळच्या लालसर गौरवर्णाची कांति अजूनहि त्याच्या देहावर स्पष्ट दिसत होती. नाकाच्या सरळ रेषेंत आणि हाल सोसल्यामुळें किंचित् खोल गेलेल्या टपोऱ्या डोळ्यांच्या नजरेंत करार आणि हट्ट अगदीं परिपूर्ण भरलेला दिसत होता. आणि मूळची तेजस्वी मुद्रा लेकीविषयींच्या अभिमानाच्या भावनेनें त्या क्षणीं अधिकच तेजस्वी दिसत होती. त्या अभिमानी पित्याची ती मुद्रा अगदीं सूक्ष्मपणें पहावी असें विलासला वाटलें.

गेल्या दोन दिवसांत माणसांचे चेहरे न्याहाळून पहाण्याची नवीनच संवय विलासला जडूं लागली होती. आशेच्या असामान्य सौंदर्यानें आकर्षित होऊन तिच्याकडे निरखून पहावेसें त्याला वाटत होतेंच; पण भाऊसाहेब आणि शरच्चंद्र यांच्या मुद्राहि त्याला पुनःपुन्हा पहाव्याशा वाटल्या होत्या.

मानवी स्वभावाचे हे तीन नवीन नमुने त्याच्या प्रथमच दृष्टीस पडले म्हणून असें झालें असेल कदाचित्.

पण कारण कांहींहि असलें तरी या तीन व्यक्तींविषयीं त्याला विलक्षण जिज्ञासा वाटूं लागली होती येवढें खरें.

कारण, नंतरच्या दोन अडीच दिवसांतहि तो त्या तिघांचा, त्यांच्या विचारांचा, आणि त्यांच्या परस्परांविषयींच्या भावनांचा सूक्ष्म अभ्यास करीत राहिला.

विशेषत: आशा आणि शरच्चंद्र यांच्या मतांतील तीव्र भेद, आणि ते मतभेद असूनहि चळवळीच्या बाबतींत आशेच्या मताप्रमाणें वागून तिला प्रसन्न राखण्याची शरच्चंद्राची उत्सुकता, त्याला मोठी गमतीची वाटली. त्या दोघांतले मतभेद गुप्त नव्हते. दोघांच्याहि बोलण्यांत ते वारंवार प्रगट होत होते. आपली सत्याग्रहाची चळवळ यशस्वी करण्यासाठीं अमुक केलें पाहिजे, तमुक केलें पाहिजे, असें आशा बोलूं लागली, कीं शरच्चंद्र एकीकडे 'हो-हो' असें म्हणे, पण लगेच अर्धवट थट्टेनें आणि अर्धवट गंभीरपणानें तिला विचारी, "या असल्या सत्याग्रहानं न्याय मिळवतां येईल असं तुला खरंच वाटतं काय ?"

आशा म्हणे, "होय, माझी तशी श्रद्धा आहे."

यावर शरच्चंद्रानें एकदां विचारलें, "किती दिवस या श्रद्धेचा हट्ट करणार आहेस तूं ? मुंबईस आपण वर्तमानपत्र चालवीत होतों तें बंद करायसाठीं सरकारनं जामीन मागितला. जामीन भरला असता तर आज आपलं पत्र चालूं राहिलं असतं; आणखी लोकांच्या पत्रांचा आधार विनवण्या करून मिळविण्याची वेळ आली नसती. पण सत्याग्रहाचं वेड तुझ्या डोक्यांत शिरलेलं. आपण जामीन दिला नाहीं आणि सरकारनं आपला छोटासा छापखाना जप्त केला. आतां ही चळवळहि त्याच मासल्याची व्हायची आहे ! पुण्याच्या पुढाऱ्यांवर तूं मोठी विसंबली आहेस खरी, पण त्यांनीं दगा दिला नाहीं तर नांव बदल माझं !"

आशा किंचित् हंसली. "मला नाहीं कोणाचीं नांवं बदलायची हौस. अन् मी म्हणतें, उगीच काय म्हणून पुण्याच्या पुढाऱ्यांबद्दल शंका घ्यायची ? तुम्ही आलांच होतां माझ्याबरोबर पुण्याला. आपल्या चळवळीबद्दल वर्तमानपत्रांत सारखं लिहिण्याचं अन् इथं

घेऊन व्याख्यानं देण्याचं त्यांनीं किती कळकळीनं कबूल केलं तें पाहृयला माझ्याबरोबर तुम्ही होतांत ना ?"

"व्याख्यानं द्यायला अवश्य येतील, मी नाहीं कुठं म्हणतों ? पण प्रत्यक्ष सत्याग्रह करायचा गुढीपाडव्याचा दिवस उजाडेल तेव्हां पुण्याच्या बड्या धेंडांपैकीं कोणकोण इथं हजर राहतात तें मी पाहीन, अन् तूंहि पहा !"

"बरं बरं, पाहूं. अन् मी म्हणतें, पुण्याचे कोणी लोक आले नाहींत तरी आपल्या या सगळ्यांचा निश्चय कायम आहे ना ? पांचसहाश शेतकरी धरण खोदायच्या जागीं सत्याग्रह करायसाठीं आडवे पडले तर कंपनीच्या लोकांचे डोळे उघडल्याशिवाय राहृयचे नाहींत."

"मी तरी कुठं म्हणतो आहें तसं ? माझं म्हणणं इतकंच, कीं कंपनीच्या लोकांचे डोळे आत्तांच चांगले उघडे आहेत. सत्याग्रहयांची काय वाट लावायची तें त्यांनीं अगदीं व्यवस्थित ठरवून ठेवलं असलं पाहिजे. आपणां सगळ्यांना पकडून कैदेंत घालतील, आणि धरणाचं काम मजेंत सुरू करतील ते !"

"जाऊं कैदेंत. आपली तयारीच आहे."

"तुझी असेल; माझी नाहीं. बलिष्ठाचा फक्त मार खाण्याचं हें एकांगी युद्ध मला मुळींच पसंत नाहीं. कैदेंतच जायचं तर मार खाऊन जाण्यापेक्षां मार देऊन तरी जावं. काय रे विलास, तुला कसं वाटतं ? तूं आमच्या शत्रुपक्षांतला आहेस, पण इथं हजर आहेसच तेव्हां तुझं मत विचारायला कांहीं हरकत नाहीं ?"

यावर आशा चटकन् म्हणाली,

"छे छे, विलासना शत्रु समजायला मी तयार नाहीं. इतकंच काय, पण त्यांचं मन वळवून त्यांना आपल्या सत्याग्रहांत सामील करून घ्यायची मला आशा आहे."

"असली आशा मात्र वेडी आशा म्हटली पाहिजे हो."

असे शब्द विलासच्या तोंडून चट्कन् बाहेर पडले, आणि त्याला न कळत त्याच्या वाक्यांत झालेली कोटी मग सगळ्यांच्याच लक्षांत येऊन सर्वजण मोठमोठ्यांदा हंसलीं.

त्या हंसण्यामुळें संभाषणाला आलेलें वादाचें स्वरूप नाहींसें झालें, पण शरच्चंद्राचीं मतें आशेच्या मतांहून भिन्न आहेत याबद्दल विलासला पूर्वींच आलेली शंका दृढ झाली.

आणि त्याचप्रमाणें जेवणाच्या वेळीं आशेशीं वाद घालणारा शरच्चंद्र जेव्हां संध्याकाळीं शेजारच्या गांवीं शेतकऱ्यांची सभा होणार होती तिकडे व्याख्यान द्यायला आशेबरोबर गेला, तेव्हां दुसरीहि एक शंका विलासच्या मनांत डोकावूं लागली.

त्याच्या मनांत आलें, आशा व शरच्चंद्र एकमेकांवर अनुरक्त तर नसतील ?....

असलीं तर कांहीं नवल नाहीं....

आशेसारख्या मुलीवर प्रेम न करणें फार अवघड होतें !....

आणि शरच्चंद्राच्या ठिकाणींहि असामान्य गुण होते ....

त्याला शरच्चंद्राची फारशी माहिती नव्हती, पण त्याला एवढें ठाऊक होतें कीं, तो एका श्रीमंत कुळांतला होता, पदवीधर होता, लेखक आणि वक्ताहि होता. एका काळीं तरबेज खेळाडू होता, आणि आतां तर श्रीमंती सोडून आणि फकिरी पत्करून आशेला प्रिय असणाऱ्या कार्यांत त्यानें उडी घेतली होती.

आशा आणि शरच्चंद्र एकमेकांना खरोखरच अनुरूप होतीं....

एकीकडे असा विचार करतांना आपल्या मनांत असूयेची अस्पष्टशी लकेर कां उठावी तें विलासला कळेना.

आपल्या मनांतली ही नवी भावना योग्य नव्हे असें त्याला वाटलें....

आशा आणि विलास ! छे, भलतेंच !

हे आत्मगत उद्‌गार विलासनें रात्रीं अंथरुणावर पडल्या-पडल्या कितीदां तरी काढले. अखेर झोंप घेण्याच्या निश्चयानें उजव्या अंगाच्या खिडकींतून दिसणाऱ्या दूरच्या डोंगरावर पेट-लेल्या वणव्याकडे शेवटचें पहात व पांघरूण सरसावीत तो स्वतःशीं म्हणाला,

"पण आपण आतां उद्यां येथून जाणारच आहोंत. आपला पाय आतां बरा झाला आहे. तेव्हां उद्यां..."

---

# प्रकरण ८ वें

---

अपघातांत नादुरुस्त झालेली विलासची मोटार बैल लावून लोणावळ्याच्या कँपवर पूर्वीच रवाना करण्यांत आली होती; आणि आज विलास लोणावळ्यास जाणार होता तो तळवलीच्या स्टेशनावरून सकाळीं साडेनऊ वाजतां सुटणाऱ्या एका पॅसेंजर गाडीनें.

भाऊसाहेब आणि शरच्चंद्र सकाळीं उठल्याबरोबर शेजारच्या एका खेडेगांवीं गेले होते. आशा मात्र घरीं राहिली होती. त्या दोघांनीं नऊ वाजण्याच्या आंत परत यावयाचें, व मग विलासला घेऊन स्टेशनवर जावयाचें असें ठरलें होतें.

पण नऊ वाजले तरी ते दोघे आले नाहींत, तेव्हां विलास आशेला म्हणाला,

"मला वाटतं आतां शरच्चंद्राची वाट पहाण्यांत अर्थ नाहीं."

आशा म्हणाली,

"त्याचं नेहमींचं असं आहे. वक्तशीरपणा त्याच्या पांचवीला पुजला नव्हता असं मला वाटतं. तरी जाण्यापूर्वीं मीं हजारदां बजावलं होतं."

"पण तो आला नाहीं तरी काय मोठं बिघडलं? मी एकटा जाऊं शकतों स्टेशनवर. गेले पांचसहा दिवस फार आनंदांत गेले माझे. त्याबद्दल तुमचे आभार मानावेत तेवढे—"

"म्हणजे? तुम्ही निरोप घ्यायला लागलांत कीं काय?"

"हो. आतां मला निघालंच पाहिजे, नाहीं का?"

"निघालं पाहिजे हें खरं आहे; पण निरोप नाहीं मी घेऊं देणार."

"म्हणजे?"

" म्हणजे काय ? मी येतें ना तुम्हांला स्टेशनपर्यंत पोंचवायला. "

" छे छे; इतकी तसदी कशाला घेतां ? आतां मी कांहीं परका पाहुणा राहिलों नाहीं. "

" म्हणून तर आल्याशिवाय राहवत नाहीं. "

" पण आतां बाहेर ऊन कोण झालंय ! परत येतांना तर फारच लागेल तुम्हांला. "

" तरी मी वितळणार नाहीं कांहीं ! " आशा हंसली. " इतकी का मी नाजुक आहे असं तुम्हांला वाटतं ?"

" मलाच कशाला, कुणालाहि वाटेल. "

असें किंचित् हंसून विलास म्हणाला खरा, पण लगेच त्याला वाटलें, आपण असें म्हणायला नको होतें.

आशेच्या चर्येवर मात्र त्यानें अपेक्षिलेली चलबिचल दिसली नाहीं, व त्यामुळें त्याच्या मनाचा गोंधळ लगेच नाहींसा झाला.

मग तीं दोघें घराबाहेर पडलीं, व स्टेशनकडे जाऊं लागलीं.

मध्येंच विलासनें म्हटलें,

" आमची आठवण ठेवाल ना ?"

आशा म्हणाली,

" वा ! हें चांगलंच विचारणं ! तुम्ही बडी श्रीमंत मंडळी. आमचीच आठवण तुम्हांला राहणं कठीण ! ठेवाल का आठवण ?"

" माझ्या अंतःकरणांत ती इतकी खोल जाऊन बसली आहे, कीं ती ठेवणं न ठेवणं आतां माझ्या हातांत नाहीं. मला तर वाटतं, कीं सहा दिवसांपूर्वी पहांटे भूपाळीचा जो मधुर आवाज माझ्या कानीं प्रथम पडला, तो माझ्या आयुष्याच्या अंतापर्यंत मी कुठंहि असलों तरी रोज पहांटे मला ऐकू येईल. किती गोड गातां तुम्ही ! तुम्ही गायला कां नाहीं शिकत ?"

"मी होय ?" असें विचारून आशा अशा विचित्र स्वरानें हंसली, कीं त्या हंसण्यांत खेदाचाच भाग अधिक होता असें विलासला वाटलें. तीच पुढें कांहींतरी बोलेल अशा कल्पनेनें तो थोडा वेळ थांबला, पण ती बोलली नाहीं म्हणून त्यानें म्हटलें,

"तुमच्याइतका गोड आवाज मीं कधीं ऐकला नाहीं. खरंच तुम्ही शिकायला पाहिजे गाणं."

"शिकणार आहें मी, पण अवकाश आहे त्याला. मी मुंबईस कॉलेजांत शिकत होतें तेव्हां गॅदरिंगच्या वेळीं मीं म्हटलेलं गाणं ऐकून समारंभाला हजर असलेले एक खांसाहेब इतके खूष झाले, कीं ':मी तुम्हांला गाणं शिकवतों' म्हणून ते सारखं माझ्या मागं लागले."

"असं ? खांसाहेब इतके शहाणे असूं शकतात अशी नव्हती माझी कल्पना. बाकी अखेर तुम्हांला गाणं न शिकवतांच त्यांनीं सोडलं यांत त्यांचा वेडेपणा सिद्ध झालाच म्हणा ! त्यांच्या जागीं मी असतों तर काय वाटेल तें झालं तरी तुम्हांला सोडलं नसतं. खरंच तुम्हीं शिकायला पाहिजे होतं गाणं. अजून शिका."

"शिकणार आहें."

"केव्हां ?"

"मला कैदेची शिक्षा झाली, आणखी सरकारनं जर मला विचारलं, कीं काय काम करायची तुमची इच्छा आहे, तर मीं सांगायचं ठरवलं आहे, कीं मला गाणं शिकायचं आहे !"

"बायकांना काय वाटेल तें करूं देईल सरकार मला वाटतं. असं सांगतात, कीं एक कवयित्री पुढारीणबाई एकदां म्हणाल्या, सक्त मजुरीची शिक्षा होऊन आपण तुरुंगांत गेलों, कीं दक्षिणी लोक पुरणपोळ्या कशा करतात तें आपण शिकणार ! हाल सोसायची केवढी तयारी ही !"

असें म्हणून विलास जेव्हां मोठ्यांदा हंसला तेव्हां आशा म्हणाली,

" तुमची चेष्टा आली माझ्या ध्यानांत. पण आमच्या शरच्चंद्राचे एक मित्र मिरतच्या खटल्यांत तुरुंगांत गेले, तेव्हां तुरुंगांतल्या डॉक्टरच्या कंपाउंडरचं काम त्यांना देण्यांत आलं. आतां ते सुटून आले आहेत तर डॉक्टर म्हणून दवाखाना थाटायला हरकत नाहीं म्हणतात ! तसंच मीहि आपली मनाशीं म्हणतें आहे, कीं तुरुंगांत जाईन तेव्हां गाणं शिकेन, अन् सुटून बाहेर आलें, कीं जलसे करून पैसे मिळवीन ! कारण, लवकरच मी तुरुंगांत जाणार हें निश्चित. "

विलासनें चट्कन् विचारलें,

" पण तुरुंगांत जायची ही हौस काय म्हणून बुवा ?"

" हौस कसली ? तयारी. चळवळ केली कीं तुरुंग आलाच. अन् चळवळ तर करायलाच पाहिजे. "

" पण असली चळवळ काय म्हणून ? "

" असली म्हणजे ? '

" असली म्हणजे वेडेपणाची. जमिनीवर पडायचं, लाठ्या खायच्या अन् तुरुंगांत जायचं. मला तरी यांत कांहीं शहाणपणा दिसत नाहीं. "

" तो सहजासहजीं दिसण्यासारखा नाहींच आहे. "

" निदान तुम्ही जोंपर्यंत दृष्टीसमोर आहांत तोंपर्यंत तरी तो दिसायचा नाहीं खास ! "

यावर उत्तर देण्याऐवजीं आशा एकदम थबकली आणि रस्त्याच्या कडेला असलेल्या एका मोठ्या झुडुपाकडे बोट दाखवून म्हणाली,

" हीं पाहिलींत का या झाडाला किती करवंदं आलीं आहेत ?"

तिच्या सौंदर्याचा आपण केलेला उल्लेख लक्षांतच न आल्यासारखें दाखविण्याचें तिचें तें चातुर्य विलासला मोठें गमतीचें

वाटलें. त्यानें पुढें होऊन करवंदें तोडलीं व तीं खात खात तीं दोघें पुढें चालूं लागलीं.

स्टेशनच्या जरा अलीकडे फाटक होतें. तेथें तीं दोघें पोंचतांच हातांत हिरवें निशाण घेऊन उभा असलेला फाटकवाला आशेला अगदीं लवून रामराम करून म्हणाला,

" ममईला निघालां जनूं ?"

" नाहीं, पाहुण्यांना पोंचवायला आलें आहें. तूं खुशाल आहेस ना ?"

" व्हय जी."

" अन् आमची जाई कुठं आहे ?"

" हाय ना आंत खोपटांत."

असें म्हणून तो फाटकवाला आपल्या खोपटाच्या दाराशीं लगबगीनें गेला आणि आनंदानें मोठ्यानें ओरडला,

" जाये, ए जाये, भाईर बग कोन आलंय्."

एक पांचसहा वर्षांची नागडीउघडी मुलगी भाकरीचा तुकडा खातखात दारांत आली, व आशा दृष्टीस पडतांच हंसली आणि सरळ दोन्ही हात वर करून तिच्याकडे धांवली.

आशेनें तिला उचलून घेतलें, तिच्या घाणेरड्या तोंडाचा त्यांतल्या त्यांत स्वच्छ भाग पाहून मुका घेतला, आणि तेलपाण्या-वांचून कित्येक दिवस राहिलेल्या तिच्या पिंजारलेल्या बटा मागें सारीत म्हटलें,

" पहावं तेव्हां खात असते लबाड !"

जाई फक्त हंसली, आणि तिनें आपल्या नाकावरून डावा पालथा पंजा फिरविला.

फाटकवाल्यानें आशेला विचारलें,

" म्हादू गायकवाड म्हनत होता दिवस बी पक्का ठरला ?"

" होय. पाडव्याच्या दिवशीं कंपनीचे लोक धरणाच्या भिंतीचा पाया खणायला सुरवात करणार आहेत,. तेव्हां त्याच

दिवशीं सत्याग्रह सुरू व्हायचा. अनायासं चांगला मुहूर्त मिळतो आहे आमच्या कामाला."

"मी येनार बरं का ताईसाहेब."

"कोण दादू, तूं ?"

"हो, मी अन् आमची घरधनीन बी."

"पण दादू, तुझी नोकरी जाईल, अन् तुम्ही दोघंहि तुरुंगांत गेलांत तर तुमच्या पोराबाळांचं—"

"देवाला वाटली लाज तर तो घील त्यांची काळजी ! साऱ्या गांवाचं मरन आलंया अन् अशा वक्ताला मी हार खाऊं म्हनतां ? छट्. असं व्हायचं नाय आपल्या हातनं. मला बोलवाया इसरूं नका ताईसाहेब."

"बरं बरं. आधल्या दिवशीं फिरेलच दवंडी. हं, आई, उतर आतां कडेवरून. मला जायचं आहे स्टेशनवर."

पण ती धीट पोर आशेला अधिकच बिलगून म्हणाली,

"मला न्या कीं."

आशा हंसली.

दादू आपल्या लेकीस दटावून म्हणाला,

"ए येडे, चल ये इकडं."

त्यानें तिला हिसकवून घेतलें, त्याबरोबर त्या मुलीनें त्याच्या कडेवर बसतां बसतां लाथा झाडल्या, भाकरीचा तुकडा फेंकून दिला आणि रडण्यास प्रारंभ केला.

आशेनें एक पैसा तिच्या हातीं दिला. त्याबरोबर मात्र तिचा तो आकांत मंत्र घातल्यासारखा एकदम थांबला.

फाटक ओलांडल्यावर स्टेशनच्या आवारांत चालतां चालतां आशा विलासला म्हणाली,

"या दादूची पूर्वीं थोडीशी जमीन होती. पण आमच्या गांवच्या बड्या सावकारांनीं कर्जवसुलीसाठीं त्याचं घरदार आणि जमीन जप्त केली, अन् बिचारा आतां सात रुपयांची नोकरी

करतो आहे. तेच सावकार आतां सोराबजी दिनशा कंपनीला फितूर झाले आहेत, अन् दादूसारख्या गरीब शेतकऱ्यांना सांगत सुटले आहेत, कीं शहाणे असाल तर कंपनी देईल ती जमिनीची किंमत घ्या, सत्याग्रह कसला करतां ?"

यावर काय उत्तर करावें तें विलासला कळेना. तो स्तब्धपणें पावलें टाकीत राहिला.

गाडी आली व विलास डब्यांत चढला तेव्हां खिडकीशीं उभें राहून आशेनें विचारलें,

" आतां पुन्हा केव्हां येणार ?"

विलासचें सारें लक्ष तिच्या शब्दांपेक्षां तिच्या मुखमंडलाकडे होतें. चालण्याच्या श्रमानें तिचा चेहरा अगदीं लाल होऊन गेला होता, कपाळावर आणि गळयावर घर्मबिंदू चमकत होते, आणि पाठीवर सोडलेल्या लांबसडक केंसांच्या लठ्ठ वेणीवर सूर्यकिरण तळपत होते. तिनें घरून निघतांना केंसांत खोंवलेलें सोनटक्क्याचें फूल पार कोमेजून गेलें होतें त्याकडेच विलास सारखा पहात होता. त्यामुळें तिचा प्रश्न त्याला नीटसा ऐकूं आला नाहीं व त्यानें विचारलें,

" आं ? काय म्हणालांत ?"

" नाहीं म्हटलं आतां पुन्हा केव्हां भेट ?"

" भेट होय ? तुम्ही लोणावळयास आलांत तर या कीं आमच्या कॅंपवर."

" कॅंपवर ? म्हणजे शत्रूच्या गोटांतच म्हणायचं ? आलें कीं मला पकडूनच ठेवाल ! तसं नको; तुम्हीच या पुन्हा एकदां केव्हांतरी."

" बरं, पाहीन पुन्हा एकदां अपघात करून !"

" इश्श ! असं का माझं म्हणणं ?"

असें हंसत म्हणून आशेनें पाठीवरची वेणी डाव्या हातानें पुढें ओढून घेतली, आणि पेडाची चाळवाचाळव करीत ती खालीं पाहूं लागली.

तितक्यांत धनगराचा एक लहानसा मुलगा डब्याजवळ आला व परडींतलीं ताजीं सोनचांफ्याचीं फुलें विकत घ्या म्हणू लागला.

विलासनें त्यांतलीं सगळ्यांत टपोरीं दिसणारीं दोन फुलें उचलून घेतलीं, खिशांत हाताला आली ती पावली काढून त्या मुलाला दिली, व तो मुलगा आनंदानें धांवत दूर गेला तेव्हां आशेला म्हटलें,

"हीं घ्या."

आशेनें आश्चर्यानें म्हटलें,

"येवढ्यासाठीं का घेतलीं?"

"हो. आठवण म्हणून काय द्यावं या विचारांत होतों, इतक्यांत त्या मुलानं जवळ येऊन माझा प्रश्न सोडवला."

"असं असं." असें म्हणून आशेनें ओंजळींत धरलेल्या त्या फुलांचा वास घेतला.

विलास म्हणाला,

"केंसांत घाला कीं. तें तुमचं सोनटक्क्याचं फूल पार कोमेजून गेलं आहे."

विलासची आपल्याकडे इतकी दृष्टि होती हें त्याच्याकडून कळतांच आशा गोरीमोरी झाली.

सुंदर स्त्रियांतसुद्धां क्वचित् एखादीचाच चेहरा असा असतो, कीं आकाशांत ढगांची हालचाल होईल त्याप्रमाणें प्रकाशाचें अगर छायेचे मोठेमोठे पट्टे सरकलेले जमिनीवर दिसावे तद्वत् अंतःकरणांत उठणाऱ्या भावनांच्या प्रकाशछाया तिच्या मुखावरून झरंकन् गेल्याचें स्पष्ट दिसतें.

गेल्या सहा दिवसांत आशेकडे पहातांना तिच्या सौंदर्यांतली ही अपूर्वता विलासच्या ध्यानांत कितीदां तरी आली होती, आणि आत्तांहि ती जेव्हां लज्जित झाली तेव्हां तिचाच विचार तो करूं लागला.

आशेनें मात्र आपलें तोंड अगदीं दूर केलें, आणि एका हातानें केंसांवर फुलें ठेवण्यासाठीं व दुसऱ्या हातानें त्यावर आंकडा टोंचण्यासाठीं दोन्ही हात मस्तकापर्यंत उंच करून ती पाठमोरी उभी राहिली.

पहांटेच्या दंवानें धुतलीं गेलेलीं तीं दोन चाफ्याचीं नाजुक फुलें अधिक सुंदर होतीं, कीं त्यांच्याशी खेळणारी आरक्त गोरवर्ण आणि कोमल अशीं तीं दोन करकमलें अधिक मनोहर दिसत होतीं ?........

हें ठरविण्यासाठीं विलास त्या फुलांकडे आणि आशेच्या हातांकडे खूप वेळ पहाणार होता.

पण तितक्यांत त्याच्याकडे एकदम तोंड फिरवून आशेनें हंसत विचारलें,

" 'थॅंक यू' म्हणायला पाहिजे नाहीं का ?"

विलासनें उत्तर करण्याऐवजीं दोन ओंठ घट्ट जुळवून तिरप्या हंसऱ्या नजरेनें तिच्याकडे पाहून मान हालविली.

क्षणभरानें तो म्हणाला,

" शरद्ला सांगा, मी त्याच्यावर खूप रागावलों आहें."

आशा हंसली. " असं का ? मग बरं झालं. तुमच्या रागाचा मला आधार मिळाला. कारण, मींसुद्धां त्यांच्यावर खूप रागवायचं ठरवलं आहे. "

" तुम्ही ? तुम्ही कसल्या रागवतां त्याच्यावर ! अन् राग दाखवलांत तरी शरद् पक्कं ओळखून असणार, कीं तो राग नाहीं ! चतुर पुरुष सुंदर स्त्रियांच्या रागाला राग म्हणत नाहींत !"

" मग काय म्हणतात ?"

" रुसवा का कायसं म्हणतात बुवा ! "

" चला कांहींतरीच !' अशा अर्थानें आशेनें मान हालविली आणि नजर फिरविली. तिच्या मुखमंडलावरून कसल्यातरी सूक्ष्म भावनांचा छायाप्रकाश झरदिशीं गेला. तिच्या लावण्याचा

हा विशेष विलासला फारच रमणीय वाटत होता. त्यानें तिच्याकडे निरखून पाहिलें.

ती लज्जित झाली हें साहजिकच होतें. पण, तोंड फिरवून दुसरीकडे पहातांना तिनें आपला अधर चावल्यासारखें का करावें, क्षणमात्र अंतराळांत स्थिर झाल्यासारखी तिची दृष्टि कां व्हावी, आणि तिच्या गोऱ्यापान चेहऱ्यावर अस्पष्टशी कृष्णछाया वाजवीपेक्षां अधिक वेळ तरळल्यासारखी कां दिसावी, तें त्याला कळलें नाहीं.

आणखी कांहींतरी बोलून तिला अधिक लज्जित करण्याचा मोह आंवरणें कठीण होतें.

पण विलासनें तो आंवरला.

तो लावण्यलोलुप होता, पण त्याच्या ठिकाणीं नेकीहि परिपूर्ण होती. आपल्यासमोर उभी असलेली ही लावण्यसंपन्न युवती आपल्या मित्राची प्रेयसी आहे हें तो विसरूं शकला नाहीं. ओंठांशीं आलेले शब्द त्यानें परतविले.

मात्र गाडी सुटल्यावर, आणि डब्यांत तो एकटाच राहिल्यावर ते न उच्चारलेले शब्द मोठ्यानें उच्चारल्यावांचून त्याला राहवलें नाहीं. तो स्वतःशींच मोठ्यानें हंसला.

००० ००० ०००

आपण शरच्चंद्रावर रागावणार असें आशा विलासजवळ जें म्हणाली, तें अर्थातच थट्टेनें होतें. पण, ती घरीं येऊन पोंचली तेव्हां त्याच्यावर खरोखर मनापासून सपाटून रागावण्यासारखा प्रसंग तेथें तयार होता.

ज्या सावकारांनीं दादू शेतकऱ्याची घरजमीन जप्त केल्याची हकीगत तिनें विलासला सांगितली होती, ते नानासाहेब सावकार तिच्या घरीं आले होते व घराबाहेरच्या ओट्यावरच त्यांचें आणि भाऊसाहेब व शरच्चंद्र यांचें भांडणाच्या स्वरांत मोठमोठ्यानें बोलणें चाललें होतें.

आशेला पहातांच नानासाहेब उसळून म्हणाले,

"आलोस का तूं? बरं झालं. तुझीच वाट पहात होतों. तुला मीं हजारदां सांगितलं आहे, कीं हें देशभक्तीचं खूळ काढून टाक आपल्या डोक्यांतनं. तुला मी लहानपणापासून पहातों आहें, अन् तुला उपदेशाचे चार शब्द सांगायचा तुझ्या भाऊंच्या-इतकाच मला हक्क आहे. अग, देशभक्तीचीं कामं बायकांचीं का आहेत? आमची आक्का नाहीं का तुझ्यासारखी शिकलीसवरली? पण मीं वऱ्हाडांतला एक इनामदार नवरा पाहिला, त्याच्याशीं मुकाटयानं लग्न करून आतां आनंदानं संसार करते आहे ती. दोन मुलं होऊन तिसऱ्यांदा दिवस गेले आहेत तिला!"

आशा हंसून म्हणाली,

"मग मला त्यात आनंदच आहे कीं नानासाहेब. आक्का बाळंत झाली कीं मला कळवा, म्हणजे त्या वेळेस मी तुरुंगांत नसलें तर मोठया हौसेनं बाळंतविडा धाडीन! माझ्या देश-भक्तीचा तुम्ही कशाला उगीच आपल्या जिवाला त्रास करून घेतां?"

"कशाला म्हणजे? तुझा हा बाप शहाणा असता तर आम्हांला काळजी करायचं कांहींच कारण नव्हतं. पण, देशकार्याचं वारं तुमच्या घरांत शिरलं आहे तें या पिढींत सुद्धां जाईलसं दिसत नाहीं, म्हणून माझा जीव तळमळतो. टिळकांच्या नादानं या भाऊ-साहेबानं पुष्कळ वाटोळं करून घेतलं आपल्या घरादाराचं! आतां ..."

त्यावर भाऊसाहेब उसळून म्हणाले,

"अरे नाना, माझं घरदार गेलं तर तुला किती दुःख होईल तें महीत आहे मला. जॅकसनच्या खुनाच्या वेळेस मला पकडलं त्या वेळेस माझ्यासाठीं पांच हजारांचा जामीन भरायला कांहीं पुढं आला नाहींस. मी कैदेंत गेलों तें खुशाल उघडया डोळयांनीं पाहिलंस कीं!"

" मग काय तुझं म्हणणं तुमच्या या मूर्खपणाच्या देशकार्याच्या उपद्व्यापाला-"

असल्या या शब्दांनीं आपले वडील अधिकच संतप्त होतील अशी भीति वाटून आशा मध्येंच म्हणाली,

" पण नानासाहेब, हा वाद मागं पुष्कळदां झाला आहे. या आत्तांच्या सत्याग्रहाच्या चळवळीच्या वेळीं सुद्धां तुम्ही कांहीं थोडया वेळां नाहीं मला उपदेश केला. तुमचीं आमचीं मतं निराळीं, मार्ग निराळे, हें ठरलं आहे. मग उगाच पुनःपुन्हा वादंग कशाला? गरिबांना नाडायचं, गबर व्हायचं, अन् सरकारची मर्जी संपादन करायची, हें तुमचं व्रत तुम्हीं चालवा; आमचं व्रत आम्ही चालवतों. पाडव्याच्या दिवशीं सत्याग्रह करून धरणाचं काम बंद पाडायचं आम्हीं ठरवलं आहे तें कांहीं आतां टळत नाहीं. तुम्हीं कितीहि उपदेश केला तरी कांहीं उपयोग नाहीं. धाकदपटशा दाखवला तरी आम्ही कांहीं भिणार नाहीं."

"मी कशाला धाक दाखवूं? तीं भेकड कामं तुमचींच, चळवळयांचींच !"

" नानासाहेब, आतां मात्र संभाळून बोला हं !" आशा तीव्र स्वरांत म्हणाली.

" संभाळून काय म्हणून ? कर्म करतांना कांहीं वाटत नाहीं; मग मीं तक्रार केली तर येवढा घुस्सा कशासाठीं ? तूं यायच्या आधीं या दोघांचं अन् माझं हेंच बोलणं चाललं होतं. तुम्ही धाकदपटशाच्या मार्गाचा अवलंब केला आहे याचा प्रत्यक्ष पुरावा आहे माझ्याजवळ."

आशेनें विस्मयानें विचारलें,

" म्हणजे ! म्हणतां काय ? "

नानासाहेबांनीं हंसत म्हटलें,

" आतां कसं विचारलंस ? सांगतों. आज सकाळीं मी उठलों तों माझ्या उशागती एक चिठी सांपडली मला. त्या चिठींत

लिहिलं होतं– 'तुम्हीं कंपनीकडून कॉंपेन्सेशन् घेतलंत तर याद राखून ठेवा. प्राण घेऊं तुमचा !' अन् मजकुराखालीं 'सत्याग्रही' अशी सही होती."

आशा एकदम आवेशानें म्हणाली,

"छे छे ! आमच्यापैकीं कोणीं अशी चिठ्ठी लिहिली असणं शक्यच नाहीं."

"मग कुणीं लिहिली असणार ?"

"आमच्यावर किटाळ आणायसाठीं कुणींहि लिहिली असेल; मी काय सांगूं ?"

"नको सांगूंस, पण तुम्हांला सगळ्यांना इशारत द्यायला आलों होतों. ती पुन्हा देतों आणखी जातों मी."

"पण ती चिठ्ठी कुठं आहे ती दाखवा तरी."

"हो, ती दाखवतों आहे ! मला काय लहान बाळ समजते आहेस तूं ? मी देणार ती चिठ्ठी सी. आय्. डी. कडे."

शरच्चंद्र एकदम म्हणाला,

"हो, द्या द्या. लवकर द्या हं मात्र. म्हणजे पुढच्या वेळच्या किताबांच्या यादींत तुमची रावबहाद्दुरी निश्चित ठरेल !"

या बोलण्यानें नानासाहेब खूपच संतापले, व अद्वातद्वा बरें-वसें बोलून निघून गेले.

भाऊसाहेब उठून घरांत गेल्यावर शरच्चंद्र आशेस म्हणाला,

"कशी घाबरली आहे नानासाहेबांची स्वारी ?"

कांहीं बोलण्याऐवजीं आशेनें त्याच्याकडे तीक्ष्ण नजरेनें रोंखून पाहिलें. त्यानें विचारलें,

"अशी काय पहाते आहेस ?"

तिनें अगदीं संथ स्वरांत म्हटलें,

"मी विचारतें त्याचं सरळ आणि खरं उत्तर द्या."

" काय ? "

ती चिठी तुम्हीं पाठवलीत काय ? "

" होय ! "

" फार वाईट केलंत. "

असें म्हणून आशा त्याला संतापानें पुष्कळ बोलली.

अनत्याचाराचें तत्त्व शरच्चंद्राला मान्य नाहीं हें तिला माहीत होतें; आणि त्या तत्त्वाचें त्याच्याकडून परिपालन व्हावें यासाठीं तिला कितीदां तरी त्याच्याशीं कठोर भाषा करावी लागली होती. तीच भाषा आज तिनें पुन्हा केली, व अखेर म्हटलें,

" तुम्हाला अशा गोष्टी करायच्या असतील तर माझ्या-पासून दूर होऊन तुम्हांला काय करायचं असेल तें करा. तुम्हांला जें योग्य दिसतं तें करायला तुम्ही मोकळे आहांत; पण तें करण्यापूर्वीं तुमचा माझा सहवास संपला पाहिजे. "

शरच्चंद्र एकदम म्हणाला,

" छे छे, असं बोलूं नकोस. माझ्या हृदयांत दोन गोष्टींचं केवढं युद्ध चाललं आहे तुला कल्पना नाहीं. एकीकडे वाटेल त्या मार्गानं स्वातंत्र्य मिळविण्याची जबरदस्त इच्छा हृदयांत कल्लोळ उठवते, आणखी दुसरीकडे. ...... "

पुढें बोलण्यापूर्वीं शरच्चंद्र थोडा थांबला, आणि खालीं जमिनीकडे नजर लावून बसलेल्या आशेकडे पहात घोगऱ्या आवाजानें म्हणाला,

"........दुसरीकडे...तुझ्यावरचं प्रेम !........"

---

# प्रकरण ९ वें

तळवलीच्या सत्याग्रहाच्या त्या चळवळीला दिवसानु-दिवस फार मोठें स्वरूप प्राप्त होऊं लागलें; आणि एका गोष्टीमुळें अमुक एक विशिष्ट डाव साधण्यासाठीं झटणाऱ्या दोन विरोधी सैन्यांतील झटापटीसारखी ती चळवळ भासूं लागली.

ही गोष्ट म्हणजे उन्हाळा संपतांच येणारा पावसाळा होय.

कंपनीचा बेत असा, कीं पावसाळ्याची झड लागावयाच्या आंत धरणाची भिंत अर्धीअधिक उभी केली, कीं मग कामाला धोका नाहीं. पण, हें जर का न साधलें तर पावसाच्या पाण्यानें भिंतीचा पायाच वाहून जाईल, चार महिने हात जोडून स्वस्थ बसावें लागेल, आणि मग ऑक्टोबरच्या सुमाराला काम पुन्हा प्रारंभापासून सुरू करावें लागेल. तेव्हां मृग लागण्याच्या आंत मिळणाऱ्या दोन-अडीच महिन्यांच्या अवधींत पदरांत पाडून घेतां येईल तेवढें काम पाडून घ्यावयाचें, या हिशोबानें दगड, चुना, खडी इत्यादि बांध-कामाचें साहित्य कंपनीनें प्रचंड प्रमाणावर धरणासाठीं आंखलेल्या जागेजवळ आणून रचलें होतें; आणि कातकरी, मजूर, पाथरवट, मुकदम, ओव्हरसिअर असें प्रचंड माणूसबळहि सुसज्ज केलें होतें. कंपनीच्या बड्याबड्या ऑफिसरांचा मुक्काम लोणावळ्यास होता; पण अंगमेहनत करण्यासाठीं रुजूं झालेले हजारों नोकर व मजूर यांचा तळ पडला होता तळवलीच्या पसरट खोऱ्यांत. पाडव्याच्या दिवशीं पहिली कुदळ मारतांच कमालीच्या झपाट्यानें, जरूर पडली तर रात्रंदिवस सतत काम चालविण्याची कंपनीकडून तयारी चालली होती.

कंपनीचा हा हिशोब आशा व तिचे सहकारी ओळखून होते; आणि म्हणून त्यांना वाटत होतें, कीं दोनअडीच महिने

जर सत्याग्रह सारखा चालू ठेवून धरणाचें काम आपण होऊं दिले नाहीं, तर पुढें पावसाळा येतांच निसर्गच आपल्या बाजूनें लढेल. आपल्याला चार महिने विश्रांति मिळेल, आपलें मनुष्यबळ व द्रव्यबळ हीं त्या अवधींत सांवरतां येतील, पावसाळा उघडल्यावर अधिक नेटानें झगडतां येईल, आणि, त्याचा काय नियम, तेवढ्या अवधींत लोकमताचा विरोध पुरेसा लक्षांत येऊन कंपनी आपली योजना कदाचित् कायमची सोडून देईल. सारांश, पाडव्याच्या दिवसापासून पुढच्या दोनअडीच महिन्यांत आपल्या चळवळीची शिकस्त केली, कीं आपण अर्धा डाव जिंकला हें आशा व तिचे सहकारी जाणून होते; व त्यामुळें त्यांनीं भगीरथ प्रयत्न चालविले होते.

आशेनें केवळ पुण्याचीच मदत मागितली होती असें नव्हे, तर सबंध महाराष्ट्राला हांक मारली होती. इतकेंच नव्हे, तर मध्यंतरीं गांधींना भेटून व आपल्या चळवळीला त्यांचा जाहीर पुरस्कार मिळवून आपली हांक हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांत ऐकूं जाईल अशी व्यवस्था केली होती. त्या हांकेला मिळालेलें उत्तरहि दिवसेंदिवस अधिकाधिक समाधानकारक वाटूं लागलें होतें. द्रव्य-निधि सांचत होता, आणि नागपूरपासून हुबळीपर्यंतच्या मराठी भागांतूनच नव्हे, तर गुजराथ आणि पंजाब प्रांतांतील अनेक ठिकाणांहूनहि सत्याग्रहयांचीं पथकें ठरलेल्या दिवशीं दाखल होण्याचीं अभिवचनें रोजच्या रोज येत होतीं.

चळवळीचा हा रंग पाहून सोराबजी दिनशा कंपनीचे डायरेक्टर्स मनांतल्या मनांत घाबरल्यावांचून राहिले नाहींत.

पुण्याच्या एका मोठ्या पुढाऱ्यांना मध्यस्थी घालून त्यांनीं समेटाचीं बोलणीं सुरू केलीं.

त्या पुढाऱ्यांच्या वर्तमानपत्राच्या कचेरींत समेटाचें खलबत करण्यासाठीं दोन्ही पक्षांच्या पुढाऱ्यांची सभा भरली.

पण आशेला माहीत होतें, कीं या समेटाच्या आविर्भावांत कंपनीचा खोल डाव असला पाहिजे. समेटाच्या वाटाघाटींत आपल्याला व आपल्या सहकाऱ्यांना गुंतवून, कालहरण करून आपल्या चळवळीची तयारी कच्ची करण्याचा, आणि मग ऐन वेळीं आपल्याला असावध गांठून जमिनीच्या मोबदल्याचा दर फार तर एखाद्या शिवराईनें वाढवून तो मान्य करावयास आपल्याला भाग पाडावयाचें अशी कंपनीच्या डायरेक्टरांची धूर्त योजना असली पाहिजे हें आशेनें ओळखलें होतें.

म्हणून समेटाची ती सभा सुरू होतांना प्रारंभींच तिनें रोख-ठोक भाषण करून सांगितलें,

" कंपनी समेट करायला तयार आहे हें पाहून मला आनंद होतो. विनाकारण हट्टानं सत्याग्रह करून हजारों गोर-गरिबांना हालअपेष्टांत घालायची आम्हांलाहि कांहीं हौस आहे असं नाहीं. तेव्हां समेट होत असेल तर आम्हांलाहि हवा आहे. मात्र, समेटाच्या नांवाखालीं ' माझं तें माझंच, अन् तुझं तेंहि माझंच ' असला सामोपचार कंपनी करणार असेल तर तशानं आम्ही फसणार नाहीं, हें सर्वांनीं स्पष्ट समजावं. शेतकऱ्यांच्या-कडून मागण्यांत येणाऱ्या जमिनीइतक्या क्षेत्रफळाच्या आणि तितक्याच कसाच्या जमिनी त्यांना मिळाबला पाहिजेत, ही आमची वाजवी मागणी आहे. हें होत नसेल तर आपली खाजगी मालमत्ता केवढ्या किमतीला द्यायची तें सांगण्याचा प्रत्येक शेतकऱ्यास निसर्गसिद्ध हक्क आहे. शेतकरी मागतील त्या किमती कंपनीनें दिल्या पाहिजेत ही आमची अट आहे. यांपैकीं कोणती गोष्ट करायला कंपनीचे डायरेक्टर्स तयार आहेत तें त्यांनीं सांगावं म्हणजे या बैठकीला समेट होईल, आणि सत्याग्रहाची चळवळ थांबेल असं आश्वासन मी देतें. नाहींतर मात्र दुसऱ्या कोणत्याहि अटीवर समेट होणं शक्य नाहीं. वायफळ चर्चेंत वेळ घालायची आमची इच्छा नाहीं. "

आशेचें हें भाषण म्हणजे त्या सभेंत पडलेला अनपेक्षित बॉंबच होता. त्याचा स्फोट होतांच सभेंत एकदम विचित्र स्तब्धता झाली. आतां पुढें काय होणार कुणालाच कळेना.

कंपनीची डायरेक्टर मंडळी आपापसांत कुजबुजूं लागली. ज्या संपादकांच्या कचेरींत सभा भरली होती, ते हताश मुद्रेनें पाहूं लागले. डायरेक्टरांच्या पैकीं एकानें त्यांच्याशीं कांहीं कानगोष्ट केली तेव्हां "मी तरी आतां काय करणार?" अशा अभिप्रायानें ते स्वतःशींच एकदोनदां खांकरले. मग त्यांनीं हळूच खूण करून आशेला जरा बाजूला नेलें व म्हटलें,

"हें तुम्हीं काय केलंत? अशानं कां चळवळ टाळतां येईल?"

आशेनें झट्कन् म्हटलें,

"चळवळ टाळायची आमची इच्छाच नाहीं. त्या इच्छेनं का तुम्हीं ही सभा बोलावलीत? सत्याग्रहाच्या परिणामाला आम्ही भीत नाहीं. तुम्हीहि भीत नसाल असं वाटतं. पाड-व्याच्या दिवशीं तळवलीला येऊन आमच्यावरोबर जमिनीवर धरणं धरायची तुम्हीं एका भरसभेंत प्रतिज्ञा केली आहे, लक्षांत आहे ना?"

ते पुढारी हंसण्याचा प्रयत्न करून म्हणाले,

"अहो, तसं बोलल्याशिवाय चालत नाहीं. माझ्यासारखा पुढारी तसं बोलला म्हणून तर कंपनीचे डायरेक्टर्स समेटाची भाषा बोलायला लागले. आतां एकानं ओढून धरायचं, एकानं म्हणायचं 'जाऊं द्या हो,' असा सिद्धसाधकपणा आपण केला पाहिजे."

आशेनें त्यांच्या तोंडाकडे तीक्ष्ण नजरेनें एकवार पाहिलें व म्हटलें,

"ही तुमची मुत्सद्देगिरी तुमची तुम्हांला लखलाभ होवो! शेतकऱ्यांच्या हिताचा लिलांव करायचा नाहीं आम्हांला. त्यांच्या हक्कांचं रक्षण करायचं आहे."

तर्के बोलून आशा त्यांच्यापुढून दूर होऊन परत आपल्या जागीं जाऊन बसली.

ते पुढारी डायरेक्टर मंडळींत गेले, आणि असहाय मुद्रा करून त्यांनीं त्यांच्या कानांत कांहींतरी सांगितलें.

त्याबरोबर डायरेक्टर मंडळींची पुन्हा आपापसांत कुजबूज झाली, त्यांच्या माना जोरजोरानें हालल्या, आणि त्यांचे चेहरे क्रुद्ध झाले.

सभास्थान सोडून ते निघून गेले. सभेच्या पूर्वीं प्रत्येकाशीं हस्तांदोलन करण्याची ज्यांनी उत्सुकता दाखविली होती, त्या बूटपाटलोणवाल्यांचें तें सौजन्य आणि ती आदब पार नाहींशी झाली. जातांना त्यांनीं कोणाशींहि हस्तांदोलन केलें नाहीं.

अशा प्रकारें ती सभा मोडली.

सत्याग्रह होणार हें आतां निश्चित झालें.

आणि चिडून गेलेले डायरेक्टर आतां सत्याग्रह दडपण्यासाठीं वाटेल ते उपाय योजणार हेंहि त्याबरोबरच निश्चित झालें.

कंपनीच्या लोकांच्या या उपायांबद्दल नाना प्रकारच्या बातम्या रोज तळवलीला येऊन थडकूं लागल्या. यांपैकीं कांहीं बातम्या फारच चमत्कारिक आणि भयकारक असत अंत:करणा-पासून ज्यांना सत्याग्रहाचें तत्त्व पटलेलें आहे तीं माणसें असल्या बातम्यांनीं डगमगणार नाहींत हें आशेला माहीत होतें. पण, ती हेंहि समजून होती, कीं सत्याग्रहयांत अशीं माणसें थोडीं होतीं, व त्यामुळें कंपनीनें मनाशीं योजलेल्या उपायांबद्दल ज्या नव्या नव्या बातम्या रोजच्यारोज उठत होत्या, त्यांचा आपल्याला प्रतिकूल असा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं.

एकीकडे ती सगळयांना धीराच्या गोष्टी सांगत होती, पण दुसरीकडे तिच्या पुन:पुन्हा मनांत येत होतें, कीं कंपनीकडील खरी बित्तंबातमी आपल्याला कळेल तर फार बरें होईल. ज्या बातम्या तिच्या कानांवर येत त्यांवर तिचा विश्वास बसत नसे; पण तिला

राहून राहून वाटे, त्यांत तथ्य किती आहे तें आपल्याला समजलें पाहिजे.

अशा वेळीं तिला विलासची आठवण होई, आणि एक उंच, सडपातळ, गोरापान, देखणा पुरुष तिच्या दृष्टीला सारखा दिसूं लागे.

'विलास आपल्याला सर्वस्वीं विसरला काय ?' असा प्रश्न तिच्या मनांत येई, आणि दर वेळीं तिचें मन म्हणे, असें होणें शक्य नाहीं !

तिचा हा तर्क खोटा ठरला नाहीं.

एके दिवशीं संध्याकाळीं अगदीं तिन्हीसांजा दमून भागून ती घरी परत आली, तों भाऊसाहेब तिला म्हणाले,

"तुझ्या नांवाचं एक पत्र आलं आहे."

"कुठं आहे ?"

"हें पहा. संध्याकाळीं एका माणसानं मला तें आणून दिलं. कुणीं आणून दिलं आहे म्हणून मी विचारणार तों त्यापूर्वींच तो इसम निघूनहि गेला होता. 'अगदीं खाजगी' असं त्यावर लिहिलं आहे म्हणून मीं तें फोडलं नाहीं."

आशेनें तें पत्र फोडलें, आणि वाचलें.

पत्रावर विलासची सही होती, आणि मजकूर अगदीं थोडा होता, तो असा—

"तुम्हांला कांहीं फार महत्वाच्या गोष्टी सांगावयाच्या आहेत. तुमच्या घरीं येऊन तुमची गांठ घेणं मला शक्य नाहीं. कारण, तुमच्या घरीं मी सहा दिवस राहिलों येवढ्या गोष्टीमुळंच कंपनीच्या लोकांच्या दृष्टीनं मी संशयास्पद इसम ठरलों आहें.

"तेव्हां तुम्हीच इकडं आलांत तर बरं होईल. इकडं म्हणजे आमच्या कँपवर नव्हे. छे, तें अगदींच वेडेपणाचं होईल. पण, इथं अगदीं बाजूला 'क्रेसंट हॉटेल' नांवाचं हॉटेल आहे; तिथं आपण एकमेकांना भेटलों तर कांहीं हरकत नाहीं. त्या हॉटेलांत

उद्यां रात्रीं तिघांच्या जेवणाची ऑर्डर मीं देऊन ठेवली आहे. तिघांची अशासाठीं, कीं तुमच्याबरोबर शरच्चंद्र आला तर मला हवा आहे. त्या दिवशीं मला स्टेशनवर पोंचवायला तो आला नाहीं याबद्दल मला त्याला चांगला मार द्यावयाचा आहे. जेवणानं त्याचं तोंड बंद केलं, कीं बुक्क्यांचा मार द्यायला सोपं पडेल असा मीं मनाशीं हिशोब केला आहे.

" हें माझं कारस्थान त्या लवाडाला कळवूं नका.

" उद्यां मी वाट पहात आहें. "

या पत्रानें आशेला आनंद झाला.

विलासच्या बोलण्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं शरच्चंद्राबरोबर जावयाचें तिनें ठरविलें.

पण दुसऱ्या दिवशीं तिच्या वडिलांची प्रकृति एकाएकीं फार बिघडली. आतांशा त्यांची प्रकृति जराशी ढांसळूं लागलीच होती; आणि एकीकडे चळवळीच्या कामाचा व्याप उरकतां उरकतां आशेच्या मनांत आपल्या पित्याच्या प्रकृतीबद्दलची विलक्षण चिंता डोकावल्यावांचून रहात नसे. त्यांना दम्याचा झटका मधूनच एखादे दिवशीं येई, व तो आला, कीं अंथरुणावर निपचित पडण्यावांचून त्यांना गत्यंतर उरत नसे.

आज त्यांच्या दम्यानें अशीच उचल खाल्ली, व त्यामूळें आशा अखेर शरच्चंद्रास म्हणाली,

" आतां तुम्हालाच एकट्याला गेलं पाहिजे. विलासना म्हणावं, माझा अगदीं नाइलाज झाला म्हणून मी आलें नाहीं; रागावूं नका."

अर्थात् ' क्रेसंट ' हॉटेलमध्यें वाट पहात बसलेल्या विलासला संध्याकाळीं आठाच्या सुमाराला एकटा शरच्चंद्रच हॉटेलच्या दारांतून आंत आलेला दिसला.

त्याचें स्वागत करण्यासाठीं उठून विलास त्याच्याजवळ गेला, व त्याच्या मागें अंतरावरहि कोठें आशा दिसली नाहीं तेव्हां त्यानें विचारलें,

" हें काय ? तूं एकटाच आलास ?"

" हो. आशा आली नाहीं. तुझी फार निराशा झाली काय ? "

" Don't be silly ! "

शरच्चंद्र हंसला, व आशेला कां येतां आलें नाहीं त्याचा त्यानें खुलासा केला.

विलास म्हणाला,

" त्या आल्या असत्या तर बरं झालं असतं; पण तूं आलास हें त्यांतल्या त्यांत बरं केलंस. कारण, खरोखरच फार महत्वाच्या गोष्टी तुम्हांला सांगायच्या आहेत. ये. त्या खोलींतली निवांत जागा आपल्यासाठी मीं रिझर्व केली आहे."

खोलींत जाऊन बसल्यावर शरच्चंद्रानें उत्सुकतेनें विचारलें,

" हं, सांग सांग बाबा काय सांगणार आहेस तें ? "

विलास हंसला व म्हणाला,

" अरे, अशी घाई कां ? छानपैकीं जेवण तयार करवलं आहे मीं. जेवतां जेवतां बोलूं आपण. "

" अच्छा, अच्छा. "

" अं ... बरं.... हें ..."

" काय ?...."

" तूं ड्रिंक घेणार का थोडं ?"

" घेऊं या. "

" काय मागवूं ?"

" Anything. मीं फार दिवसांत घेतलंच नाहीं, तेव्हां कांहींहि घेतलं तरी चांगलंच वाटेल. शिवाय तूं त्यांतला दर्दी आहेस, तेव्हां तूं मागवशील तें उत्तमच असणार; नाहीं का ?"

विलास हंसला, व त्यानें परिचारकाला खूण करून बोलावून मद्य मागविलें.

ग्लास तयार करून परिचारक दूर गेल्यावर दोघांनीं जेव्हां ग्लास उचलले तेव्हां विलासनें हंसत विचारलें,

" कुणाच्या नांवानं ?"

" तूं म्हणशील त्याच्या. "

" To Hope, the girl nearest to your heart!" असें म्हणून ग्लास ऐटीनें हालवून विलासनें तो तोंडाला लावला.

" To the girl nearest to *your* heart!" ( ज्या मुलीवर तूं आषक असशील तिच्या नांवानं. )

" O! I haven't any!" (अशी कोणी नाहींच आहे ! )

" खोटं बोलूं नकोस. "

विषय बदलण्यासाठी विलासनें म्हटलें,

" तें जाऊं दे. शरद्, या मूर्खपणाच्या चळवळीपासून आशेला परावृत्त करणं तुझ्या हातीं आहे अशी माझी समजूत आहे. "

" अगदीं चुकीची आहे तुझी समजूत. अनत्याचारी सत्याग्रहावर तिची विलक्षण निष्ठा आहे. तिच्या स्वतःच्या अनुभवानं ती पुढंमागं नाहींशी झाली तर होईल. "

" पण या चळवळीचीं लक्षणं मला ठीक दिसत नाहींत; हें सांगण्यासाठींच मला आशेची भेट हवी होती. कंपनीनं अगदीं राक्षसी उपाय योजायचं ठरवलं आहे. '

" म्हणजे ! काय करणार आहेत तरी काय ? "

आजूबाजूला कोणी नाहीं अशी खात्री करून घेण्यासाठीं विलासनें एकदां सगळीकडे नजर टाकली, व मग आवाज अगदीं हलका करून म्हटलें,

" सांगतों ऐक. सत्याग्रहाच्या दिवशीं ज्या ठिकाणीं आमचे मजूर कामाला लागणार त्या ठिकाणीं पोलिसांची एक तुकडी आणि मॅजिस्ट्रेट सरकारकडून मागून घेऊन कंपनी हजर ठेवणार आहे. "

" मग त्यांत काय ? ध्रपकड होणार हें सत्याग्रही ओळखून आहेत, अन् त्या गोष्टीला त्यांची तयारी आहे. "

" हो; पण ज्या गोष्टींमुळं मला चिंता वाटते त्या अजून मीं तुला सांगितल्याच नाहींत. "

" त्या कोणत्या ?"

" कंपनीनं मुंबईहून शंभर पठाण मागवले आहेत. सत्याग्रही जमिनीवर पडले, कीं हे पठाण लोक त्यांना ओढीत फरफटत नेऊन दूर फेंकणार आहेत. ते पुन्हा आपल्या जागेवर आले तर हे पठाण त्यांना पुन्हा फेंकून देणार आहेत. इतक्याउपरहि सत्याग्रह्यांनीं ऐकलं नाहीं तर त्यांच्या अंगावर तापलेल्या पाण्याचा वर्षाव करण्यासाठीं आगीचे मोठमोठाले बंब तयार ठेवण्यांत येणार आहेत. आणि येवढ्यानंहि भागलं नाहीं, तर पोलीस मधें पडतील, त्यांच्या कर्तव्यांत त्यांना अडथळा केल्याचा आरोप ठेवून मॅजिस्ट्रेटच्या समक्ष सत्याग्रह्यांना पकडण्यांत येईल, आणखी त्यांच्यावर खटले भरण्यांत येतील. "

" अस्सं !"

असें उद्गारून शरच्चंद्र विचारमग्न झाला.

कांहीं वेळानें त्यानें विचारलें,

" कायरे, या युक्त्या कुणाच्या डोक्यांतनं निघाल्या ? ज्यानं आपलं डोकं असं चालवलं असेल त्याचं खरं म्हणशील तर मला अभिनंदन करावंसं वाटतं. अशा माणसाशीं त्याच्याच युद्धनीतीनं दोन डाव करण्यांत मोठी मजा आहे, नाहीं ? कोण ? कोण हा मनुष्य ?"

" कंपनीच्या डायरेक्टरांपैकींच एक आहे तो. त्याचं नांव ओगॉर्मन. मोठा धूर्त आणखी कावेबाज आहे. बाकीचे डायरेक्टर आहेत पारशी. या चळवळीला तोंड द्यायचं काम आपल्या हातून निभायचं नाहीं हें जाणून त्यांनीं या मोहिमेचीं सगळीं सूत्रं या ओगॉर्मनच्या हातीं दिलीं आहेत. "

"तो असतो कुठं ? मुंबईला का ?"

"छे छे, स्वारीचा मुक्काम सध्यां आमच्या कॅंपवरच आहे."

"मला दाखव कीं एकदां. कसा काय आहे दिसायला ?" शरच्चंद्रानें विचारलें.

"राक्षस आहे नुसता ! भला धिप्पाड आहे. साडेसहा फूट उंच आहे. नाक गरुडासारखं आहे. जिव्हणी अशी आहे, कीं सदा कुणावर तरी त्यानं दांत धरला आहे असं वाटतं. अंगावर सगळी-कडे दाट केंस आहेत. कानांचीं पाळींसुद्धां केंसांनं झांकलीं आहेत. डोक्यावरचे केंस कधीं विंचरलेले नसतात. डोळे खोल आहेत; पण निळे आणि तीक्ष्ण आहेत. अन् भुंवयांचे केंससुद्धां बोट बोट वाढ-लेले आहेत."

"अस्सं ! मला या व्यक्तीविषयीं फारच जिज्ञासा वाटायला लागली आहे. तुमच्या कॅंपवर तो कुठं राहतो, किती वाजतां उठतो, केव्हां जेवतो, धरणाच्या कामाची तपासणी करायला केव्हां जातो, केव्हां परत येतो, सगळं सगळं मला सांग. इतकंच नाहीं, तर तो आपली मोटार स्वतःच हांकतो, कीं त्याचा ड्रायव्हर आहे, अन् ड्रायव्हर असला तर तो कोण आहे, कसा आहे, कोणत्या जातीचा आहे, तें सगळं मला कळलं पाहिजे."

विलास हंसून म्हणाला,

"मोठा विचित्र दिसतोस तूं मला ! येवढी काय तुला या ओगॉर्मनबद्दल जिज्ञासा वाटते बुवा ?"

"अरे, सत्याग्रहाचं मला माहीत नाहीं, पण नेहमींच्या युद्धांतली अशी म्हण आहे, कीं विरुद्ध पक्षाच्या सैन्यापेक्षांहि सेना-पतीची माहिती अधिक असावी."

विलास हंसला. "अरे वा ! तूं तर अगदीं नेपोलियनची भाषा बोलायला लागला आहेस !"

यावर सरळ उत्तर देण्याऐवजीं शरच्चंद्रानें आपला ग्लास उचलला, आणि, "Here's to Napoleon-the conqueror!"

भाऊस [illegible] तिला म्हणत,

" आश[illegible], माझी चिंता कसली करतेस ? "

" नाहीं [illegible] " येवढेंच म्हणून आशा आपला खालचा ओंठ दातांखालीं धरून मान फिरवून स्तब्ध रहात असे.

एकदां भाऊंनी तिला म्हटलें,

" नेमका याच वेळीं माझा आजार वाढावा म्हणजे एक प्रकारं तुझ्या कसोटीची वेळ आली म्हणायची ! पण, माझी मुलगी या कसोटींतून पार पडेल अशी माझी खात्री आहे. "

आशा कांहींच बोलली नाहीं. तिनें फक्त आपल्या हातीं धरलेला त्यांचा हात घट्ट दाबला.

ते पुढें म्हणाले,

" या आणीबाणीच्या वेळीं मन घट्ट करून माझा विसर तूं केला पाहिजेस. हें सोपं नाहीं, हें मी जाणतों; पण जें सोपं तें करायची होस तूं आजपर्यंत कधीं दाखवलीच नाहींस. अन् तूं हें विसरूं नकोस, कीं तुझ्या या पित्याला मरणाची भीति कधीं वाटलीच नाहीं. अग, या देहाचं अखेर पतन व्हायचं हें ठरलेलंच आहे. तें घरच्या शय्येवर झालं काय किंवा बंदिशाळेंत झालं काय सारखंच; हें असं मीं नित्य मनांत वागवलं तसंच हेंहि मीं माझ्या मनाला पूर्ण शिकवलं आहे, कीं माझ्या देहपतनाच्या वेळीं माझी लेक माझ्याजवळ असली काय अगर नसली काय, दोन्ही सारखींच. "

आशा म्हणाली,

" छे छे, सारखींच कसं म्हणतां ? मला तर त्यांत फार मोठा फरक वाटतो. मी तुरुंगांत गेलें, कीं इकडे तुमची–"

" अग, माझी व्यवस्था अगदीं उत्तम ठेवून घेईन मीं. आपला म्हातारा गडी दौलती मला उत्तम संभाळणार नाहीं का बरं ? तूं अगदीं काळजी करूं नकोस. अन् हें बघ, मी जरी

मधांशीं निर्वाणीचं बोललों तरी तसं होणार आहे थोडंच! माझी तर खात्री आहे, कीं तुझी तुरुंगांतून सुटका होईल तोंपर्यंत मी चांगला खडखडीत बरा होईन! मागं नाहीं का मी अशाच झट-क्यांतनं बरा झालों? हें दम्याचं दुखणं असंच विचित्र आहे. उगीचच भेडसावून सोडतं माणसाला."

अशा प्रकारें तिचे वडील जरी तिला पुन:पुन्हा धीराच्या आणि विवेकाच्या गोष्टी सांगत, तरी आशेच्या मनांतील भय आणि चिंता रोजच्यारोज वाढतच होती.

आणि यांत भर घालायला चळवळीच्या हजार भानगडी रोज तयार असतच.

पुण्याच्या ज्या प्रमुख पुढाऱ्यांनीं 'सत्याग्रह सुरू झाला तर कंपनीच्या मजुरांची कुदळ आडविण्यासाठीं प्रथम मी जमिनीवर पडेन' अशी एकदां जाहीर प्रतिज्ञा केली होती, त्यांनीं समेटाची सभा मोडल्यापासून पगडी फिरविली होती! त्यांनीं आशेला कळ-विलें होतें कीं, सत्याग्रहांत प्रत्यक्ष भाग घेणें आपल्याला शक्य नाहीं. त्यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या वर्तमानपत्राचा सूरहि मग बदलून सत्याग्रहास फारसा अनुकूल राहिला नव्हता. त्यांतील सत्याग्रहाचे अग्रलेख बंद होऊन त्या विषयावर फक्त स्फुटें येऊं लागलीं होतीं; व त्यांतहि असें प्रतिपादिलें जात होतें, कीं 'लोको-पयोगी कामासाठीं जमिनी मिळविण्याचा हक्क त्याबाबतच्या कायद्यान्वयें सरकारला आहे, व त्यामुळें 'जान अथवा जमीन' असें म्हणून कांहीं झालें तरी जमिनी न सोडण्याचा हट्ट शेत-कऱ्यांनीं करावा हें बरोबर नाहीं. जमिनींचा मोबदला योग्य प्रकारें मिळावा ही मागणी अर्थातच न्याय्य आहे. पण ती कंपनी-लाहि मान्य नाहीं असें नव्हे. आणि ती मान्य नसेल, तर मान्य करावयास लावण्यासाठीं शिकस्तीची खटपट करावयास आम्ही केव्हांहि तयार आहोंत.'

असल्या लेखांमुळें महाराष्ट्रांतील लोकांच्या विचाराला फाटे फुटून चळवळीचें बळ कमी झाल्यावांचून राहिलें नाहीं.

त्यांतल्या त्यांत आशेचा उत्साह कायम टिकविणारी येवढीच गोष्ट होती कीं, पुण्याच्या प्रमुख पुढाऱ्यांनीं जरी याप्रमाणें हातपाय गाळले, तरी पुण्याची तरुण पिढी तिच्या मदतीस धांवून आल्या-वाचून राहिली नाहीं. पुण्याहून शंभर स्वयंसेवक येऊन दाखल झाले होते, आणि आणखी येणार होते.

इतर कित्येक ठिकाणांहूनहि असेच स्वयंसेवक गोळा होत होते.

त्यांत कांहीं स्त्रिया होत्या, आणि पंधरापंधरा सोळासोळा वर्षांची कोंवळीं मुलेंहि होतीं. त्यांच्याकडे पाहिलें, कीं आशेच्या मनांत येई, ' आहे ! माझा देश अजूनहि जिवंत आहे ! ' आणि तिच्या हृदयांतील आनंदावर आणि उत्साहावर भरतीची अजस्र लाट उसळत असे.

अशा स्थितींत पाडव्याच्या आधींचा दिवस उजाडला.

००० ००० ०००

इकडे कंपनीनेंहि जय्यत तयारी केली होती.

ओगॉर्मेनच्या ऑफिसांत टाइपरायटरचा टकटकाट रात्रं-दिवस चालू होता, तारा येत होत्या जात होत्या, हुकूम सुटत होते, आणि ओगॉर्मेनला क्षणाचीहि फुरसत नव्हती.

पाडव्याच्या आधल्या दिवशीं सकाळीं ओगॉर्मेननें विला-सला आपल्या खोलींत बोलावलें व म्हटलें,

" सगळ्या एंजिनियरांच्यासाठीं मीं नोटीस काढली ती पोंच-ल्याची तुझी सही कां नाहीं तिच्यावर ?"

"कारण उघडच आहे. ती मला पोंचली नाहीं."

"कां ? काल संध्याकाळीं तूं कुठं होतास ?"

"टेनिस खेळायला गेलों होतों नेहमींप्रमाणं."

"नेहमींप्रमाणंच ? बमनजी मास्तरच्या लेकीबरोबर ?"

" That's nobody's business ! " ( लोकांना काय करायच्या आहेत या उठाठेवी ? )

त्या रोखठोक उत्तरानें ऑगॉर्मन थोडासा वरमला. पण तो कमी लबाड नव्हता. किंचित् हास्य करून तो म्हणाला,

" I can understand that you are still young. ( तूं तरुण आहेस तेव्हां असल्या गोष्टी क्षम्य आहेत. ) तें जाऊं दे. ती नोटीस ही बघ इथं माझ्या टेबलावर आहे. उद्यां सकाळीं काम सुरू व्हावयाच्या वेळीं कंपनीच्या सगळ्या एंजिनिअर्सनीं त्या त्या जागीं हजर असायला पाहिजे अशी ही नोटीस आहे. वाचून सही करशील का तिच्यावर ?"

विलासनें तो कागद वाचला, त्यावर सही केली, आणि विचारलें,

" आणखी कांहीं ?"

" कांहीं नाहीं. Good-bye ! "

" Good-bye ! " असें निर्विकार मुद्रेनें म्हणून विलास तेथून गेला.

टेबलाच्या एका खणांतून ओगॉर्मननें आपली डायरी काढली. त्या दिवशींच्या तारखेच्या पानावर त्यानें १, २ असे आंकडे घालून जीं कामें टिपून ठेवलीं होतीं त्यांतील जीं झालीं त्यांवर तो तांबड्या पेन्सिलीच्या आडव्या रेघा मारूं लागला.

तितक्यांत कोणसें खोलींत आलें, व सलाम करून उभें राहिलें.

ओगॉर्मननें मान वर करून पाहिलें तों त्याचा पठाण मोटार-ड्रायव्हर त्याच्यापुढें उभा होता. त्यानें ड्रायव्हरला म्हटलें,

" अजून अवकाश आहे निघायला ! इतक्यांत कशाला आलास ?"

" निघण्याबद्दल नाहीं. माझं दुसरं एक काम आहे."

" मी सतावलों आहे कामानं; आणखी तुझं काम आलं का भरीला ?"

" तसं नाहीं, पण—"

"पण काय ? बोल लवकर–"

"मुंबईहून मला तिकडे न्यायला एक माणूस आला आहे. माझ्या एका सख्याचं लग्न आहे. मला जायलाच पाहिजे."

"छट् छट् ! तुला रजा मिळणं शक्य नाहीं या वेळी. नीघ इथनं."

पण तो पठाण जागच्याजागींच उभा राहिला.

ओगॉर्मन चिडून म्हणाला,

"अरे, तूं काय म्हणून उभा राहिलास ? तुला सोडणं शक्य नाहीं. या वेळीं तर मोटार सारखी जय्यत तयार पाहिजे मला. तूं गेलास तर मोटार चालवणार कोण ? मोटार कांहीं आपोआप चालत नाहीं."

"मी बदली देतों."

"O, no no ! No बॅद्‌ली Please ! तुझ्यावांचून माझं चालायचं नाहीं."

"पण अगदीं उत्तम खात्रीचा बदली देतों. माझ्यापेक्षां खष करील असा."

"जातीनं कोण आहे."

"पठाण आहे."

"कुठं आहे ?"

"बाहेर उभा आहे. आणूं का आंत त्याला ?"

ओगॉर्मननें नुसती मान हालविली, व त्याबरोबर ड्रायव्हर झट्‌कन् जाऊन दुसऱ्या एका पठाणाला घेऊन आला.

त्याकडे तीक्ष्ण नजरेनें पाहून ओगॉर्मननें विचारलें,

"तुझं नांव काय ?"

"फिरदोस, सरकार."

"हां हां ! हें तर एका बड्या कवीचं नांव आहे."

"हां सरकार."

" तूं बदली राहणार काय ? "

" हां सरकार. "

" काम अच्छा करेंगा ? "

" हां सरकार. "

ओगॉर्मननें आपल्या ड्रायव्हरकडे पाहून म्हटलें,

" All right. तुम जाव. "

ड्रायव्हरनें सलाम केला.

ओगॉर्मननें विचारलें,

" तूं परत केव्हां येणार ?"

" शादी आटपल्याबरोबर. "

त्या दिवशीं ओगॉर्मनचा तो मोटारड्रायव्हर खरोखरच मुंबईस गेला. तो मुंबईस पोंचला त्या वेळेस जरी भर दुपारची तीन वाजायची वेळ होती, तरी गोलपिठ्यावरच्या एका दारूच्या दुकानांत जाऊन त्यानें रमच्या दोन बाटल्या खलास केल्या. तो तिसरी बाटली मागूं लागला तेव्हां कलालानें विचारलें,

" ए भाई, खिशांत पैसे आहेत का ? का उगीच चढवतो आहेस ?"

त्यावर तो ड्रायव्हर लाल व किलकिले होत चाललेले डोळे शक्य तितके वटारून, व झिंगल्यासारखे हातवारे करून म्हणाला,

" पैसा ? कितना पैसा चाहिये ? ये देखो ! "

आणि असें बरळून त्यानें आपल्या कलाबतूनें मढवलेल्या जाकिटाच्या खिशांतून नोटा काढून त्या कलालाच्या अंगावर भिरकावून दिल्या.

इकडे त्याच्या बदली नोकरीस राहिलेल्या फिरदोसनें ओगॉर्मनसाहेबाला मोहिनी घातल्याप्रमाणें चार घटकांच्या आंत विलक्षण खूष करून टाकलें. मोटार हांकण्याच्या विद्येतील त्याचें कौशल्य तर असामान्य होतेंच, पण त्याच्या जोडीला इतरहि एकदोन असे गुण त्याच्या अंगीं होते, कीं त्यामुळें

ओगॉर्मनसारखा मनुष्य ताबडतोब संतुष्ट व्हावा. एकतर तो आपण होऊन एक अवाक्षरसुद्धां बोलत नाहीं असें ओगॉर्मनला दिसून आलें, आणि शिवाय कांहीं विचारलें, कीं मोठ्या आदबीनें सलाम केल्याशिवाय, आणि 'सरकार' 'हुजूर' असें म्हटल्या-शिवाय तो उत्तर देत नसे. नोकरांनीं वायफळ बडबड केलेली ओगॉर्मनला आवडत नसे हें जितकें खरें, तितकेंच धन्याला अत्यंत मोठेपणा देणारीं नोकरमाणसें त्याला एकदम आवडूं लागत हेंहि खरें. त्यामुळें फिरदोसनें त्याची मर्जी ताबडतोब संपादन केली.

ooo ooo ooo

अखेर पाडव्याच्या दिवशींचा प्रातःकाल प्राप्त झाला.

धरणाच्या त्या जागेला एखाद्या रणक्षेत्राचें स्वरूप आलें.

कंपनीच्या बाजूनें मजूर तयार होते, आगीचे बंब दाखल झाले होते, पोलिसांची तुकडी दूर उभी होती, मॅजिस्ट्रेट एका झाडाखालीं खुर्ची टाकून बसले होते, सगळी तयारी अगदीं जय्यत होती.

फक्त ओगॉर्मन यावयाचा राहिला होता. पण, तो यावयास चुकणार नाहीं अशी सर्वांची खात्री होती.

कंपनीचे पारशी डायरेक्टर मुद्दाम मुंबईहून आले होते. ओगॉर्मनच्या हुकुमाप्रमाणें सारे एंजिनिअर्स हजर होते. विलासहि त्यांत होता.

त्याचें सारें लक्ष मात्र समोर दिसणाऱ्या सत्याग्रहयांच्या कँपकडे होतें, आणि त्याची दृष्टि सारखी आशेला शोधीत होती.

अरुणोदयाच्या आधींपासूनच सत्याग्रहयांनीं राष्ट्रगीत म्हणा-वयास प्रारंभ केला होता. आज पाडव्याचा दिवस असूनहि तळ-वली गांवांतील घरांवर क्वचितच गुढी उभारलेली दिसली असती. बहुतेक गांवकरी सत्याग्रहासाठीं दाखल झाले होते, आणि तेथें उभी केलेली उंच राष्ट्रध्वजा हीच आपली गुढी होय अशी त्यांची भावना

होती ! सूर्योदयाचीं पहिलीं मंगल किरणें सृष्टीच्या अंगावरून खेळूं लागतांच सत्याग्रह्यांनीं शिवाजी, टिळक, गांधी इत्यादि राष्ट्रवीरांच्या नांवांचा आपल्या शिबिरांत जयघोष केला, आणि लगेच त्यांच्या रांगा सत्याग्रहाच्या जागेकडे चालून येऊं लागल्या. सर्वांच्या अग्रभागीं राष्ट्रीय झेंडा फडकत होता, आणि झेंडा हातीं धरणाऱ्या एका धिप्पाड तरुणाबरोबर आशा चाललेली होती. शरच्चंद्र तिच्या शेजारींच होता.

तें दृश्य पहातांच विलासच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

ज्या तत्त्वानें आशा व ते सत्याग्रही प्रेरित झाले होते, तें तत्त्व त्याच्या बुद्धीला केवळ मूर्खपणाचें वाटत होतें. पण, त्यांचें धैर्य, उत्साह आणि दिव्य करण्याची उत्सुकता इत्यादि ज्या भावना त्यांच्या मोजक्या पावलांच्या धीरोदात्त गतींत, आणि उच्च स्वरांत प्रतीत होत होत्या, त्यांचा प्रतिध्वनि विलासच्या उमद्या आणि साहसप्रिय अंतःकरणांत उमटल्यावांचून राहिला नाहीं. त्याचें सर्व अंग थरारलें, आणि बसल्या जागेवरून उठून धांवत जाऊन आशेबरोबर तिचा हात धरून पावलें टाकण्याची जबरदस्त इच्छा त्याच्या मनांत उसळली; ती त्यानें मोठ्या प्रयत्नानें आंवरली.

त्याच्या शेजारीं बसलेल्या पारशी डायरेक्टरांपैकीं एक जण समोरच्या सत्याग्रह्याकडे बोट दाखवून दुसऱ्याशीं म्हणाला,

" Look. That's the girl ! The root of all this trouble ! " ( ती पाहिलीत का ती मुलगी ? तिनंच हा सारा प्रसंग आणला ! )

ते दुसरे गृहस्थ म्हणाले,

" Yes. She will soon get her dues. " ( पाहिली. आतां तिला प्रायश्चित्त मिळायला कांहीं अवकाश नाहीं. )

तें संभाषण विलासला असह्य वाटलें.

त्यानें समोर निरखून पाहिलें, तों आशेच्या लावण्यसंपन्न चेहऱ्यावर प्रकाशाच्या तांबूस छटा पसरल्या होत्या. इतर सर्वां-

बरोबर तीहि राष्ट्रगीत म्हणत होती. त्यामुळें ज्या तिच्या मंजुळ स्वरानें एके दिवशीं पहांटे त्यानें पूर्वीं कधीं नाहीं अशी अपूर्व जागृति अनुभविली होती, तो तिचा अनुपमेय स्वर, इतरांना नसेल, पण, त्याला तरी स्पष्ट ऐकूं येत होता. मधूनच तिची शुभ्र दंत-पंक्ति चमकलेली दिसत होती; आणि आज कित्येक दिवस स्वप्नांत अनेक वेळां दिसलेला तिचा काळाभोर विपुल केशभार तिच्या छातीवरून खालीं एखाद्या पुष्ट नागिणीसारखा डौलानें लोंबत होता.

आपल्या जागेवर बसणें विलासला अधिकाधिक कठीण वाटूं लागलें.

थोड्याच अवकाशांत सत्याग्रही ठरलेल्या जागीं येऊन दाखल झाले, आणि त्यांनीं आसनें ठोकलीं. त्यांचें राष्ट्रगीत चालूच होतें !

डायरेक्टर मंडळी आपआपसांत कुजबुजूं लागली.

" ओगॉर्मन कुठं आहे ? "

" अजून कसा आला नाहीं ? "

" तरी मी काल रात्रीं त्याला बजावीत होतों. "

" कालच काम्ब्रोच्या बंगल्यावर फीस्टला जायचं काय अडलं होतं ? "

" पण, सकाळीं बरोबर वेळेवर येनों असं म्हणाला होता. "

" तो आल्यावांचून राहायचा नाहीं. आत्तां येईल. "

" आत्तां येईल काय ? रात्रीं कुठं दारू पिऊन पडला नसला म्हणजे मिळविली !"

" छे छे; तुमचं कांहींतरीच ! "

" पण मी म्हणतों, त्याची वाट पाहिलीच पाहिजे असं काय म्हणून ? "

" थोडी पाहू. "

"पण ते मगरूर तर समोर येऊन बसले ना ?"

"बसेनात !"

"बसेनात काय ? आपण स्वस्थ राहिलों तर ते शेफार-तील. देऊं या हुकूम आपणच त्या पठाणांना सत्याग्रहयांना उचलून फेंकण्याचा."

"आपल्या हातनं तें नाहीं बुवा व्हायचं ! तुम्ही द्या वाटलं तर !"

"ठीक आहे."

असें म्हणून त्या पारशी गृहस्थानें पलीकडच्या टेबला-वर पडलेली शिटी उचलली, आणि फुंकली.

त्याबरोबर—

जो प्रकार तेथें घडला तो पहाणाऱ्याच्या दृष्टीला एखाद्या सशस्त्र युद्धांतील झटापटीपेक्षांहि अधिक करुणाजनक, आणि उद्वेगकारक वाटण्यासारखा होता.

सत्याग्रहयांवर तुटून पडलेले लोक बोलून चालून भाडोत्री पठाण होते. त्यांना नेमून दिलेल्या कामापलीकडे ते कांहीं जाणत नव्हते. मालाचीं पोतीं ओढून फेंकावीं त्याप्रमाणें ते लोक सगळयांना ओढून ओरबडून फेंकून देऊं लागले. त्यांनीं स्त्री पाहिली नाहीं, पोरबाळ पाहिलें नाहीं ! दूर फेंकून दिलेले सत्याग्रही कोणत्यातरी राष्ट्रवीराच्या नांवाचा जयघोष करून पुन्हा आपल्या जागीं येत, पण पठाण लोक त्यांना धरून फरफटत नेऊन पुन्हा फेंकून देत. असा प्रकार दहापंधरा मिनिटें चालला, व सत्याग्रहयांच्या हट्टानें चिडून पठाण लोक हलके हलके मारामारी करूं लागले. त्याबरोबर मघांच्या त्या पारशी गृहस्थानें पुन्हा एकदां शिटी फुंकली. पठाण लोक दूर झाले, मात्र दूर होतां होतां आपल्या हातापायांचा प्रसाद त्यांनीं सत्या-ग्रहयांना दिलाच. पठाण दूर सरकतांच इतका वेळ स्वस्थ राहिलेले

आगीचे बंब सुरू झाले, व सत्याग्रही मंडळींवर कढत पाण्याचा वर्षाव जोराने सुरू झाला. तो असह्य होऊन कांहीं सत्याग्रही दूर पळाले, पण बाकीचे जागच्याजागीं पडून राहिले.

आतां मात्र विलासला स्वस्थ राहवेना. समोर धांव घेण्यासाठीं तो उठला.

तितक्यांत एक मोठा धोंडा हवेंतून सूं-दिशी येऊन शिटी हातांत घेऊन उभ्या राहिलेल्या त्या पारशी गृहस्थाच्या डोक्यांत बसला, व त्यानें मोठ्यानें किंकाळी फोडून धरणीवर अंग टाकलें.

त्या क्षणीं एकच गोंधळ उडाला !

विलास आशेकडे धांवला.

वाटेंत त्याला शरच्चंद्र दिसला.

त्याच्या हातांत दोनतीन मोठाले धोंडे होते.

त्याचे हात धरून विलास म्हणाला,

" शरद्, शरद् ! तुला वेड तर लागलं नाहीं ? फेंक ते दगड दूर ! "

" शरच्चंद्र ऐकेना तेव्हां विलासनें जबरदस्तीनें ते धोंडे झट्दिशी काढून घेऊन फेंकले, व म्हटलें,

" शरद्, पोलिसांनीं तुला असं धरलं तर काय होईल माहीत आहे ?"

विचित्र हास्य करून शरद म्हणाला,

" काय व्हायचं आहे ? मी सगळं सांगणारच आहे ओगॉर्मनची मीं काय व्यवस्था केली तीसुद्धां-"

पण त्याच्या तोंडावर हात ठेवून विलासनें म्हटलें,

" स....! वेड्या ! तुझ्या असल्या करण्यानं तूं आशेवर केवढं संकट आणतो आहेस याची कांहीं कल्पना ?"

एकदम छातीला उजवा पंजा लावून शरच्चंद्र म्हणाला,

" आशेवर ? -"

"हो आशेवर ! आतां इथं एक क्षणभरहि राहूं नकोस थांब. नाहींसा हो. आशेसाठीं...."

शरद्नें धूम ठोकली.

तो कोणीकडे पळाला तें विलासलाहि धड कळलें नाहीं.

सत्याग्रहयांच्या अंगावर पाण्याची वृष्टि चालूच होती.

विलास धांवला, आणि डोळे हातांनीं झांकून बसलेल्या आशेजवळ जाऊन—

तो तिला कांहीं म्हणणार इतक्यांत मूर्छा आल्याप्रमाणें तिनें जमिनीवर अंग टाकलें.

पाण्याच्या वष्टींत विलासहि सांपडला होता; पण त्याचें स्वतःविषयींचें भान फारसें उरलेंच नव्हतें.

त्यानें झट्कन् खालीं वांकून आशेला दोन्ही हातांनीं उचललें.

किती फुलासारखी हलकी होती ती ! या कोमल पुष्पावर....

पण तितक्यात पोलीस आणि मॅजिस्ट्रेट तेथें आले, व त्यांनीं पकडापकडीस प्रारंभ केला.

आशा थोडीशी शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडून विलास-कडे पाहिलें. कांहींतरी अपूर्व दिसल्यासारखी तिची चर्या झाली. तिनें किंचित् हंसून विचारलें,

"तुम्ही आमच्या सत्याग्रहांत सामील झालांत ?"

त्या कल्पनेचा तिला केवढा मनस्वी आनंद होत होता तें विलासला तिच्या दृष्टींत स्पष्ट दिसत होतें. तो तिचा आनंद कमी करण्याचें त्याच्या जिवावर आलें. पण, खोटा शब्द त्याच्या वाचेवाटें निघणें शक्य नव्हतें.

त्यानें फक्त मान हालविली.

तितक्यांत पोलीस त्या जागीं आले व त्यांनीं आशेला पकडून आपल्या ताब्यांत घेतलें.

---

# प्रकरण ११ वें

---

स्वतःविषयीं व जगाविषयीं शांतपणें विचार करावयास तुरुंगासारखी दुसरी सोयीची जागा नाहीं असें जें विधान ऑस्कर वाईल्डच्या एका पुस्तकांत आशेनें पूर्वीं एकदां वाचलें होतें, त्याचा तिला आतां प्रत्यय येऊं लागला होता.

सहा महिन्यांची शिक्षा भोगण्यासाठीं तिची तुरुंगांत रवानगी करण्यांत आली होती, आणि तुरुंगांत दाखल झाल्या दिवसापासून ज्या जगांत ती आजपर्यंत वावरली तें जग तिच्या दृष्टीपुढून एकदम नाहींसें झालें होतें. प्रथम तीनचार दिवस तिला अगदीं भ्रमिष्टासारखें झालें. शीघ्र वेगानें धांवणाऱ्या ज्या काळाबरोबर चाल ठेवण्याची तिला पूर्वीं अडचण पडत असे, तोच काळ आतां एकदम जागच्याजागीं उभा राहिल्यासारखा तिला वाटूं लागला; आणि अत्यंत मंद गतीनें फिरणाऱ्या दिनचक्राचे एकशेंऐंशी फेरे आपल्याला मोजावयाचे आहेत या विचारानें ती भांबावून गेली. तिला माणसांचे चेहेरे क्वचितच दिसत. जे दिसत ते दुःखानें गांजलेले, किंवा सत्तेच्या मदानें उग्र भासणारे असत; व ते न दिसतील तर बरें असें तिला वाटे. तिच्या कानांवर शब्द येत तेहि माणसांचे नसावेत अशी तिला शंका येई. फक्त सूर्योदयाच्या आणि सूर्यास्ताच्या वेळीं बंदिशाळेच्या पलीकडे लगतच असलेल्या रानांत पक्ष्यांचा जो किलबिलाट होई तो तिला ऐकावासा वाटे. कुणाशीं बोलण्याची तर तिला परवानगीहि नव्हती. चेतना नष्ट करणारा वायु हुंगणाऱ्या एखाद्या रोग्याप्रमाणें आपली अवस्था होत आहे असा भास तिला होऊं लागला.

पण चारपांच दिवसांनीं तिला या अवस्थेची संवय झाली, आणि मग दुसऱ्या सर्व व्यवधानांतून मुक्त झालेलें तिचें मन सारखें विचार करूं लागलें. सत्याग्रहाच्या चळवळीसाठीं तिनें जे परिश्रम

केले होते व हाल सोसले होते, आणि जे सोसण्यास तिनें इतरांना प्रवृत्त केलें होतें, त्यांची आठवण तिला पुनःपुन्हा येई; व ती आली म्हणजे आपण येथें तुरुंगांत येऊन पडलों एवढीच का त्यांची फलश्रुति, असें आपल्या मनाला विचारल्यावांचून तिला राहवत नसे. ज्या वेळीं सत्याग्रहाची चळवळ सुरू करण्याच्या व चालू ठेवण्याच्या उद्योगांत ती गढून गेली होती त्या वेळीं त्या चळवळींतून कांहींतरी अत्यंत देशहिताची गोष्ट निष्पन्न होणार असें आपल्या श्रद्धेकरवीं तिनें आपल्या मनाला एकदांच बजावून टाकलें होतें; व याबद्दलची अधिक चिकित्सा न करतां ती प्रत्यक्ष कार्यांत गढून गेली होती. सत्याग्रह करावयाचा आणि तुरुंगांत जावयाचें असें लोकांना सांगतां सांगतां, आणि स्वतःच्या मनाशीं घोकतां घोकतां, तिनें स्वतःला न कळत, तुरुंगांत जाणें येवढेंच जणूं सत्याग्रहाचें ध्येय असल्यासारखें ठरविलें होतें. आपण तुरुंगांत गेलों, व आपल्याबरोबर आणखी शेंकडों माणसें तुरुंगांत गेलीं, कीं आपल्या वडिलार्जित जमिनींचें रक्षण झालेंच पाहिजे असें तिनें मनाशीं ठरविलें होतें. हाल आणि छळ सोसून तुरुंगांत गेलें पाहिजे येवढाच विचार तिनें स्पष्टपणें केला होता. समजा, आपण सगळे तुरुंगांत गेलों तरी पुढें काय?— याबद्दलचे तिचे विचार धुक्यासारखे अस्पष्ट आणि अव्यक्तच होते. पण, आतां तुरुंगांत येऊन दाखल झाल्यावर मात्र या आपल्या तुरुगांत येण्यानें आपल्या जमिनी वांचविण्याचा आपला हेतु कितपत साध्य झाला अगर होईल याचा ती जोरानें विचार करूं लागली. ज्या वाटेनें ती आजपर्यंत चालली होती त्या वाटेवरचा तुरुंग हा एकच मुक्काम तिच्या दृष्टीला आजपर्यंत दिसला होता. त्यापलीकडे तिनें दृष्टि फारशी टाकली नव्हती. पण आतां त्या मुक्कामावर येऊन पोंचल्यावर मात्र 'पुढें काय?' हा प्रश्न ती साहाजिकपणेंच आपल्या मनाला विचारूं लागली; व पुढें रस्ता धडपणें कुठें गेलेला नाहीं असें आढळून येतांच मग ज्या वाटेनें आपण आलों ती वाट तर चुकलेली नव्हती, अशा विचारानें शंकित

होणाऱ्या वाटसराप्रमाणें आशा आपला सत्याग्रहाचा मार्ग पूर्वीं-पेक्षां अधिक चोकस बुद्धीनें पारखून पाहूं लागली.

सत्यासाठीं झगडतांना दुर्बळानें अनत्याचारानें आणि विनयानें बलिष्ठापुढें स्वतःची आहुति दिली तर सत्य साध्य होतें असें ती आजपर्यंत मानीत आली होती. परंतु, बंदिशाळेच्या त्या विचित्र एकान्तांत जेव्हां ती विचार करूं लागली, तेव्हां तिच्या मनांत येऊं लागलें, कीं ज्या हक्कासाठीं आपण सत्याग्रह केला ते हक्क आपण मिळविले काय ? बलिष्ठाच्या जुलुमास आपण भ्यालों नाहीं, आणि आपण बंदिवास पत्करला हें खरें; परंतु, यामुळें बंदिवास पत्करण्याच्या हक्कापलीकडे आपला कोणता हक्क आपण प्रस्थापित केला ? बलिष्ठाचें बल आपण कितीसें कमी केलें ? सत्तेच्या जुलुमाला आपण कितीसा आळा घातला ? गरीब शेतकऱ्यांचा दुःखभार आपण कितीसा कमी केला ? त्यांच्यावर येणारें संकट आपण कितीसें टाळलें ? त्यांच्या संसारांचें आपण रक्षण केलें, कीं उलट त्या संसारांच्या विध्वंस-क्रियेला हातभार लावला ? गरिबांवर अन्याय करूं पहाणाऱ्या पैसेवाल्यांच्या अगर सत्ताधाऱ्यांच्या मनोवृत्तींत आपण कोणता बदल करू शकलों ? आपण सत्याचा आग्रह धरला म्हणजे त्यायोगें आपल्यावर अन्याय करणाऱ्या व्यक्तीच्या चित्तवृत्तींत परिवर्तन घडून येतें असें गांधींच्या लेखनांत तिनें वाचलें होतें, व त्यावर तिनें श्रद्धा ठेवली होती. पण, सत्याग्रहाचा प्रत्यक्ष प्रयोग करून पाहिल्यानतर जेव्हां हें असलें परिवर्तन आपण कितीसें घडवून आणलें याचा ती हिशेब करूं लागली, तेव्हां तिचा पूर्वींचा विश्वास डळमळूं लागला !

कारण, सोराबजी दिनशा कंपनीच्या डायरेक्टरांच्या अगर त्यांना सहाय्य करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या मनांत क्रांति होणें तर दूरच राहिलें, पण सत्याग्रही लोकांच्याबद्दल सामान्य अनुकंपा-देखील उत्पन्न होण्याचें चिन्ह दिसत नव्हतें. सत्याग्रहाच्या पहिल्या दिवसानंतर सत्याग्रही लोकांना अधिकच कठोरपणानें

वागविण्यांत येऊं लागलें; व त्यांची धरपकड तर जारीनें चालू राहिली. सत्याग्रह करून कंपनीच्या मजुरांना अडथळा करण्याची कल्पना केवळ कल्पना म्हणून कितीहि उदात्त असली तरी तिच्यांत व्यवहार्यता फार कमी होती हें दिवसेंदिवस अधिकाधिक स्पष्ट होऊं लागलें. सत्याग्रहयांना जमीन धरून पडलेले पहातांच कंपनीचे लोक हात जोडून स्वस्थ बसणार असते तर गोष्ट निराळी होती. पण त्यांची उचलबांगडी करून तुरुंगाकडे रवानगी करण्याची व्यवस्था झाल्यावर सत्याग्रहाचा अडथळा कंपनीला वाटण्यासारखा नव्हता. सत्याग्रही कांहीं अष्टौप्रहर जागा धरून बसूं शकत नव्हते. पांचपन्नास सत्याग्रही रोज सकाळीं येऊन बसत, व ताबडतोब पकडले जात. आणि मग कंपनीच्या मजुरांचें काम दिवसभर यथास्थित चाले. सत्याग्रहयांच्या आत्म-त्यागापुढें कंपनीचे डायरेक्टर लाजले असते तरच सत्याग्रहाचा परिणाम झाला असता. परंतु, ज्याच्या हातांत सत्ता असते त्याच्या अंतःकरणांत केवळ दुसऱ्याच्या यातना पाहून लज्जा उत्पन्न होण्याचा संभव फार कमी असतो. दुर्बळाच्या आग्रहाचा अडथळा बलिष्ठानें मानला तरच. त्याला प्रत्यक्ष अडथळयाचें स्वरूप येणें शक्य नाहीं. त्यामुळें तळवलीच्या सत्याग्रहाचा परिणाम कंपनीच्या प्रत्यक्ष कामावर कांहींच होऊं शकला नाहीं. सत्याग्रहयांची संख्याहि कांहीं अमर्याद नव्हती. एकंदर पांच-सहाशें सत्याग्रही जमा झाले होते. त्यांपैकीं शेंदीडशें पहिल्या दिवशींच धरले गेले होते, व त्यानंतर रोज पांचपन्नास लोक सत्याग्रह करून तुरुंगाकडे रवाना होत होते. हा क्रम चालला तरी दहाबारा दिवसांत सत्याग्रह संपणार, व पुढें कंपनीच्या कामांत नुसता नांवाचा देखील अडथळा उरणार नाहीं हें उघड दिसत होतें.

या हकीगती वास्तविक बंदिखान्यांत अडकलेल्या आशेला कळावयाच्या नाहींत. पण, एक चमत्कारिक कारण घडल्यानें त्या तिला कळत होत्या.

ज्या दिवशीं ती तुरुंगांत येऊन पडली त्या दिवशीं संध्याकाळीं तिला अपरिचित असलेला एक गृहस्थ तिला भेटण्यासाठीं म्हणून तिच्या कोठडींत आला व तिला म्हणाला,

"तुमच्याविषयीं मला फार सहानुभूति वाटते. तुरुंगाच्या सामान्य शिस्तीप्रमाणं राहण्याचा प्रसंग तुमच्यावर आला तर तुम्हांला अत्यंत कष्ट सोसावे लागतील. कैद्याला लहानसहान सवलती देण्याचा अधिकार इथल्या जेलरला आहे, आणखी त्याची माझी चांगली ओळख आहे. तुमच्यासाठीं कांहीं करण्यासारखं असलं तर मी करीन. मला सांगा."

आशेनें त्या गृहस्थाकडे निरखून पाहिलें. त्यानें नखशिखांत साहेबी पोषाख केला होता, आणि त्याच्या हातांत वेताची छडी होती. तिनें विचारलें,

"तुमचं नांव काय?"

तो गृहस्थ हंसून म्हणाला,

"माझं नांव भार्गवराम. मी कोण तें तुम्हांला सांगत नाहीं. कारण, तुम्हांला मदत करणं वास्तविक माझं काम नाहीं. पण तुमच्याविषयीं मला फार सहानुभूति वाटते. तुमचे इथले हाल माझ्याकडून होतील तितके कमी करावेत असं मला वाटतं; आणि म्हणून मीं मुद्दाम तुमची भेट घेतली. तुमच्यासाठीं मी काय करूं? सांगा."

आशेनें भार्गवरामाकडे पुन्हा एकदां निरखून पाहिलें.

कांहीं माणसांचे चेहरे असे असतात, कीं त्यांवरून सुष्टपणाचा अगर दुष्टपणाचा कसलाच बोध होऊं शकत नाहीं. भार्गवरामाची मुद्रा त्यांपैकींच होती.

म्हणून त्याच्या चर्येकडे अधिक न पहातां आशा म्हणाली,

"माझ्यामागं तिकडं चळवलीला सत्याग्रह कसा काय चालू राहातो हें कळायची मला फार उत्सुकता आहे. रोजचीं मराठी

वर्तमानपत्रं मला मिळतील अशी तुम्हीं व्यवस्था केली तर मी तुमची फार आभारी होईन."

"हें तर काय सहज करतां येईल. आणखी कांहीं ?"

आपल्या वडिलांचा समाचार कळण्याची व्यवस्था करतां आली तर पहा असें म्हणावें, असें आशेच्या मनांत आलें. परंतु लगेच तिला वाटलें, नको. म्हणून ती म्हणाली,

"आणखी कांहीं नाहीं."

भार्गवरामानें विचारलें,

"मग मी जाऊं तर ?"

"हं. मी आपले पुन्हा आभार मानतें."

"छे छे; आभार कशाला ?" असें म्हणून भार्गवराम निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं आशेच्या हातीं जीं वर्तमानपत्रें आलीं त्यांत पन्नास नवे सत्याग्रही पकडले गेल्याची, व त्यांना शिक्षा झाल्याची बातमी तिला वाचावयास मिळाली, आणि सत्याग्रहाच्या विफलतेबद्दल तिच्या मनांत उत्पन्न झालेल्या विचारांना जोराची चालना मिळाली.

रोज वर्तमानपत्रें उघडतांना तिच्या मनांत शरच्चंद्राचा विचार येत असे, आणि त्याला शिक्षा झाल्याचें वर्तमान वाचण्याची ती आपल्या मनाची तयारी करी. पण, चारपांच दिवस झाले तरी जेव्हां शरच्चंद्राची कांहीं बातमी तिला वाचावयास मिळाली नाहीं तेव्हां त्या गोष्टीचा तिला मनस्वी विस्मय वाटूं लागला. आणि अखेर एके दिवशीं वर्तमानपत्रांत छापलेली एक विचित्र बातमी वाचल्यापासून तिला शरच्चंद्राच्या हालचालीबद्दल एक नवीनच शंका येऊन कांहींसें भय वाटूं लागलें.

ती बातमी आशेला जशी वाचावयास मिळाली तशीच्या तशी खालीं देत आहों.

## सत्याग्रहाच्या नाटकांतील एक हास्यरसप्रधान प्रवेश !

### कंपनीच्या एका डायरेक्टराचा मारुतीच्या देवळांतील बंदिवास ! फरारी ड्रायव्हर ! विलक्षण गूढ !

" आमच्या वित्तंबातमीदारानें कंपनीच्या लोणावळा येथील कँपवर घडलेल्या एका विलक्षण प्रकाराची बातमी काढली असून तिनें आमच्या वाचकाचें विलक्षण मनोरंजन होईल अशी आमची खात्री आहे. असें कळतें कीं, पाडव्याच्या दिवशीं सत्याग्रही लोकांचें पारिपत्य करण्याचें काम वास्तविक कंपनीच्या डायरेक्टर मंडळींनी ओगॉर्मन नांवाच्या डायरेक्टरकडे सोंपविलें होतें. परंतु, सदर ओगॉर्मन हे पाडव्याच्या दिवशी सत्याग्रहाच्या ऐन वेळेस हजर नव्हते. ते कां हजर राहिले नाहींत याचें कंपनीच्या इतर डायरेक्टर मंडळींस त्या वेळीं मोठें गूढ वाटलें; व त्या चमत्काराचा उलगडा अखेर त्या दिवशीं संध्याकाळीं ओगॉर्मन स्वतःच कंपनीच्या कँपवर दाखल झाले त्या वेळीं झाला. हा प्रकार कंपनीच्या डायरेक्टर मंडळींनीं आपल्याकडून होतां होईल तों गुप्त ठेवला असून त्याबद्दलचा तपास गुप्त पोलीसखात्याकडे सोंपविण्यांत आला आहे. आमच्या बातमीदारानें मोठ्या कौशल्यानें या गोष्टीचा सुगावा काढून जी माहिती मिळविली आहे तिच्या आधारानें पुढील हकीकत आम्ही आमच्या वाचकांस सादर करीत आहोंत.

" असें दिसतें, कीं पाडव्याच्या आधल्या रात्रीं ओगॉर्मनसाहेब कार्ल्याच्या बंगल्यांत मेजवानीसाठीं गेले होते. त्या बंगल्यांत सरकारी पी. डब्ल्यू. डी. खात्यांतील एका वरिष्ठ अंमलदाराचा मुक्काम होता. त्यांचा व ओगॉर्मनचा विशेष स्नेह असल्यामुळें त्यांच्याकडे जेवावयास ओगॉर्मन वरचेवर जात असत. त्याप्रमाणेंच

ते त्या रात्रीहि गेले. जातांना त्यांनीं मनाशीं बेत केला होता कीं रात्रीं खाना आटोपल्यावर परत लोणावळ्याच्या कँपवर यावयाचें, आणि मग सकाळीं लवकर उठून सत्याग्रहाच्या जागीं ठरलेल्या घटकेस हजर रहावयाचें. परंतु माणूस ठरवितो आणि देव घडवितो या इंग्रजी म्हणीचा त्यांना प्रत्यय आला. त्यांना परत लोणावळ्यास तर येतां आलें नाहींच, पण उलट अर्धी रात्र एका पडक्या मारुतीच्या देवळांत बंदिवासांत काढावी लागली.

" काल्र्यांच्या बंगल्यावरील खाना आटोपून ओगॉर्मन सुमारें अकरा वाजतां परत निघाला असें त्यांनीच कँपवर आल्यावर जी हकीगत सांगितली तिच्यावरून दिसतें. निघतांना त्यानें आपल्या ड्रायव्हरला सांगितलें, कीं गाडी जरा वेगानें जाऊं दे, कारण, कँपवर लवकर पोंचलें पाहिजे. त्याच्या ड्रायव्हरनें 'ठीक आहे' असें म्हणून गाडी पस्तीस-चाळीस मैलांच्या वेगानें सोडली. पण पंधरावीस मिनिटांनीं गाडीचा वेग एकदम मंद झाला, आणि लगेच गाडी एकदम पुरती थांबली. ड्रायव्हरनें एंजिनचें झांकण उघडून पाहिलें, तेथें कांहींतरी दुरुस्त केल्यासारखी खटपट केली, मग दहापांच वेळां हँडल मारून पाहिलें, पण गाडी कांहीं केल्या चालू होईना. अखेर तो म्हणाला, ' साहेब, गाडींतलं पेट्रोल संपलं आहे. ' ओगॉर्मननें त्याला एक शिवी दिली. त्याबरोबर तो म्हणाला, ' साहेब मी पठाण आहें ! शिवी ऐकायची मला संवय नाहीं ! '

" आतां काय करावें याचा ओगॉर्मनला मोठा प्रश्न पडला. रस्त्यानें जाणारी एखादी मोटार भेटेल, व थोडेंसें पेट्रोल मागून घेतां येईल अशा आशेनें ओगॉर्मन गाडींतच बसून राहिला; परंतु, बराच वेळ झाला तरी एकहि मोटार त्या वाटेनें गेली नाहीं. शेवटीं रस्त्यापासून आंत दोनतीन मैलांवर एका खेड्यांतील मिणमिण दिवे दिसत होते, तिकडे जाऊन निदान एखादी बैलगाडी काढतां आली तर पहावी असें ड्रायव्हरनें सुचविलें. तो विचार ओगॉर्मनला पसंत पडून त्यानें ड्रायव्हरला खेड्यांत

जावयास सांगितलें. त्याप्रमाणें ड्रायव्हर गेला. पण परत येऊन तो म्हणूं लागला, 'साहेब, खेड्यांतले लोक माझं ऐकत नाहींत. तुम्ही स्वत: आलांत तर तुमच्या धाकानं ते गाडी जोडतील.'

"ओगॉमंनचा नाइलाज झाला होता. तेव्हां तो म्हणाला, 'ठीक आहे, मी येतों; चल.' त्याच्या ड्रायव्हरनें निघण्यापूर्वी मोठारच्या पाठीमागें बांधलेला मोठा दोर सोडण्यास सुरवात केली, व ओगॉमंननें त्याबद्दल विचारतां तो हंसून म्हणाला, 'साहेब, वेळवकत आहे. दोर बरोबर घेतलेला बरा!' ओगॉमंननें मनाशीं ठरविलें, कीं तो आचरट आहे; व तो अधिक बोलला नाहीं. त्याला बरोबर घेऊन तो खेड्याची वाट अंधारांतून चालू लागला.

"सुमारें एक मैल चालल्यावर त्यांना एक लहानसा नाला लागला; व तो ओलांडून गेल्यावर एक पक्कें मारुतीचें देऊळ दिसलें. देवळांत एक पणती जळत होती, पण देवळांत अगर आसपास माणसाची चाहूलसुद्धां नव्हती. तेथें पोंचल्याबरोबर ड्रायव्हर ओगॉमंनला म्हणाला, 'साहेब, इथं आंत या देवळांत चला.' ओगॉमंन म्हणाला, 'तुला वेड लागलं कीं काय? इथं या देवळांत का आपल्याला कुणी गाडी देणार आहे?' त्यावर ड्रायव्हर म्हणाला, 'पण तुम्हांला देवळांत आलंच पाहिजे!' असें म्हणून त्यानें एकदम चलाखीनें बरोबर आणलेल्या दोराचा असा कांहीं जबरदस्त विळखा ओगॉमंनच्या अंगाभोंवतीं टाकला, कीं ओगॉमंन येवढा धिप्पाड आणि धटिंगण पुरुष, पण त्याचें त्यापुढें कांहींएक चालेना! तशाहि स्थितींत त्याने ड्रायव्हरशीं पुष्कळ झटापट केली. पण त्या पठाणानें त्याचे हातपाय हां हां म्हणतां पक्केच जखडून टाकले, व त्याच्या तोंडांत बोळा कोंबून त्याचें तोंडहि एका फडक्यानें बांधून टाकलें.

"मग त्यानें ओगॉमंनला ओढीत ओढीत देवळांत नेलें, व तेथें प्रदक्षिणेच्या वाटेवरच्या एका दगडी खांबाला बांधून टाकलें!

ओगॉर्मनच्या खिशांतील सारे पैसे व कागद त्यानें हिसकून घेतले, आपल्या खिशांतील एक मोठा चाकू काढून त्यानें ओगॉर्मनचा कोट व विजार दहा ठिकाणीं फाडली, व शेवटीं जातांना तो म्हणाला, 'साहेब, सलाम! मोटारींतलं पेट्रोल संपल्याची मीं तुम्हांला थाप दिली. मोटार स्वतः चालवून पाह्यची बुद्धि तुम्हाला पोटभर खाना झाल्यावर व्हायची नाहीं हा माझा हिशेब खरा ठरला. मोटारींत पेट्रोल भरपूर आहे. मी जातों आतां मुंबईला. सलाम!'

"हा ड्रायव्हर ओगॉर्मनकडे नवीनच राहिला होता. त्याच्या नेहमींच्या ड्रायव्हरला लग्नाला जावयाचें होतें म्हणून त्यानें हा ड्रायव्हर बदली दिला होता.

"ओगॉर्मन त्या पडक्या देवळांत अडकून पडला तो दुसऱ्या दिवशीं जवळजवळ दुपारपर्यंत तसाच पडला होता. तें देऊळ अगदींच बाजूला होतें असें दिसतें. दुपारीं काहीं मुलें खेळावयास म्हणून तेथें आलीं, त्यांच्या दृष्टीस ओगॉर्मन प्रथम पडला; व त्यांनीं ती बातमी गांवांत जाऊन सांगितल्यावर लोकांनीं येऊन त्याची सुटका केली.

"लोणावळ्याच्या कँपवर येऊन दाखल व्हावयास ओगॉर्मनला जवळजवळ संध्याकाळ झाली, व तो आला त्या वेळी त्याचे कपडेलत्ते व एकंदर अवतार पहाण्यासारखा होता.

"वरवर पहाणारास हा प्रकार मुंबईच्या पठाणाच्या मवालीपणापैकीं एक असावा असें वाटण्यासारखें आहे. पण ओगॉर्मनची आणि कंपनीच्या अधिकाऱ्यांची अशी अटकळ आहे, कीं सत्याग्रही लोकांपैकींच कोणीतरी या विचित्र प्रकाराच्या मुळाशीं असलें पाहिजे. निदान तसें सिद्ध झालें तर त्यांना हवें आहे असें दिसतें.

"पाहूं पुढें काय होतें तें. आज घटकेला या विलक्षण हकीगतीनें खूप खळबळ उडण्यासारखी आहे येवढें खरें."

ही हकीगत वाचीत असतां आशेच्या कल्पनाचक्षूंपुढें शरच्चंद्र सारखा दिसत होता. जो मजकूर तिनें वाचला त्यांत शरच्चंद्राचें नांव कोठेंहि नसतांना देखील तें नांव तेथें दिसल्याचा तिला वरचेवर भास झाला. शरच्चंद्राची वृत्ति तिला पूर्णपणें माहीत होती, व त्याच्या अंगचें धाडस तिला ठाऊक होतें. त्याच्या मनांत आलें तर याहूनहि विलक्षण व्यूह रचण्याइतका तो बुद्धिमान् आणि साहसी होता, व त्याचा क्रोध अनावर होता. त्याच्या क्रोधाला आणि साहसाला तिनेंच आजपर्यंत आंवरून धरलें होतें. केवळ तिच्यासाठीं तो सत्याग्रहाच्या मार्गानें जाऊन पहावयास तयार झाला होता. सत्याग्रहावर त्याची स्वतःची श्रद्धा नव्हती; पण तिची श्रद्धा ओळखून तिला मदत करावयास तो तयार झाला होता. त्यानें सत्याग्रहाची शपथ घ्यावी म्हणून जेव्हां जेव्हां तिनें आग्रह केला होता, तेव्हां तेव्हां तो म्हणाला होता, " माझ्या अंतःकरणाला जें पटत नाहीं त्याची शपथ घ्यायचा आग्रह तूं मला कां करतेस ? मी शपथ घेणार नाहीं. येवढं मात्र सांगतों, कीं तुझ्या सत्याग्रहाच्या चळवळीला कलंक लागेल अशा तऱ्हेचं कोणतंहि कृत्य मी माझ्या हातून घडूं देणार नाहीं. "

हे त्याचे शब्द आशेला पुनःपुन्हा आठवले, आणि जो वृत्तान्त तिनें वर्तमानपत्रांत वाचला त्याच्याशीं शरच्चंद्राचा संबंध नसावा अशी स्वतःच्या मनाची समजूत घालण्याचा तिनें पुनःपुन्हा प्रयत्न केला.

पण ती समजूत पडणें सोपें नव्हतें. कारण, शरच्चंद्र सत्याग्रह करून पकडला गेला अशी बातमी वृत्तपत्रांत तिला वाचावयास मिळेना.

अशा द्विधा मनस्थितींत ती असतांना एके दिवशीं भार्गवराम तिच्या भेटीस आला. त्यानें विचारलें,

" तुमचं ठीक आहे ना ? मीं करण्यासारखं तुमचं एखादं काम आहे का ? "

याला शरच्चंद्राबद्दल विचारावें कीं नाहीं असा मनाशीं विचार करीत आशा स्तब्ध राहिली. त्यानें विचारलें,

" तुम्हांला सध्यां इथं कोणतं काम देण्यांत आलं आहे ?"

" घोंगड्या विणायसाठीं लागणारी लोंकर कातून वळायचं काम मी करतें."

" छे छे ! हें काम एखाद्या राकट बाईला सांगितलं तर हरकत नाहीं. पण, नाजूक माणसाला का हें काम सांगायचं ? आजच्या आज जेलरला सांगून तुम्हांला दुसरं काम मिळेल अशी मी व्यवस्था करतों."

" नको नको. असेना का हें काम !"

" असेना काय ? हे पहा तुमचे तळहात कसे सोलून निघाले आहेत ?"

असें म्हणून त्यानें झट्कन् तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले व हास्य केलें.

त्याचें तें करणें, आणि विशेषत: हंसणें आशेला अतिशय चमत्कारिक वाटले, व तिनें आपले हात झट्कन् सोडवून घेतले.

त्या प्रक्षुब्ध मनस्थितींत भार्गवरामाकडून शरच्चंद्राची माहिती मिळविण्याचा तिचा विचार पार नाहींसा झाला.

नंतर भार्गवराम तिच्याशीं काय बोलला तें तिनें धड ऐकलेंहि नाहीं. तो निघून गेला तेव्हां तिला बरें वाटलें.

कोठडीच्या दाराशीं म्हातारी वॉर्डर बाई उभी असलेली तिला दिसली. तिला तिनें विचारलें,

" हे गृहस्थ कोण आहेत हो ?"

ती म्हातारी म्हणाली,

" बाई, काय सागू तुम्हांला ! ते सी. आय. डी.मधले एक हपीसर आहेत. ते तुम्हाला भेटायला इथं येतात हें चिन्ह मला ठीक दिसत नाहीं."

" म्हणजे ? समजलें नाहीं मी."

" बाई, तुमच्या त्या सत्याग्रहांत मला काहीं कळत नाहीं.

पण तुमच्यासारख्या खूपसुरत बायकांनीं इथं तुरुंगांत येऊं नये असं मला वाटतं."

"तुरुंग काय आम्हांला खातो का आहे ?"

"खाईल तर एकपरीं बरं ! मागं एक पंजाबी बाई मुंबईच्या जेलमधें गेली. तिच्यावर या भार्गवरामाची दृष्टि पडली; अखेर तिनं जीभ हसडून प्राण दिला असं ऐकतें."

ते शब्द ऐकतांच आशेच्या सर्वांगावर भीतीचे रोमांच उठले.

सत्याग्रह करण्यानें तुरुंगांत जावें लागल्यास कोणकोणता छळ सोसावा लागेल त्याची तिनें पूर्वींच कल्पना करून मनाची तयारी करून ठेवली होती. पण, या असल्या संकटाची तिच्या मनांत कधींच कल्पना आली नव्हती. त्यामुळें त्या संकटाची शंका येतांच तिच्या हृदयांत एकदम धस्स झालें !

तो तुरुंग तिला अधिकच भयानक दिसूं लागला.

---

# प्रकरण १२ वें

---

अखेर एके दिवशीं जी बातमी केव्हांतरी लवकरच आपल्याला वाचावी लागणार अशी भीति आशेला वाटत होती, पण जी कधींच वाचावी लागली नाहीं तर किती बरें होईल, असा विचार ती मनाशीं वेडेपणानें किती वेळां तरी करीत होती; ती तिला वाचावी लागलीच.

सत्याग्रह्यांची अखेरची तुकडी पकडली जाऊन बंदिखान्याकडे रवाना झाली, आणि कंपनीच्या धरणाच्या कामाला कोणताहि अडथळा उरला नाहीं.

वर्तमानपत्रांत मोठाले मथळे छापले गेले होते, 'सत्याग्रह आटपला!'

मथळ्याचीं तीं जाडजाड अक्षरें आशेच्या दृष्टीला लालबुंद खदिरांगारासारखीं भासलीं!

आत्यंतिक श्रद्धेनें जें कार्य तिनें अंगावर घेतलें त्याचा असा शेवट झाला तर!

सत्यासाठीं झगडून, आणि इतरांस झगडावयास लावून तिनें अखेर काय मिळविलें?

ती स्वतः बंदिवासी झाली! तिच्याखेरीज आणखी शेंकडों लोक तुरुंगांत जाऊन पडले! कित्येक संसारांच्या घड्या कांहीं कालापुरत्या तरी कमीअधिक विसकटल्या! चळवळीसाठीं गोळा केलेला पैसा खर्च झाला! सत्याग्रह्यांनीं शारीरिक हाल सोसले! त्यांची चिंता वहाणाऱ्या हजारों जीवांच्या हृदयाला घरें पडलीं!

इतकेंहि करून सत्य सिद्ध झालें असतें तर कांहीं हरकत नव्हती. सत्य इतकें मोलाचें असेलहि कदाचित्.

पण सत्य प्रस्थापित झालें काय?

अशा विचारांनीं व्यथित होऊन आशेनें हातांतील वर्तमान-पत्रें दूर भिरकावून दिलीं.

चमत्कारिकच खरें, पण तिला त्या वर्तमानपत्रांचा अतिशय राग आला.

वृत्तपत्रांच्या ठिकाणीं अंतःकरण मुळींच नसतें असें तिला वाटलें. तिची चळवळ यशस्वी झाली असती तर 'सत्याग्रहाचा अपूर्व विजय!' अशासारखे मोठाले मथळे वृत्तपत्रांत खचित छापले गेले असते. आज 'सत्याग्रह आटपला' अशी गर्जना तीं वृत्तपत्रें करीत होतीं. जणुं कसलाच हर्ष-विषाद न ठेवतां मिळेल त्या बातमीचा ओरडा करण्याखेरीज वृत्तपत्रांना दुसरें कांहीं कर्तव्यच नव्हतें. ज्या शरिरांत हृदयाचा मागमूसहि नसून फक्त विक्राळ मुखामध्यें सहस्र जिव्हा लवलवत आहेत अशा शरिरांच्या आकृति आशेला त्या वर्तमानपत्रांच्या ठिकाणीं दिसूं लागल्या!

तिनें डोळे गच्च मिटले, आणि डावा हात आपल्या वक्षस्थलावर ठेवून हृदयांत उचंबळणारे कष्टप्रद विचार ती आंवरूं लागली.

कोणीसें तिला म्हटलें,

"बाई, तुमचं हें पत्र दिलं आहे जेलरसाहेबांनीं."

आशेनें डोळे उघडून वर पाहिलें, आणि एखाद्या यंत्रानें हालविल्याप्रमाणें हात पुढें करून म्हाताऱ्या वॉर्डरबाईकडून पत्र घेतलें.

तें पत्र तिच्या वडिलांचें होतें. त्यांतील ठिकठिकाणचा कांहीं भाग जेलरनें खोडून टाकलेला होता.

आशा वाचूं लागली—

"माझी प्रकृति ठीक आहे. तूं उगीच मनाला काळजी लावून घेऊं नकोस. तूं माझ्याजवळ नाहींस, यामुळें मी दुःख करीत असेन असेंहि मनांत आणूं नकोस. दौलती माझी व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवीत आहे.

"पाडव्याच्या दिवशीं सकाळीं तूं आणखी शरद् माझ्या पायां पडून गेलांत त्यानंतर जशी तूं मला दिसली नाहींस तसाच शरद्हि मला दिसला नाहीं. तो कोठें आहे मला कांहींच कळत नाहीं."

यापुढचीं पत्रांतील पांचसहा वाक्यें खोडलीं गेलीं होतीं. मजकुरावरून ओढल्या गेलेल्या मागमोडी रेघांमधून फक्त कांहीं अक्षरांचे वरचे खालचे फांटे दिसत होते. आशेनें त्या खोडल्या गेलेल्या मजकुराचा अदमास करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परतु, त्यांत शरद्संबंधींच कांहींतरी लिहिलें असावें यापलीकडे तिच्या मनाला कसलाच बोध झाला नाहीं.

ती पुढें वाचूं लागली,

"तूं सुटून यावयास पुष्कळच अवधि आहे खरा; परंतु, तूं सुटल्यानंतर तुझी माझी भेट होईल याबद्दल मला यत्किंचित्हि शंका नाहीं, आणि तूंहि मनाशीं शंका ठेवूं नकोस. तूं येईपर्यंत मी खचित चांगला बरा होईन. मुंबईच्या तुझ्या डेअरीची बातमी मला वरचेवर कळतेच. त्याबद्दल तुला चिंता करण्याचें कांहींएक कारण नाहीं.

"आपल्या इथें थोडे दिवस राहिलेले विलास तुला आठवतात ना? त्यांचें एक लहानसें पत्र मला आलें होतें. कांहीं मदत लागली तर कळवा, असें त्यांनीं मला लिहिलें होतें, आणि माझ्याकडून तुला जाणाऱ्या प्रत्येक पत्रांत त्यांचे नमस्कार मी तुला कळवावेत अशी इच्छा प्रदर्शित केली होती. काल दौलतीला माझें औषध आणण्यासाटीं लोणावळ्यास पाठविला होता, तेव्हां त्यांचा समाचार घेऊन ये, असें मीं त्याला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो त्यांच्या बंगल्यावर गेला होता. परंतु, तेथें त्याला कळलें, कीं विलास मुंबईस गेले आहेत. ते परत यावयाचे नाहींत. त्यांनीं नोकरी सोडली. कंपनीच्या लोकांची फार इच्छा होती, कीं–"

पण पुढचा चारपांच ओळींचा मजकूर पुन्हा खोडला गेला होता.

खोडाखोड करणाऱ्या त्या नागमोडी ओळींची आशेला विलक्षण चीड आली. तिनें कितीदां तरी त्या ओळीच्या फटींतून दिसणाऱ्या अक्षरांच्या अवशेषांवरून दृष्टि फिरविली. पण, चिकाच्या पड्याआड बसलेल्या माणसांची चाहूल लागली तरी चेहरेपट्टी दिसत नाहीं, तशीच त्या मजकुराची अवस्था झालेली होती.

नाइलाजानें आशा पुढें वाचूं लागली,

" उकाडा वाढतो आहे. पाऊस केव्हां पडेल याबद्दलचीं दरवर्षींची ठराविक बोलणी यंदा क्वचितच होत आहेत. कारण यंदा जमिनीच हातीं नाहींत तेव्हां नांगरणी आणखी पेरणी कसली करायची ? आणखी या गोष्टी नाहीत तर पाऊसपाण्याचा विचार तरी कशाला करायचा ? जमिनीचीं मोठमोठी ढिखळें उकरून दुतर्फा फेंकणारा नांगर ओढायला सरावलेले बैल यंदा ज्याच्या त्याच्या गोठ्यांत रवंथ करीत स्वस्थ उभे राहतील. इलाज नाही. आपले बैल असेच उभे आहेत ! ढवळी गाय आतां आठदहा दिवसांत विईल. तिला काय होतें तें मी तुला कळवीन. तूं गेल्यावर दोन दिवस तापीनें धार दिली नाहीं. पण आतां ती समजून चुकली मला वाटतं. ती धार देऊं लागली आहे. आपला पोपट रोज पहांटे 'आशा ऊठ, आशा ऊठ !' अशा हांका मारतो. त्या वेळीं क्षणभर तूं इथेंच आहेस असा भास होऊन मला बरें वाटतें."

तें पत्र वाचून आशेला एकदम अनावर हुंदका आला. त्या पत्रांत तिच्या वडिलांनीं जें लिहिलें होतें त्यापेक्षांहि जें न लिहिण्याची खबरदारी घेतली होती, तें सारें तिच्या मनांत एकदम आलें, आणि मग ती एकदम भावनाविवश झाली. आपलें तें लहानसें घर, गोठ्यांतील जनावरें, घरापुढचें लहानसें अंगण, तेथील मोठमोठ्या वृक्षांनीं वरून टाकलेल्या पानांचा पाचोळा,

आणि वाऱ्याबरोबर हालणाऱ्या वृक्षपल्लवांच्या अंगणाच्या जमिनीवर सरकणाऱ्या चित्रविचित्र छाया, हें सर्व दृश्य तिच्या डोळ्यांपुढें एकदम उभें राहिलें; आणि आपल्या हृदयांत एकदम सारी जागा रिकामी झाल्यासारखें तिला वाटलें.

वास्तविक ताटातुटीच्या या दुःखाची तिनें कितीतरी दिवस सतत विवेक करून मनाची तयारी केली होती. पण, मानवी दुःख म्हणजे एक विचित्र गोष्ट आहे. तें सोसण्याची आगाऊ कितीहि तयारी केली तरी ते प्रत्यक्ष येऊन ठेपलें, कीं जें व्हावयाचें तें होतेंच. विवेकाचे कितीहि थर माणसानें आपल्या हृदयावर रचून ठेवले तरी दुःखाचा प्रत्यक्ष आघात होताच तो हृदयापर्यंत जाऊन पोंचल्यावांचून राहात नाहीं !

त्या दिवशीं एकीकडे लोंकर कांतीत असतां नाना तऱ्हेच्या विचारांचे धागे आशा आपल्या मनाशीं काढीत होती.

संध्याकाळीं भार्गवराम तिच्याकडे आला.

त्यानें विचारलें,

"काय ? तुमचं ठीक चाललंय् ?"

त्याच्याकडे न पहातां आशा म्हणाली,

"हं, ठीक आहे."

"तुमचं काम बदललं जावं अशी मीं व्यवस्था केली होती."

"पण ती नको होती मला. जें काम तुरुंगाच्या शिस्तीप्रमाणं मिळेल तें करायला मी समर्थ आहें."

"तुमचा हा हट्ट तुम्हांला शोभत नाहीं."

"तुम्हांला तरी माझ्याकडे वारंवार येणं शोभतं का ?"

"शोभायचं काय त्यांत ? तुम्हांला इथं अगदींच कंटाळवाणं होत असेल, कुणाशीं चार शब्द बोलायला मिळाले तर तुम्हांला बरं वाटेल अशा समजुतीनं मी येतों. तुम्ही माझं ऐकाल तर इथं तुरुंगांत सुद्धां तुमचा काळ सुखाचा जाईल अशी व्यवस्था मला करतां येईल."

" माझ्या सुखाच्या कल्पना तुम्हीं कशा ओळखल्या ? "

" त्यांत काय अवघड आहे ? तुम्ही आपल्या प्रेमांतल्या माणसांना सोडून इथं अगदी एकट्या येऊन पडलां आहांत हें मला समजत का नाहीं ? "

" एकूण माझ्याविषयीं सहानुभूति दाखवायला तुम्ही येत असतां तर ? पण ती सहानुभूति मला नको असेल तर ? "

" नको म्हटलीत तरी मी ती दाखवणारच. मला राहवत नाहीं त्याला काय करायचं ? "

" त्याला उपाय आहे. "

" तो काय ? "

" मी जेलरकडे तक्रार करून तुमचं येणं बंद करवीन. "

" हा तुमचा भ्रम आहे. "

" असेल. पण आत्तां तरी तुम्ही इथून चालते व्हाल का ? "

" हो, जातों कीं. मला कांहीं घाई नाहीं. तुम्ही इथं सहा महिने राहाणार आहांत; पुष्कळ वेळ आहे मला ! "

असें म्हणून भार्गवराम निघून गेला. परंतु, त्याला पहा-तांच आशेच्या हृदयांत सुरू झालेली धडधड निघून गेली नाहीं.

तिनें समोर पाहिलें तों तिन्हीसांजा संपून रात्रीचा अंधार हलके हलके जिकडेतिकडे पसरत चालला होता. तुरुंगाच्या आवा-रांत वावरतांना तुरळक दिसणाऱ्या व्यक्ति छायेसारख्या भासत होत्या, आणि पलीकडे तुरुंगाच्या तटाची उंच भिंत काळी गडद होऊं लागली होती. त्यापलीकडे कोठेंतरी फार जुना विस्तारलेला वटवृक्ष होता. त्याच्या फांद्यांवर गर्दी करून लटकणाऱ्या वट-वाघुळांच्या पंखांची सारखी फडफड चालू होती.

रात्रीं आशा मनाशीं जोरानें विचार करूं लागली, कीं आपल्या शीलावर येऊं पहाणारें संकट खरोखरीच आलें तर त्याचें निवारण कसें करावयाचें ?

जेलरकडे तक्रार करून कांहींच उपयोग होण्या-सारखा नव्हता. कारण, जेलवरचे अधिकारी आपले दोस्त आहेत असें जें भार्गवरामानें सांगितलें तेंच खरें असण्याचा संभव होता. तसें नसतें तर भार्गवराम आपल्याकडे वेळीं अवेळीं येऊं शकला नसता. जेलरवर जे वरिष्ठ अधिकारी असतील त्यांच्या-कडे तक्रार करावयाची झाली तर ती करावयाची कशी? त्यांच्यापर्यंत ती पोंचावयाची कशी? जेलर म्हणजे तुरुंगावरचा कर्तुमकर्तुम् समर्थ असा सुलतानच म्हणावयाचा! त्याच्या अन्यायाचें गाऱ्हाणें वर पोंचावयाचें दूरच राहून, तें गाऱ्हाणें केल्याबद्दल छळाची तीव्रता मात्र वाढावयाची! तुरुंगाचा कायदा मोडल्या-बद्दल कैद्यांना वाटेल तो दंड करण्याचा अधिकार जेलरला होता. या अधिकाराच्या जोरावर कैद्यांना फटक्यांची अमानुष शिक्षा झाल्याचेहि आशेनें ऐकले होतें.

हे विचार पुनःपुन्हा करून आशेच्या मनाला अत्यंत शीण झाला. संकट तेवढें स्पष्ट दिसत असलें आणि त्याच्या प्रतिकाराचा कोणताहि उपाय सुचत नसला म्हणजे मनुष्याचें मन अत्यंत व्याकुल होतें. ती व्याकुलता सहन न होऊन आशा जमिनीवर पडल्यापडल्या रडू लागली........

पण मग एकदम तिच्या मनांत विचार आला, आपलें संरक्षण करण्याचा एक मार्ग आहे....

आपण कोठूनतरी एखादें शस्त्र मिळविलें तर?....

शस्त्राची कल्पना मनांत येतांच आशा एकदम दचकली!....

"अनत्याचारी सत्याग्रहाची तूं प्रतिज्ञा केली आहेस ना?" तिच्या मनानें विचारलें.

पण तिच्या हृदयांत खोल कोठेंतरी असलेलें दुसरें मन म्हणालें,

"पण ज्या शीलावर संकट आलं आहे तें इतकं मोलाचं आहे, कीं त्याचं रक्षण करतांना हा मार्ग चांगला कीं तो मार्ग चांगला अशा विचाराला अवकाशच उरत नाहीं. ज्या दुष्टाचा

प्रतिकार करावयाचा, तो सर्व प्रकारें बलिष्ठ आहे. मी सर्व प्रकारें दुर्बळ आहें. अशा परिस्थितींत माझ्या सत्याग्रहाचा काय उपयोग होणार? तें कांहीं नाहीं; वाटेल त्या उपायानें मला शस्त्र मिळवून ठेवलंच पाहिजे ... ...

तिचें तिसरें मन म्हणालें,

"हें जर तुला कळतं तर देशाला स्वतंत्र करण्याच्या बाबतींत मात्र सत्याग्रहाखेरीज दुसरे सगळे मार्ग तुला अधर्म्य कां वाटतात? जसं तुझं शील अत्यंत मोलाचं आहे तसंच देशाचं स्वातंत्र्यहि नाहीं काय? शीलावर संकट आलं म्हणजे स्त्रीनं सत्याग्रहाचा वेडेपणा करण्यांत कांही अर्थ नाहीं हें जसं खरं, त्याचप्रमाणं आपल्या जन्मसिद्ध हक्कांवर संकट आलेलं असतांना केवळ सत्याग्रहाच्या मार्गानं आपलं आत्मरक्षण होईल अशी श्रद्धा लोकांनीं ठेवली तर तेंहि व्यर्थंच नाही काय? दुष्टाच्या ठिकाणीं विवेकबुद्धि थोडीतरी उरली असेल तर ती पूर्ण जागृत करण्याचं काम सत्याग्रह करील. पण, ज्या ठिकाणी अशा विवेकबुद्धीचा मागमूसहि उरलेला नाहीं, जिथं दुष्टांची सत्ता अमर्याद आहे, दलिताला कोणीहि सहाय्यकर्ता नाहीं......."

या विचारांनीं आशा विलक्षण भांबावून गेली.

आजपर्यंतच्या तिच्या निष्ठेला धक्का देणारे ते विचार तिला सहन होईनात.

ते दूर लोटण्याचा निकराचा प्रयत्न करतांकरतांच केव्हांतरी तिचा डोळा लागला.

पण तिला गाढ झोंप लागली नाहीं. तिला चित्रविचित्र स्वप्नें पडत होतीं.

स्वप्नांत ती तुरुंगांतून सुटली; कसल्यातरी शोधासाठीं ती सैरावैरा धांवली; हजारों अक्राळविक्राळ कृष्ण छाया तिच्याभोंवतीं जमा झाल्या; तिनें प्रहार केले त्याबरोबर त्या दूर झाल्या; हजारों लोकांनीं राष्ट्रगीत म्हटलेलें तिला ऐकू आलें; तिला

कोणींतरी पकडलें व पुन्हा न्यायासनापुढें उभें केलें; पण आरोपीचा पिंजरा तिनें लत्ताप्रहारांनीं छिन्नविच्छिन्न करून टाकला आणि ती मोठमोठ्यानें हंसत एका विस्तीर्ण राजरस्त्यानें गेली! धांवतां धांवतां तिचा पाय कशाला तरी अडखळला. तिनें पाहिलें तों भार्गवराम तेथें बेशुद्ध होऊन पडला होता. ती पुढें तशीच धांवत जाणार तों समोर तळवलीचें पूर्ण झालेलें अजस्त्र धरण तिच्या दृष्टीस पडलें! ती मट्कन खालीं बसली. कोठून तरी कढत पाण्याचा मोठा झोत तिच्या अंगावर पडूं लागला. ती क्षणभर बेशुद्ध झाली; व शुद्धीवर आली तों एका उंच सड-पातळ देखण्या पुरुषाच्या हातांत ती होती! तिनें त्याला विचारलें, "तुम्ही आमच्या सत्याग्रहांत सामील झालांत?" त्यानें मान हालविली, पण तिचा अर्थ तिला कळला नाहीं.....

तिनें एकदम आपले डोळे अगदीं ताणून उघडले. अरुणो-दयाचा अस्पष्ट प्रकाश तुरुंगाच्या आवारांत शिरूं लागला होता.

दुपारीं म्हातारी वॉर्डरबाई आली तेव्हां आशा तिला म्हणाली,

"तुमच्याकडं पाहिलं कीं मला फार बरं वाटतं. रख-रखीत तापलेल्या रानांत थंड सावलीची एखादी जागा दिसली म्हणजे वाटावं तसं तुम्ही जवळ आलांत म्हणजे मला वाटतं. माझ्यावर कांही संकट आलं तर तुम्ही मला खचित सहाय्य कराल असं मनांत येतं...."

म्हातारी नम्रपणानें म्हणाली,

"बाई, मी यःकश्चित् बाईमाणूस. मी कुणाला काय सहाय्य करणार? या तुरुंगातली ही नोकरी करता करता माझी अर्धी उमर गेली. इथं बेरडांतले बेरड येतात, चुकून गुन्ह्यांत सांपडलेले सावहि येतात. निढावलेले म्हातारे, फसलेले तरुण, निरक्षर खेडवळ, शिकलेसवरलेले लबाड– हजार प्रकारचीं माणसं येतात, अन् जातात. या आवारांत दिसणारी जगाची रहाटी पाहून पाहून

मनाला वाटायला लागतं– सुखदु:खं माणसाच्या वांटयाला कां यावीत आणि किती यावींत त्याला कांऽऽहीं नियम नाहीं. अन् शिवाय ज्याला जें सुखदु:ख मिळायचं दैवानं ठरलं असेल त्यांत अणुभर अतर पडणार नाहीं. एकाचं सुखदु:ख दुसरा कमीजास्त करूं म्हणेल तर तें बोलणं उगीच. कोऽऽणीं कोणाचं सुखदु:ख बदलूं शकत नाहीं. मी य:कश्चित् बाईमनुष्य; तुम्हांला कसलं सहाय्य करणार? अन् बाई, तुमच्यावर संकट तरी कोणतं येणार आहे?"

आशेनें विचारलें,

"तुम्हींच नाहीं का मला त्या संकटाची सूचना दिलीत? काल भार्गवराम पुन्हा इथं आला होता, तुम्हीं पाहिला नाहींत का?"

"तें संकट म्हणतां होय? तें आहे खरं. डोळे मिटून तें नाहीं म्हणण्यांत कांही अर्थ नाहीं. पण बाई, तुमच्या-कडं पाहिलं, कीं येवढं खास वाटतं, कीं तें संकट भोंवतालीं घोंटाळतांना जरी दिसलं तरी त्याचा प्रत्यक्ष विटाळ तुम्हांला कधीं व्हायचा नाहीं. देव काय निजला आहे का?"

तिच्या तोंडचा देव हा शब्द ऐकतांच आशेची दृष्टि तिच्या गळ्यांतल्या तुळशीच्या माळेकडे गेली. तुरुंगांत दाखल झाल्यावर अगदीं प्रथम तिनें या म्हातारीला पाहिलें तेव्हांच तिच्या गळ्यां-तली ती माळ तिच्या लक्षांत आली होती. संतसेवेची शपथ दर्श-विणारी ती माळ गळ्यांत घालून तुरुंगांतली नोकरी करणाऱ्या त्या वृद्ध स्त्रीचा तिला चमत्कार वाटला होता.

आशेचा परमेश्वरावर विश्वास नव्हता, पण त्या म्हातारीची श्रद्धा दुखविण्याचीहि तिची इच्छा नव्हती. तिनें स्वत: नव्हती का आजपर्यंत सत्याग्रहाच्या मार्गावर वेडी – हो वेडी नव्हे तर काय– श्रद्धा ठेवली? म्हणून ती म्हणाली,

"देव निजला नाहीं. पण, माणसानंहि जागं राहिलंच पाहिजे, नाहीं का ?"

"हो. तेंहि खरंच."

"मग कृपा करून मला एक मदत करा तर. तुम्हीं मदत केली तरच मला जागं राहतां येईल."

"म्हणजे, कसं म्हणतां ?"

"मला कोठूनतरी एक चांगली सुरी आणून द्या."

तिच्या तोंडचा 'सुरी' हा शब्द ऐकतांच म्हातारी दचकली.

तिनें तिच्याकडे अगदीं टवकारून पाहिलें, व मग घाबऱ्या घाबऱ्या आजूबाजूस पाहिलें.

दूर ज्या ठिकाणीं सक्तमजुरीचे कैदी चक्की पिशीत होते, त्या ठिकाणीं जेलर उभा असलेला तिला पाठमोरा दिसला.

ती गोष्ट तिनें डोळ्याच्या खुणेनें आशेला सांगितली, व ती तिच्यापुढून झट्कन् दूर झाली.

---

# प्रकरण १३ वें

---

संध्याकाळीं बरोबर सहाच्या ठोक्याला नित्यक्रमाप्रमाणें दादासाहेबांची गाडी बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन थडकली.

ड्रायव्हरनें झट्कन् खालीं उतरून गाडीचें मागच्या बाजूचें दार उघडलें. त्यांच्या आगमनासाठी नित्याप्रमाणें पोर्चमध्यें तयार राहिलेला शिपाई गाडीजवळ गेला, त्याला गाडींतून उतरतां उतरतां दादासाहेबांनी रोज ठरल्याप्रमाणें म्हटलें,

" बॅग वर नेऊन माझ्या टेबलावर ठेव हं. "

हें जरी त्यांचें रोजचें ठरलेलें सांगणें होतें, तरी शिपायानें तें नुसतेंच न ऐकतां, ' होय, ठेवतों साहेब ' असें स्पष्ट म्हटलें पाहिजे अशी त्यांची अपेक्षा असे, हें शिपायाला माहीत झालें होतें. म्हणून तो आजहि म्हणाला,

" होय, ठेवतों साहेब. "

आणि नित्यक्रमाप्रमाणें त्यानें गाडीतून बॅग काढली, दादासाहेबांची हॅट व काठी घेतली, आणि त्या सगळ्या जिनसा वर जाऊन झट्कन् ठेवून परत येऊन तोंपर्यंत दिवाणखान्यालगतच्या खोलींतल्या ठराविक खुर्चीत अधिष्ठित झालेल्या दादासाहेबांच्या पायांतील बूट व पायमोजे काढण्यास सुरवात केली.

त्यांचें तें काम होईपर्यंत सुदेष्णाबाई तेथें आल्या, व त्यांच्यामागून आलेल्या आचाऱ्यानें फराळाच्या ठराविक जिनसा, चहा, आणि फळें टेबलावर मांडलीं.

चहा पितां पितां दादासाहेबांनीं सुदेष्णाबाईंस विचारलें,

" विलास कुठं आहे ? "

किंचित् खिन्नपणें सुदेष्णाबाई म्हणाल्या,

" वर आहे आपल्या खोलींत. "

" बाहेर नाहीं गेला ? "

" आतांशी तो जातो कधीं बाहेर फारसा ? "

" खेळायला बिळायला मुळींच जात नाहीं ? किंवा कुठं हिंडायलाहि जात नाहीं ? "

त्यांच्या त्या स्वरांत नापसंती स्पष्ट होती.

वास्तविक लोणावळ्याहून परत आल्यापासून विलासची पूर्वीची दिनचर्या अजीबात पालटलेली पाहून सुदेष्णाबाईंना स्वतः-लाहि आश्चर्य वाटत होतें. पण, तेंच आश्चर्य पतीनें व्यक्त केलेलें त्यांना आवडलें नाही. त्या म्हणाल्या,

" पूर्वी तो सारखा खेळत अन् हिंडत असे तेंहि पसंत नव्हतं; आतां तो सारखा घरीं असतो तर तेंहि पसंत नाहीं का ?'

बोलण्याचा रोख बदलला पाहिजे हें ओळखून दादासाहेबांनीं म्हटलें,

" नाहीं, तसं नाहीं. पण, सारखं घरांत राहून हा करीत असतो तरी काय ?"

" मीहि त्याला विचारलं नाहीं. पण मला वाटतं, सारखा वाचीत असतो. केव्हांहि खोलींत गेलं तर त्याच्या हातांत पुस्तक दिसतं. "

" आतांशा रोज सकाळीं सगळीं मराठी वर्तमानपत्रं गिर-गांवांत जाऊन आणायची कामगिरी आपल्या ड्रायव्हरकडे आहे, हें मला कळलं आहे. "

" लोणावळ्याहून परत आला तो पूर्वीचा विलास नव्हे असं मला पुनःपुन्हा वाटतं. तिथं काय झालं कांहीं कळत नाहीं. "

दादासाहेबांनीं आपल्या जाकिटाचीं दोन्ही टोंकें पोटावर ओढीत, व जणुं आपण आतां जें बोलणार तें आपल्या पत्नीस

रुचेल किंवा नाहीं अशी शंका घेत, पण काय व्हावयाचें असेल तें होवो, बोलावेंच, असें मनाशीं म्हणत विचारलें,

" तुम्हांला इतके दिवस एक गोष्ट सांगितली नाहीं; सांगूं का ?"

" काय ती ? "

दादासाहेब थोडेसे खाकरले, व म्हणाले,

" लोणावळ्याची नोकरी सोडून विलास परत आला तेव्हां त्यानं आपल्याला काय सांगितलं, तुम्हाला आठवतं ? "

" हो. माझ्याच्यानं ती नोकरी होणार नाहीं म्हणून मी निघून आलों, असं तो म्हणाला. "

" त्या म्हणण्याचा अर्थ तुम्ही काय समजलांत ?"

" दुसरा काय समजायचा ? उन्हातान्हांत वणवण करायची नोकरी त्याच्या प्रकृतीला मानवली नसेल. तो आला तेव्हां त्याचं तोंड सुकलेलं दिसतंच होतं. "

" हो, मीहि असंच समजत होतों आजपर्यंत. पण, आज ऑफिसांतल्या चहाच्या वेळेस सोराबजी दिनशा कंपनीचे मुख्य डायरेक्टर माझ्याकडे आले होते, त्यांनीं निराळीच गोष्ट सांगितली !"

" हो, विलासविरुद्ध कांहीतरी रचून ते सांगणारच !"

पुन्हा युद्धाचा संभव टाळणें आवश्यक आहे हें दादासाहेबांनीं ओळखलें. ते म्हणाले,

" छे हो, त्यांत विरुद्ध किंवा बाजूचं असं कांहींच नाहीं. "

त्याबरोबर बदललेल्या स्वरानें सुदेष्णाबाईंनीं विचारलें,

" काय सांगत होते ते ? "

" त्यांच्या सांगण्यावरनं असं दिसतं, कीं विलास कंपनीच्या सगळ्या अधिकाऱ्यांना नाहीं नाहीं तीं दुरुत्तरं करून तडकाफडकीं कँप सोडून इकडं निघून आला. "

"उगीचच्या उगीच तो कोणाला बोलला असेल, हें मला खरं वाटत नाहीं."

"कंपनीच्या कामाविरुद्ध सत्याग्रह झाला त्याची थोडीशी हकीगत तुम्हांला वर्तमानपत्रावरून कळली आहे ना? सत्याग्रही लोकांचा अडथळा दूर करण्याकरिता कंपनीनं वाटतं कांहीं उपाय योजले. त्याविषयी विलासनं अधिकाऱ्यांच्याजवळ तीव्र नापसंती व्यक्त केली. अधिकारी साहाजिकच त्याला म्हणाले की, त्यानं नोकरीकडं लक्ष द्यावं, असल्या गोष्टीत लक्ष घालू नये. तें ऐकतांच या क्षणापासून तुमची नोकरी सोडली, असं उत्तर देऊन विलासनं त्यांना एक लांबलचक व्याख्यान दिलं; त्यांना निर्दय, राक्षस, माजलेले श्रीमंत, गरिबांचे कर्दनकाळ वगैरे शब्दांचा आहेर केला. आणि झालेल्या नोकरीचा पगार घेऊन जा, असं ते सांगत असतांहि मोटारीत आपलं सामान चढवून तो कँप सोडून इकडे निघून आला. मला तरी काय, ही गोष्ट आजपर्यंत कळली नाही तशीच पुढंहि कळली नसती. आज ते मुख्य डायरेक्टर सहजासहजी भेटले म्हणून हें सारं कळलं."

तितक्यांत दादासाहेबांना आठवण झाली म्हणून त्यांनीं जाकिटाच्या खिशांतील घड्याळ काढून पाहिलें. त्या खोलींत त्या वेळीं बसून घालविण्याचा त्यांचा रोजचा ठरलेला वेळ भरत आला होता असें त्यांना आढळलें. म्हणून ते उठतां उठतां म्हणाले,

"नाहीं, असं झालं म्हणून कांहीं विशेष झालं असं नाहीं. चालायचंच असं. लोणावळ्याची ही गोष्ट आपल्याला कळली असं तुम्ही दाखवूं नका हं विलासला."

"नाहीं बाई. मी कशाला बोलूं त्याच्याजवळ?"

असें सुदेष्णाबाई म्हणाल्या, तेवढ्यांत दादासाहेब दिवाण-खान्यांत जाऊन पोंचलेहि.

ते वर आपल्या खोलीकडे गेले, आणि सुदेष्णाबाई समोरच्या बगीच्याकडे पहात दरवाजांत उभ्या राहिल्या.

तो देखावा म्हणजे त्यांचा जिव्हाळयाचा मित्र होता.

त्यानें त्यांना विचारलें,

"तूं आपल्या पुत्राविषयीं मनाशीं जो खेद करतेस तो वास्तविक वेडेपणाचा नाहीं काय ?"

त्या प्रश्नाला 'नाहीं' असें म्हणून त्यांना कांहीं कारणेंहि देतां येईनात, किंवा 'होय' असें म्हणून कबुलीहि देतां येईना.

म्हणून समोरच्या कारंजाकडे आणि पलीकडच्या उंच वृक्षाकडे शून्य दृष्टीनें पाहात त्या तशाच किती वेळ तरी उभ्या राहिल्या.

शेवटीं कोणाचीशी चाहूल लागली म्हणून त्यांनीं वळून पाहिलें-

तों विलासच आपल्यापुढें उभा आहे असें त्यांना दिसलें.

त्याच्याकडे पहात त्यांनीं विचारलें,

"बाहेर का निघालास ?"

"हो, जरा समुद्रावर जाऊन येतों. आज दिवसभर भयंकरच उकाडा झाला, नाहीं का ? आंघोळ केल्यावर जरा बरं वाटेल."

"पण आतां तिन्हीसांजा झाल्या. या वेळेस....?"

"या वेळेसच बरं एक प्रकारें. कुणी फारसं भेटत नाहीं. कुणीं भेटलं कीं नकोसं वाटतं मला आताशा."

हें म्हणतांना त्यानें खरोखरीच कंटाळल्यासारखी मुद्रा केली होती. त्याच्या त्या मुद्रेचा सुदेष्णाबाईंना खेद वाटला. पण, आपण त्याबद्दल स्पष्ट विचारलें तर तो मन मोकळें करून सांगेल अशी त्यांना खात्री नव्हती. म्हणून त्यांनीं विचारलें,

"लवकर येशील ना ?"

"हो, बहुतेक येईन. पण माझी वाट पाहूं नकोस. मला भूकहि फारशी नाहीं."

"आतांशा तुझी भूक कशी नाहींशी झाली ?" असें विचारावेंसें सुदेष्णाबाईंच्या मनांत आलें; पण त्यांच्या तोंडून ते शब्द निघाले नाहींत.

ड्रायव्हरनें विलासची गाडी पोर्चमध्यें आणून उभी केली व 'तूं नको येऊंस माझ्याबरोबर, मी एकटाच जाईन.' असें ड्राय-व्हरला सांगून विलास जाऊं लागला तेव्हां त्यांनीं म्हटलें,

"विलास—"

थबकून मागें वळून पाहून विलासनें विचारलें,

"काय आई?"

"सुनेत्राकडे गेला होतास काय?"

"आठ दिवसांपूर्वीं एकदां गेलों होतों, त्याच्यावर नाहीं गेलों."

"मला वाटतं, तूं वरचेवर तिच्याकडे गेलास तर बरं. लोकांनीं वारंवार समाचार घेतला म्हणजे आजारी माणसाला बरं वाटतं."

"अशी काय ती मोठी आजारी आहे? तिच्या डॉक्टरांना मीं विचारलं तेव्हां ते म्हणाले, 'तिला कांही होत नाहीं!'"

"कांहीं होत नाही कसं? जेवत नाहीं, खात नाहीं, अंथ-रुणावरून उठवत नाहीं."

"पण एखाद्यानं उगीचच्या उगीचच स्वत:ला आजारी करून घेतलं तर त्याला लोकांनीं काय करायचं?"

असें म्हणून विलास पायऱ्या उतरून खालीं गेला आणि मोटारींत बसला.

त्याची मोटार फर्रदिशीं आवाज करून निघून गेली, आणि तिच्या मागच्या नळींतून सुटलेला भपकारा हवेंत कांहीं वेळ तरंगत राहिला.

सुदेष्णाबाईंच्या मनांत आलें, याला दुसऱ्याच्या मनाची कांहींच कशी क्षिति वाटत नाहीं!

पण, विलासच्या अंत:करणांत त्यांना त्या वेळी डोकावतां आलें असतें तर त्यांनीं तसें खचित म्हटलें नसतें.

कारण, गाडी रस्त्यानें जोरानें सोडून विलास मनाशीं म्हणत होता,

“ माझ्या बोलण्यानं मीं आईला दुखवलं कीं काय कुणास ठाऊक ? पण, सुनेत्राचा विषय ती पुनःपुन्हा न काढील तर मला कशाला असं बोलावं लागेल ? ही सुनेत्रा मुलगी म्हणजे एक मोठा कूट प्रश्न होऊन बसणार आहे. तिच्याशीं कसं वागावं मला कळत नाही. ती माझ्यावर अगदीं मनापासून प्रेम करते; पण तें प्रेम मला कांही केल्या हवंसं वाटत नाहीं त्याला मी काय करणार ? तिला काय दुखणं झालं आहे, आणखी काय औषध हवं आहे, तें मला समजत का नाहीं ? पण, तिच्याविषयीं माझ्या हृदयांत प्रणयाची भावना यत्किंचितहि उद्भवत नाहीं, त्याला मी तरी काय करूं ? ती स्वतःला जें दुःख करून घेते आहे तें पाहिलं कीं तिची कीव येते. पण, कितीहि समजूत घातली तरी माण-सानं ऐकायचं नाही म्हणजे काय ?... प्रेम ही किती चमत्का-रिक गोष्ट आहे ?....नको तिथं तें कां उद्भवतं कुणास ठाऊक ? साफल्याची यत्किंचितहि आशा दिसत नसतांना .... आशा ! मी तरी आशेवर काय म्हणून प्रेम करावं ? ”

मग तो आशेबद्दलच विचार करूं लागला.

तिच्या कितीतरी हालचाली, दृष्टिक्षेप, आणि शब्द त्याला अजूनहि स्पष्ट आठवत होते. त्यांची त्यानें आजपर्यंत अगणित वेळां मनाशी उजळणी केली होती; व प्रत्येक वेळीं त्यानें स्वतःला बजावलें होतें, कीं हें आपलें मनांतील प्रेम सदा अव्यक्तच राहिलें पाहिजे. शरच्चंद्र आणि आशा परस्परांवर अनुरक्त आहेत हें विसरण्याचें पाप आपल्या हातून कधीहि घडतां कामा नये.

या इशाऱ्याविरुद्ध त्याच्या मनानें कधीं तक्रारहि केली नव्हती. ज्या प्रणयभावनेचा अनुभव त्याला आशेच्या भेटीनें आयुष्यांत प्रथमच आला होता, त्या भावनेचें सुख, ती अव्यक्त राहिली तरीहि कांहीं कमी नाहीं असें त्याचें मन त्याला सांगत

होतें; आणि ज्या प्रेमाला प्रतिप्रेमाची आशा नाहीं तें वेड्या सारखें कशाला जतन करावयाचें असें कोणीं कितीहि शिकविलें असतें तरी त्याच्या मनानें ऐकलें नसतें. कारण, आशेनें आपल्या जीवितांत मोठी क्रांति करून टाकली, हें तो पूर्णपणें ओळखून होता.

आशेच्या असामान्य सौंदर्यानें आपण मोहित झालों हें नाकबूल करण्याची त्याची मुळीच इच्छा नव्हती. पण तिच्या-वरची आपल्या मनाची आसक्ति केवळ सौंदर्यामुळेंच उत्पन्न झालेली नाहीं असें त्याला पक्कें वाटत होतें. स्त्रीसौंदर्याचा उप-भोग त्यानें कमी का घेतला होता? इंग्लंडहून परत येतांना तो पॅरिसमध्यें महिनाभर राहिला होता, त्या वेळीं सुझान नांवाच्या ज्या मुलीशीं त्याचा सहवास घडला होता, तिचें लावण्य त्यानें तिच्यासाठीं जे पैसे उधळले त्याहूनसुद्धां कितीतरी मोलाचें होतें. पण, त्याच्या सामानांत पडलेला तिचा फोटो त्याने पुन्हा कधीं बाहेर काढून पाहिलाहि नव्हता. किंबहुना त्याची व आशेची गांठ पडेपर्यंत केवळ घटकाभर उपभोगाचा एक विषय यापली-कडे स्त्रीच्या लावण्यसंपन्न देहाची त्यानें कधी कदरच केली नव्हती. पण आशा भेटतांच हें सारें बदललें होतें!

आणि या बदलांत आतां कधी बदल होईल, असें विलासला वाटत नव्हतें.

सत्याग्रहाच्या पहिल्या दिवशीं शुद्धीवर येणाऱ्या आशेला पोलिसांच्या स्वाधीन करतांना राजकीय सत्तेच्या जुलमी स्वरूपा-बद्दल आणि श्रीमंतांच्या दयाशून्यतेबद्दल त्याच्या मनांत जी चीड उत्पन्न झाली, ती आतां त्याच्या अंतःकरणांत सतत रहाणार होती! आशेनें पत्करलेला सत्याग्रहाचा मार्ग त्या वेळी त्याला वेडेपणाचा वाटला होता, आजहि वाटत होता. पण, तो मार्ग सोडला तर दुसऱ्या कोणत्या मार्गानें राजकीय आणि श्रीमंती सत्तेशीं झगडतां येईल याचा नीट विचार केला पाहिजे, असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें होतें.

'मला त्यांच्याशी बोलायला मिळालं तर मी त्यांचं मन वळवीन' ह्या आशेच्या तोंडून एकदोन वेळां निघालेला उद्गार त्याला पुन:पुन्हा आठवत होता; व निश्चित चैनी खेळाडूच्या ज्या वेषांत आपण आशेला दिसलों त्या वेषांत ती सुटून आल्यावर आपण तिच्या दृष्टीस पडतां कामा नये असें त्याला वाटूं लागलें होतें. तिचा सत्याग्रह जरी चुकीचा होता तरी स्वातंत्र्यासाठीं आणि समतेसाठीं आवश्यक असलेल्या झगड्याचें प्रतीक म्हणून तिचें कृत्य फार कौतुकास्पद होतें. ती तुरुंगांतून सुटून आली, कीं हें कौतुक आपण तिच्याजवळ बोलून दाखवूं; सत्याग्रहापेक्षां निराळ्या मार्गानें जावयाचें तिनें ठरविलें तर आपणहि तिच्या पावलाबरोबर पाऊल टाकूं; व तशीं पावलें टाकण्याइतका विचाराचा कांहीं अधिकार तुम्हीं अंगी आणला आहे का, असें तिनें विचारलें तर अभिमानानें 'होय' म्हणण्याइतकी स्वत:ची तयारी करूं; असें मनाशीं म्हणतच तो नोकरी सोडून मुंबईस आला होता.

सत्याग्रहाचा जो देखावा त्याच्या दृष्टीस पडला होता त्यांतील एक गोष्ट त्याच्या मनाला अतिशय लागली होती. ती म्हणजे, कंपनीच्या लोकांनीं योजलेल्या उपायांचा राक्षसीपणा. तो पुन:-पुन्हा मनाशीं विचार करून पाहात होता, या लोकांनीं हे असले भयंकर उपाय काय म्हणून योजले बरें? या प्रश्नाला त्याचें मन एकच उत्तर देई– काय म्हणून म्हणजे? त्यांची लहर लागली म्हणून! त्यांना जाब विचारणारा कोणी नाहीं म्हणून! ज्या गरीब शेतकऱ्यांचें पारिपत्य करावयाचें ते सर्वस्वीं हतबल आहेत अशी त्यांची खात्री होती म्हणून!.... आजपर्यंत जगांत हेंच झालें, आणि पुढें हेंच होणार!....

तें टाळायचें असेल तर दुर्बलतेचा आणि शरणागतीचा मार्ग गरिबांस शिकविणारी विचारसरणी नाहींशी करून त्यांना सबल आणि सशक्त होण्याचे मार्ग दाखविले पाहिजेत!....

असे कांहीं मार्ग असतील काय ?

विलासला स्वत:ला त्याविषयीं कल्पना होईना म्हणून त्यानें शक्य तितकें वाचन करावयाचें ठरविलें. त्यानें पूर्वी कधीं नव्हे इतकें पुस्तकांत लक्ष घातलें. आणि गंमत अशी, कीं त्या पुस्तकांच्या वाचनांत त्याला विलक्षण गोडीहि वाटूं लागली. तीं तो वाचूं लागला, कीं आशेला पोलिसांच्या स्वाधीन करतांना ज्या असंतोषाचा आणि त्वेषाचा त्याला अनुभव आला, त्याच असंतोषाच्या सहस्रपट मोठा स्रोत स्रवणाऱ्या बुद्धिमान् लोकांचे शद्व आपण ऐकत आहोंत असें त्याला वाटे; व त्या शब्दांतील वक्तृत्वानें मोहित होऊन ते सारखे ऐकत रहावे असा मोह त्याला होई. पूर्वी टेनिसची मॅच खेळतांना त्याला कालाचा आणि परिस्थितीचा विसर पडे, तसाच विसर त्या पुस्तकांच्या सहवासांत त्याला पडूं लागला. पूर्वीचीं ओळखीचीं माणसें भेटूं नयेत असें त्याला वाटूं लागलें.

'लोणावळ्याहून परत आला तो पूर्वीचा विलास नव्हे' असें जें त्याची आई म्हणाली तें पुष्कळांशी खरें होतें.

आज कितीतरी दिवसांनीं तो आपल्या मोटारीत बसून निघाला होता.

त्यानें समुद्रस्नानांत कांहीं फारसा वेळ घालविला नाहीं. मात्र, पाण्यांत तरंगत असतांना त्याच्या मनांत एल्सीचा विचार पुन:पुन्हा येत होता, व लोणावळ्यास जाण्यापूर्वी तिच्याबरोबर केलेल्या जलक्रीडेची, आणि घरी परत न जातां खोलींतच रहाण्याचा आग्रह करतांना तिनें जे दृष्टिक्षेप केले होते त्यांची आठवण त्याला होत होती. त्या आठवणीनें त्याला सुखदु:ख मात्र कांहीं झालें नाहीं. फक्त आपल्या स्वत:च्याच का पूर्वीच्या आयुष्यांतील ते प्रसंग, असा विस्मय त्याला वाटला, व आतां पुन्हा एल्सी भेटली तर आपण तिच्याशीं कसे वागूं याचीं त्यानें कल्पनाचित्रें काढली.

पण, तीं कल्पनाचित्रेंहि त्याच्या मनांत फार वेळ टिकलीं नाहींत. पाण्यांतून बाहेर निघून अंग पुसून व कपडे बदलून तो परत निघाला तेव्हां त्याच्या मनांत आशेबद्दलचे विचार पुन्हा सुरू झाले.

गाडी खूप वेगांत चालू लागतांच त्याच्या नेहमीच्या संवयी-प्रमाणें सिगारेट बाहेर काढण्यासाठीं त्याचा हात खिशांत गेला.

तेथें सिगारेट हाताला लागेना तेव्हां त्याच्या लक्षांत आलें, कीं मघांशी जातेवेळींच आपण अखेरची सिगारेट ओढून पाकीट फेंकून दिलें होतें.

त्यानें ताबडतोब क्वीन्स रोड सोडून फोर्टच्या भागाकडे जावयासाठीं गाडी वळविली. एका कोंपऱ्यावर एक अगदीं लहानसें इराण्याचें दुकान होतें. एरवीं कोणीं पांच रुपये बक्षीस दिले असते तरी विलास त्या दुकानांत शिरला नसता. पण, सिगारेटची त्याला विलक्षण तल्लफ आली होती, व ती भागविण्यास यत्किंचितहि उशीर होऊं द्यावयास तो तयार नव्हता. त्याच्या मनांत 'Any port in a storm' ही इंग्रजी म्हण आली, व तो मनाशींच हंसला.

दुकानांत शिरून त्यानें उंच स्टुलावर बसलेल्या दुकानदारापुढें पैसे फेंकले आणि म्हटलें,

"एक सिगरेट डबा लाव."

उघडया छातीवरचा घाम पुशीत दुकानदार म्हणाला,

"डब्बा नहीं सेठ; पाकीट लो."

'Any port in a storm!' विलासच्या मनांत पुन्हा आलें, व त्यानें पाकीट घेतलें.

तो टेबलावरची मोड गोळा करीत होता, तितक्यांत त्याच्या मागच्या बाजूनें एक आणेली फेंकून कोणींसें म्हटलें,

"एक कप चहाका पैसा लेव."

ती आणेली विलास गोळा करीत असलेल्या पैशांत पडली म्हणून त्याने मागें वळून पाहिले.

आपल्या दृष्टीवर विश्वास नसल्यासारख्या स्वरानें तो उद्गारला,

" कोण, शरद् ? हॅलो. "

आणि असें म्हणून त्यानें त्याचा हात अत्यंत उत्सुकतेनें पकडला.

शरद्नें विचारलें,

" तूं मुबईंत कसा आहेस ? आदितवाराच्या रजेंत आला आहेस काय ? "

" नाहीं. मी कंपनीची नोकरी सोडली. "

शरद्नें विस्मयानें म्हटलें,

" खरं म्हणतोस ? कां सोडलीस ? "

" उगीच. मला तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे. "

" मलासुद्धां. पण आधीं हें सांग, आशा खुशाल आहे ना ?'

त्याच्या त्या प्रश्नांत प्रियकराच्या हृदयाची आर्तता विलासला स्पष्टपणें ऐकूं आली. तो म्हणाला,

" चल, मी तुला सगळं सांगतों. माझी गाडी बाहेर उभी आहे. "

ते दोघे हातांत हात घालून निघाले तेव्हां दुकानदार ओरडून म्हणाला,

" सेठ, तुमारा बाकी पैसा ! तुम् इधर भुल गया ! "

विलास मोठ्यानें हंसला आणि त्यानें परत येऊन पैसे गोळा केले.

---

# प्रकरण १४ वें

---

गाडींत बसल्यावर विलास शरद्‌ला म्हणाला,

"आमच्या घरीं जाऊं, जेवण करूं, आणखी मग खूप बोलत बसूं तुझी कांहीं हरकत नाहीं ना ?"

"हरकत कसली ? उलट, फार दिवसांनीं तुझ्या घरीं मला जेवायला मिळणार हे पाहून मला आनंदच होतो"

"खरंच, कितीतरी दिवस झाले रे तूं आमच्याकडे आला होतास त्याला ? मला वाटतं, तूं आणखी मी मिळून हिंदु जिमखान्याच्या टेनिस टूर्नमेंटमधें अखेरची मॅच जिंकली त्या दिवशीं रात्रीं आपण आमच्या घरीं एकत्र जेवलों, नाही ?"

"हो, म्हणजे तीनचार वर्षं झालीं त्या गोष्टीला ! किती झट्‌कन् गेले रे दिवस ?"

"दिवसांचं असंच आहे. त्यांची आठवण केली, कीं ते झट्‌कन् गेल्यासारखेच वाटतात."

हें म्हणतां म्हणतां विलासनें गाडीला अतिशय वेग दिला त्याच्या व शरद्‌च्या तोंडांतील सिगरेटच्या टोंकांतून तंबाखूच्या जळत्या ठिणग्या भराभर निघून वाऱ्याबरोबर उडून गेल्या, त्या थव्यांतून उठून पळणाऱ्या लाल काजव्यांप्रमाणें भासल्या.

शरद्‌नें म्हटलें,

"किती भयंकर वेगानं गाडी हांकतोस रे !"

"त्याशिवाय मला बरंच वाटत नाहीं."

"अशानंच तुझ्या हातून अपघात होतात."

"मुळींच नाहीं. आजपर्यंत फक्त एकदांच माझ्या हातून अपघात झाला आहे."

"परवांचा तळवलीजवळचा ना ?"

"हो ! अन् त्या अपघातानं माझ्या शरिराला फारशी इजा न होतां माझ्या मनावरच विलक्षण आघात झाले."

"आशेचा सहवास घडून म्हणतोस ?"

"हो."

"ती एक असामान्य मुलगी आहे !"

"यांत काय संशय ? शरद्, तू जरी माझ्याशी कधीं स्पष्ट बोलला नाहींस तरी तुझं तिच्यावर प्रेम आहे हें मीं ओळखलं आहे. तुझं भाग्य पाहून मला खरोखर फार आनंद होतो."

अशा प्रकारें त्या दोघांच्याहि हृदयाला प्रिय असणाऱ्या विषयाबद्दल त्या दोघांचें बोलणें सुरू झाले, व विलासच्या घरीं त्यांचें जेवण संपलें तरी त्यांच्या बोलण्यांतला तो विषय संपला नव्हता. मध्येंच दुसरा एखादा विषय थोडा वेळ निघे; परंतु, एखाद्या स्प्रिंगचा कांटा ओढून खालीं केला तरी पुन्हा पूर्ववत् आपल्या स्थळीं जावा त्याप्रमाणें त्यांचें बोलणें पुनःपुन्हा आशेच्या विषयावर येत होतें.

शरद्नें विचारल्यावरून आपण कंपनीची नोकरी कां सोडली त्याचें खरें कारण जेव्हां विलासनें सविस्तरपणानें सांगितलें तेव्हां अखेर तो म्हणाला,

"पण शरद्, मी असाच आणखी कितीहि बोललों तरी आशेचा तो विलक्षण त्याग आणखी करार पाहून माझ्या मनांत जी विलक्षण क्रांति झाली तिचं पुरतं वर्णन मला करतां यायचं नाहीं. एखाद्या अवाढव्य कारखान्यांत अपघातानं मुख्य चक्रावरचा पट्टा निसटावा, आणि त्यामुळं सारीं यंत्रं गतिशून्य होऊन निकामी व्हावींत तसं कांहींतरी माझ्या मनांत घडलं येवढंच तुला सांगतों. मीं नुसती कंपनीची नोकरी सोडली नाहीं तर पूर्वी जें जें करीत होतों आणि जें जें मला आवडत होतं तें तें सगळं मीं सोडलं. त्या पाहिल्यास माझ्या टेनिसच्या रॅकेट्स् कोंपऱ्यांत सर्पणाच्या लांकडासारख्या पडल्या आहेत ! बंदुकीला

मीं कितीतरी दिवसांत हात लावला नाहीं. आणखी कितीतरी गोष्टी ! आशा केव्हां सुटेल, आणखी ती, तूं आणि मी मिळून सहकार्यानं कांहींतरी देशसेवा करूं अशी माझ्या मनाला उत्कंठा लागली आहे."

शरद्नें क्षणभर त्याच्या मुद्रेकडे पाहिलें, व गोंधळलेल्या स्वरानें म्हटलें,

" आपण तिघं मिळून म्हणतोस ?...... कुणास ठाऊक !......"

विलासनें आश्चर्यानें विचारलें,

" कां ? 'कुणास ठाऊक' असं कां म्हणतोस ? माझी ही नवी कळकळ खोटी आहे असा तुला संशय येतो ?"

" छे छे; आशेच्या स्फूर्तीनं पेटलेली उत्साहाची ज्योत सदा तेवतच राहील याबद्दल संशय नाहीं मला."

" मग 'कुणास ठाऊक' असं कां म्हणालास ?"

" त्याला एक मोठं कारण आहे."

" मला सांगण्यासारखं नाहीं ? "

" तुला सांगण्यासाठींच तर आत्तां मी तुझ्याबरोबर आलों. आज अकस्मात तूं भेटला नसतास तरी तें कारण सांगण्यासाठीं मी तुझ्याकडे आलों असतों."

" म्हणजे ? नीट सांग ना ?"

" आशा सुटून येईल तोंपर्यंत मीच तुरुंगांत गेलेला असेन अशी मला भीति वाटते ? "

" तें काय म्हणून ? "

" अपराध फार दिवस छपून राहात नाहीं म्हणून."

विलासनें गोंधळून विचारलें,

" तुझा कसला अपराध ? "

" सत्याग्रहाच्या आदल्या रात्रीं ओगॉर्मनला दूर कुठंतरी डांबून टाकायची मीं व्यवस्था केली होती, तें आठवतं ना तुला आतां ? "

" त्याचं काय ? "

" तें प्रकरण लवकरच माझ्या अंगचटीस येणार असं दिसतं आहे. त्या फिरदोस ड्रायव्हरनं रोज माझ्या पाठीमागं तगादा लावला आहे, कीं दोनअडीचशें रुपये आणखी द्याल तर मी कायमचा देशाला निघून जाईन. न द्याल तर मात्र पोलिसाच्या स्वाधीन होऊन तुमचं नांव सांगून टाकीन. या गोष्टीनं मला अगदीं कांही सुचेनासं झालं आहे. तुझी गांठ घ्यायचा विचार रोज करीत होतो; पण पुन्हा वाटे, नको. शिवाय तूं लोणावळ्यासच असशील अशी माझी कल्पना. बरं झालं तूं आज भेटलास. "

इतकें म्हणून शरद्नें कपाळाला आंठ्या घातल्या, व मस्तक तळहातावर टेकलें. जणु आपल्यावरचें संकट आपण आपल्या मित्राला सांगितलें खरें, पण तें सांगणें बरोबर होतें का चूक होतें, हें त्याचें त्याला कळेना.

विलासनें त्याला विचारलें,

" पण, त्या फिरदोसला येवढे पैसे दिले, कीं तो खास देशाला निघून जाईल अशी तुला खात्री वाटते ? "

मस्तक तसेंच तळहातावर ठेवून शरद् म्हणाला,

" खरं म्हणशील तर एक पिस्तूल घेऊन त्याला मारून टाकावं असं मला वाटतं. तुझ्याजवळ आहे ना रे एक पिस्तुल ? "

विलासनें एकदम दचकून म्हटलें,

" स् शरद्, तुझ्या डोक्यांत एकदम अत्याचाराचे विचार कसे येतात ? "

" मला वाटतं, माझ्या रक्तांतच तो धर्म आहे ! "

" पण, ही वृत्ति तुला टाकली पाहिजे. आशेला हें आवडेल काय ? "

" तिच्यासाठींच आजपर्यंत माझ्या स्वभावांतली ही सारी उसळी मीं आंवरून धरली आहे. "

" अन् यापुढंहि तुला ती आंवरून धरली पाहिजे. "

असें म्हणून विलासनें त्याच्या पाठीवर थोपटल्यासारखें केलें, व तो उठून आंतल्या खोलींत गेला.

कांहीं वेळानें परत येऊन त्यानें नोटांची एक लहानशी घडी शरद्च्या हातीं दिली व म्हटलें,

" येवढयानं बंद करतां येईल ना तुला फिरदोसचं तोंड ?"

त्याच्याकडे अत्यंत विस्मयाने पाहून शरद्नें फक्त मान हालविली.

विलासनें त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले,

" आतां तूं यत्किंचितहि काळजी करतां कामा नये. "

शरद्नें त्याचा हात आपल्या हातीं घेऊन दाबला, व म्हटलें,

" तुझे आभार कसे मानावेत मला कळत नाही. "

विलास हंसला. " वेड्या, हें मीं माझ्या मनाच्या समाधानासाठीं केलं. त्यांत आभार कसले ? आशा, तूं आणि मी तिघांनीं मिळून यापुढं पुष्कळ कामं करायची आहेत, या कल्पनेच्या आनंदांत मी आहें. माझी कल्पना खोटी ठरली तर तें मला सहन व्हायचं नाहीं. "

शरद्नें त्याच्याकडे रोंखून पाहात म्हटलें,

" विलास, किती चांगला आहेस रे तूं ! तुझ्या चांगुलपणाचा अवास्तव फायदा घेणं मला शोभणार नाही. पण, आणखी एका बाबतींत तूं माझं रक्षण केलं पाहिजेस. "

" रक्षण ? आणखी कोणापासून ?"

" आशेपासून !"

" काय विचित्र बोलतो आहेस ?"

" खोटं नाहीं. ओगॉर्मनच्या बाबतींत जें मीं केलं तें आतां जगाला कधीं कळायचं नाहीं हें तर झालंच; पण, तें आशेलाहि कधींसुद्धां कळतां कामा नये. तें जर तिला कळलं, किंवा

सत्याग्रहाच्या वेळीं मीं डायरेक्टर मंडळींच्या अंगावर धोंडे फेंकले ही गोष्ट जर तिला कळली, तर तिचं माझ्याविषयीं अत्यंत वाईट मत होईल ! आणि माझ्या प्रेमाचीं सुखस्वप्नं—"

"पण वेड्या, या गोष्टी तिला कळतील कशा ?"

"दुसऱ्या कुणालाहि नाहीं, पण तुला त्या माहीत आहेत."

"मी त्या आशेला सांगेन अशी तुला शंका येते ? ती अगदीं व्यर्थ आहे. या गोष्टींचा उच्चार माझ्या तोंडून कालत्रयींहि व्हायचा नाहीं. तुझ्या प्रेमाचं साफल्य व्हावं, अन् तूं आणखी आशा आनंदांत असलेलीं मला दिसावीं अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. प्रेमाचा अनुभव मला पूर्वीं नव्हता. त्याची योग्यता मला ठाऊक नव्हती. पण आतां... ...."

तें वाक्य पुरें न करतां विलासनें सिगारेटच्या पाकिटांतली एक सिगरेट काढली, व पाकीट टेबलावर फेंकलें.

शरद्नें विचारलें,

"आतां काय ? कुणाच्या प्रेमांत सांपडला आहेस वाटतं ?"

त्यावर चट्कन् उत्तर देण्याऐवजीं विलासनें सिगरेट पेटविली, तिचे दोनतीन झुरके ओढले. तोंडांत धरलेला धूर वर मान करून कडीपाटाकडे सोडला, व मग जणुं शरद्शी नव्हे तर त्या धुराशीं बोलल्यासारखें करून तो उद्गारला,

"O, nothing !" ( छे; कांहीं नाहीं ! )

फारा दिवसांनीं शरद् भेटल्यामुळें विलासचें अंतःकरण त्या रात्रीं जरी बरेंचसें उल्हसित झालें होतें, तरी त्याला झोंप मात्र चांगलीशी लागली नाहीं.

कारण, स्वतःच्या आशेवरील प्रेमाचे विचार त्याच्या मनांत पुनःपुन्हा येत होते.

आपण तिच्यावर असें अनिवार प्रेम करतों खरें, पण या प्रेमाचा अखेर परिणाम काय होणार ? असें त्याच्या मनांत सारखें येत होतें.

आणि त्या परिणामाच्या कल्पना करतां करतां त्याचें मन थकलें म्हणजे तें त्याला विचारी,

'पण, प्रेमाची परिणति झालीच पाहिजे असं थोडंच आहे ? किंबहुना, परिणतीसाठी केलेलं प्रेम तें खरं प्रेमच नव्हे ! प्रेम करण्याच्या आनंदासाठीं जें प्रेम केलं जातं तेंच खरं प्रेम !'

या विचारांनीं त्याच्या मनाला कांहीसें समाधान वाटे.

पण, त्याच्या मनांत पुन्हा येई, ज्या प्रेमाचें उत्तर दुसऱ्या व्यक्तीकडून कधीं मिळणें शक्य नाहीं त्या, प्रेमाचा एखाद्याच्या हृदयांत उद्‌भव व्हावा ही कोणत्या निष्ठुर दैवाची विचित्र घटना म्हणायची ?

त्याला एकदम सुनेत्राचें स्मरण झालें, आणि तिची व स्वतःची तुलना तो मनाशीं करूं लागला. आपण कधींहि उत्तेजन दिलें नसतांना तिनें आपल्यावर प्रेम करावें, व आपल्याशीं विवाहित होण्याची इच्छा धरावी याबद्दल त्यानें तिला सर्वथा दोष दिला होता, तिची मूर्खांत गणना केली होती, कित्येक वेळां तिच्याशीं निष्ठुरपणाचें वर्तन केलें होतें. पण आज त्याच्या मनांत आलें, सुनेत्रा जर वेडी तर आपणहि वेडे नव्हे काय ? त्याच्या मनानें त्यांतहि श्लेष काढला. सुनेत्रानें उलट प्रेमाचा हट्ट चालवला होता, व तें मिळत नाहीं म्हणून स्वतःला दुःखी करून घेतलें होतें; आपण तसें कांहीं थोडेंच करणार आहोंत ? आशेबद्दलचा आपला प्रणयभाव आपण अव्यक्त आणि गुप्तच ठेवणार आहोंत. तिच्याजवळ प्रतिप्रेमाचा हट्ट धरण्याचें तर दूरच राहिलें.......

पण त्याच्या मनानें हळूच विचारलें,

" यापुढं आशा तुझ्या कधींहि दृष्टीस पडली नाहीं, तिच्याशीं तुला बोलायचालायला मिळालं नाहीं, तिचा सहवास मिळाला

नाहीं तर तुला चालेल का? नाहीं ना? मग याला तरी हट्ट नाहींतर काय म्हणायचं? सुनेत्राच्या आणि तुझ्या हट्टांत फक्त कमीअधिकपणाचाच फरक आहे, नव्हे काय?"

यावर त्याला उलट जबाब सुचेना आणि मग किती वेळ तरी झोंपेवांचून तो तसाच अंथरुणांत पडून राहिला!

सुनेत्राचें प्रेम आपल्याला स्वीकारतां येत नाहीं यांत आपला दोष नाहीं हें त्याला स्पष्ट दिसत होतें; पण आपल्या प्रेमासाठीं सुनेत्रा झुरत असेल तर त्याबद्दल तिला दोष देणें कसें समर्थनीय ठरतें, तें त्याला कळेना. प्रेम सांगून करता येत नाहीं हें उघडच होतें, पण प्रेम सांगून आंवरतां येत नाही हें विलासला आतां — त्याचें प्रेम जेव्हां आशेवर जडलें तेव्हां — आणि त्यांतल्या त्यांत आज रात्री त्यानें सुनेत्राबद्दल विचार केला तेव्हा, त्याला कबूल करावें लागलें.

सुनेत्राविषयीं त्याच्या मनांत थोडासा द्रव उत्पन्न झाला.

मात्र, तिच्याबद्दलचा आपल्या आयुष्यांतला हा विचित्र प्रश्न अखेर कसा सुटणार आहे तें त्याला कळेना.

अशा मनस्थितींतच अखेर त्याला झोंप लागली.

त्यामुळें दुसऱ्या दिवशीं तो एकीकडे वाचनांत गुतलेला असतांना दुसरीकडे त्याचें मन जसें आशेबद्दल तसेंच सुनेत्राबद्दलहि पुनःपुन्हा विचार करीत होतें.

संध्याकाळीं सुदेष्णाबाई त्याच्या खोलींत येऊन म्हणाल्या,

"काय करतो आहेस रे?"

हातांतील पुस्तक, त्यांतील आपलें बोट न काढतां, टेबलाच्या कडेवर टेकून विलास म्हणाला,

"कांहीं नाहीं."

"बाहेर जाणार आहेस का कुठं?"

"कांहीं नेम नाहीं."

" माझ्याबरोबर येतोस का ? मी जातें आहें. "

" कुठं ?"

" सुनेत्राकडं. येतोस का ? "

" नको. तू आज जाते आहेस ना ? उद्यांपरवां जाईन मी."

त्यावर सुदेष्णाबाई कांहींच बोलल्या नाहींत. एक क्षणभर त्या उभ्या राहिल्या, व मग खालीं गेल्या.

मोटारीचा आवाज ऐकूं आला त्यावरून त्या बंगल्याबाहेर पडल्याचें विलासला कळलें.

सुनेत्राचा प्रश्न आपल्याला फारच जाचक होणार आहे हा विचार अत्यंत तीव्रतेनें विलासच्या मनांत त्या क्षणीं आला.

सुनेत्रा तर स्वतःला दुःखी करून घेत होतीच, पण तिच्या-वर आपण उलट प्रेम करीत नाहीं म्हणून आपली आईहि स्वतःच्या मनाला दुःख लावून घेत होती ! जन्मदात्या आईला जाणूनबुजून दुःख देण्यापलीकडे दुसरें कोणतें पाप असेल ? काय विलक्षण या संसारांतल्या सुखदुःखांची गुतागुंत ही ! अशा परिस्थितींत आपलें कर्तव्य तरी काय म्हणावयाचें ?.... ....

विलास आपल्या मनाशी मनस्वी त्रासला.

अखेर त्यानें गाडी काढविली, आणि या साऱ्या तापदायक विचारांचा जेथें विसर पडेल अशा एखाद्या ठिकाणीं जाऊन यावें म्हणून तो निघाला.

प्रिन्सेस स्ट्रीटवरील त्याच्या एका आवडत्या हॉटेलजवळ येऊन तो थांबला तेव्हां प्रवेशद्वारावरील पट्टेवाल्यानें लग-बगीनें पुढें येऊन त्याला सलाम केला, व त्याच्या गाडीचें दार उघडून तो खालीं उतरल्यावर तें बंद केलें.

हॉटेलांत पाऊल टाकतांच तेथील दिव्यांचा झगझगाट पाहून विलासला एकदम बरें वाटलें.

त्याच्या मनांत आलें, विद्युद्दीपांच्या अंगीं अशी काय शक्ति आहे, कीं त्यांच्या प्रकाशांत मनाला एकदम प्रसन्नता वाटावी ? सर्वांना या प्रसन्नतेचा अनुभव येत असेल कीं माझ्या स्वभावधर्मामुळें मलाच तेवढा येतो ? माझ्यांत कितीहि बदल झाला आणि माझ्या विचारांत केवढीहि क्रांति झाली तरी माझी मूळची विलासी वृत्ति पूर्णपणें नष्ट होणें शक्य नाहीं असें तर नसेल ?....

हॉटेलच्या मालकानें आपल्या जागेवरून त्याला सलाम केला व इंग्रजींत विचारलें,

" फार दिवसांनीं आलांत ? "

विलासनें फक्त हास्य करून मान हालविली, तिचा वाटेल तो अर्थ होण्यासारखा होता.

तीनचार परिचारकांनीं लगबग दाखवून आपआपल्या ताब्यातील टेबलावर विलासनें येऊन बसावें म्हणून 'इतइतो महाराज:' अशा अर्थाचा सत्कारदर्शक अभिनय केला.

त्यांपैकीं कोणाची इच्छा पूर्ण करावी तें विलास मनाशीं ठरवीत होता, इतक्यांत वरच्या मजल्याच्या गॅलरींतून कोणींसें ओरडून म्हटलें,

" हॅलो, विलास ! "

विलासनें मान वर करून पाहिलें तों भार्गवराम त्याच्या दृष्टीस पडला.

विलास जिना चढून त्याच्याजवळ गेला, व त्यानें विचारलें,

" How's the world ? Perfectly round ? Or square ? (काय, जग कसं काय आहे ? वाटोळं, कीं चौकोनी ? )

पण त्या वाक्यांतील गंमत कळण्याइतकी अक्कल भार्गवरामाच्या ठिकाणीं थोडीच होती ? तो फक्त दांत काढून हंसला आणि त्यानें डोळे मिचकावले.

आपल्याला पाहातांच त्यानें आपल्याला वर कां बोलाविलें तें विलास पूर्णपणें ओळखून होता. त्यानें विचारलें,

"बरं, काय मागवूं ?"

"नको नको."

"छे छे, असं कुठं झालंय ?"

"No no!" असें कांहीतरी भार्गवराम पुटपुटला, पण मद्याचे दोन ग्लास टेबलावर येतांच विलासच्या आधींच आपला ग्लास संपविण्यास त्यानें कमी केलें नाहीं.

तो रंगात आला आहे असें पाहातांच विलासनें मनाशीं योजलेला विषय काढला. त्यानें विचारलें,

"काय भार्गवराम, त्या ओगॉर्मनच्या केसचं काय झालं पुढं ? गुन्हेगार सांपडतो आहे का नाहीं ?"

भार्गवराम हातांतील ग्लास वांकडातिकडा हालवीत म्हणाला,

"ती एक मोठी विचित्र केस आहे बुवा !"

"विचित्र म्हणजे फार मनोरंजक आहे म्हणतां ?"

"मनोरंजक कसली ! आमच्या डिपार्टमेंटची अब्रू घेतली त्या केसनं."

"म्हणजे ? मी समजलों नाहीं."

"अहो, त्याचं असं आहे, कोणत्याहि गुन्ह्याचा पुरता छडा लागेपर्यंत त्याचा तलास चालूं ठेवला पाहिजे हें जरी आमच्या डिपार्टमेंटचं तात्त्विक सूत्र असलं, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत असल्या केसिसमधें फार तर एक महिन्याच्या पलीकडे आमच्या बुद्धीचा अपव्यय आम्ही करीत नाहीं. तेवढ्या अवधींत गुन्हेगार सांपडला तर ठीकच, नाहीतर आम्ही घालून टाकतों ती केस डिपार्टमेंटच्या फायलींच्या गठ्ठ्यांत. मग कधीं काळीं गुन्हेगारालाच दुर्बुद्धि होऊन तो आमच्या जाळ्यांत येऊन अडकला तर अडकतो. नाहीं अडकला तर आम्हांला त्याची फारशी पर्वा नसते; समजलां ?"

" असं असं. एकूण ती केस रद्दींत गेली म्हणतां ? घ्या ना, आणखी घ्या. वा वा, नको काय ? घ्यायलाच पाहिजे."

भार्गवरामानें जेव्हां आणखी थोडें मद्य संपविलें तेव्हां स्वतः-च्या मनाची पुरती खात्री करून घेण्यासाठीं विलासनें म्हटलें,

" दुसऱ्या कोणीं मला हें सांगितलं असतं तर खरं वाटलं नसतं. पण, तुमच्यासारखा बडा ऑफिसर सांगतो आहे तें खरं वाटलंच पाहिजे. ती केस रद्दीत गेली तर एकूण ?"

" हो. निदान मी स्वतः तरी त्या केसमधें आतां अधिक लक्ष घालणार नाहीं. मी दुसऱ्याच एका केसमधें रंगलों आहे सध्यां, विलास."

" हं ? कोणती केस बुवा ?"

" केस म्हणजे... केस नाहीं अं... एक छोकरी आहे."

" हं ! छोकरी आहे ? आम्हांला सांगा की ! आणखी घ्या ना.... कोण छोकरी म्हणतां भार्गवराम ?"

तळवलीच्या सत्याग्रहांतली ती मुलगी तुम्ही पाहिली आहांत का ?"

" कोण मुलगी बुवा ? आपल्याला नाही मुली पहा-ण्याचा नाद !"

" हां हां ! पाहिली नाहींत तंवर बोला."

" बरं, तिचं काय ?"

" तिच्याशिवाय सध्यां आपल्याला दुसरं कांही सुचत नाही. काय सांगूं विलास, मोठं झकास काम आहे ! अशा भुंवयाला आंठ्या काय घालतां ? तळवलीच्या त्या सत्याग्रहाला सरकारनं कितीहि वाईट म्हटलं तरी आपण नाही बुवा म्हणणार ! अहो, तें तुफान उसळलं म्हणून तर हें रत्न आमच्या हातीं आलं."

त्याचे ते अखेरचे शब्द ऐकतांच विलासच्या अंतःकरणांत तिरस्काराची ऊर्मि उठली, व त्याला वाटलें त्या मूर्खाचें तोंड एकदम रंगवावें. पण, त्यानें आत्मसंयमन केलें व विचारलें,

" तुमच्या हातीं ? म्हणजे ? माझी समजूत अशी होती, कीं ती मुलगी तुरुंगांत गेली. "

भार्गवराम आतां खूपच तर्र झाला होता. तो हंसला, व म्हणाला,

" अहो, तुरुंगात म्हणजे आमच्या हातांतच कीं ! "

" पण भार्गवराम, प्रेमशास्त्राचा असा एक नियम आहे म्हणतात, कीं ज्या स्त्रीकडून आपली इच्छा पूर्ण होण्याचा संभव नाहीं त्या स्त्रीच्या नादीं पुरुषानं लागणं म्हणजे उगाच दुःखाची जोड करून घेण्यासारखं आहे. "

" अहो, पण इच्छा तृप्त होणं शक्य नाहीं, असं कां तुम्ही म्हणतां ? तुरुंगांत ती सांपडलेली असतांना आमची इच्छा अतृप्त राहील ही गोष्टच सोडा. सध्यां ती मला झिडकारते आहे खरी, पण जाते कुठं ? येत्या रविवारीं मी जाणार आहे तिच्या समाचाराला. त्यानंतर तुम्ही भेटलांत तर बहुतेक मी तुम्हांला म्हणेन, ' द्या टाळी. काम झालं फत्ते !' आणखी हें पहा विलास– "

पण तितक्यांत विलास एकदम उठला, आपली खुर्ची त्यानें फरंदिशी मागें लोटली, आणि तो ओरडला,

" Shut up ! ( चूप ! ) एक अक्षरसुद्धां बोलूं नकोस ! "

हातांतील ग्लासाला हेलकावे देत, व दारूच्या धुंदींत चमत्कारिकपणें हंसत भार्गवराम म्हणाला,

" कां ? तुम्हांला मत्सर वाटायला लागला वाटतं ? अहो, पण मत्सराचं काय कारण ? आम्हाला कांहीं मिळालं तर तुम्हांलाहि देऊं थोडंसं ! "

हें बोलून भार्गवराम आणखी हंसणार होता; पण त्याच्या हंसण्याला सुरवात झाली न झाली तोंच विलासनें आपल्या उजव्या हाताची मूठ वळून हनुवटीवर जोरानें प्रहार केला !

त्याबरोबर प्रथम हनुवटीच्या हाडांचा कड्कड् असा आवाज झाला, नंतर भार्गवरामानें मोठी किंकाळी फोडली ती ऐकूं आली, मग त्याच्या हातांतील ग्लास पडून फुटला तो खळकन्

वाजला, आणि अखेर भार्गवराम स्वत: खुर्चीतून कोलमंडून वांकडा-तिकडा होऊन खालीं पडला !

विलासनें त्याला आणखी मारलें असतें; पण तितक्यांत हॉटेलचा मालक आणि कांहीं परिचारक तेथें धांवून आले, व त्यांनीं विलासला आंवरून भार्गवरामाला तक्तपोशीवरून उठविण्यास प्रारंभ केला.

भार्गवरामानें रक्त थुंकलें होतें व त्याच्या थुंकण्याबरोबर त्याच्या कवळींतील तीनचार दांत खालीं पडले होते ! आधींच दारू पिऊन पिऊन त्याची अर्धी शुद्ध गेली होती; आणि जी कांहीं उरली होती ती विलासच्या त्या जबरदस्त प्रहारानें नष्ट झाली होती !

त्याला उचलतां उचलतां हॉटेलच्या लोकांनीं 'काय, झालं तरी काय ?' अशा अर्थानें विलासकडे पाहिलें, तेव्हां विलास रागारागानें म्हणाला,

"पाजी ! वाटेल त्या स्त्रीबद्दल वाटेल तें बडबडतो ! जीभ हासडून टाकली असती, माहीत नाहीं !"

भार्गवराम कोणत्या तऱ्हेचा मनुष्य होता तें हॉटेलच्या लोकांना पूर्णपणें माहीत होतें; आणि विलास तर त्या हॉटेलांत पूर्वीं नेहमीच येत असे

त्यांनीं मुकाट्यानें भार्गवरामाला उचलून नेण्यास प्रारंभ केला.

विलासनें खिशांतून एक पांच रुपयांची नोट काढून ती मालकाच्या हातीं देत म्हटलें,

"हें पहा, एक टॅक्सी करा, आणखी या विद्वानांना त्यांच्या बिऱ्हाडीं पोंचवा. नवे दांत बसवून घेण्याचं बिल मात्र माझ्याकडून मिळणार नाहीं."

त्याच्या त्या बोलण्यानें ती सारी मंडळी मोठमोठ्यानें हंसली

ती सर्व मंडळी खालीं निघून गेल्यावर विलास खुर्चीवर बसला, व स्वत:शींच उद्गारला,

"आतां ही स्वारी एक महिनाभर तरी आशेकडे जाऊं शकत नाहीं."

---

# प्रकरण १५ वें

---

नंतरच्या आठदहा दिवसांत शरद् त्याच्याकडे एकदांहि आला नाहीं या गोष्टीचें विलासला विलक्षण आश्चर्य वाटलें, व त्याच्या मनाची कांहींशी निराशाहि झाली.

कारण, शरद् त्या दिवशीं अकस्मात् भेटल्यापासून त्यानें मनाशीं ठरविलें होतें, कीं आपण चालविलेल्या वाचनामुळें सामान्य गरीब जनतेला सुसंघटित व बलिष्ठ करण्याचे जे मार्ग आपल्याला कांहींसे पटूं लागले आहेत, त्यांची पूर्ण चर्चा आतां शरद्शीं करतां येईल. सविनय कायदेभंगाचा मार्ग त्याला स्वतःला कधींच मोठा फलदायी वाटला नव्हता. आशा बंधमुक्त होऊन परत आली, कीं तिच्याशीं या बाबतींत चर्चा केली पाहिजे, आणि आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून सत्याग्रहाचा मार्ग सोडून दुसऱ्या कोणत्यातरी अधिक परिणामकारक मार्गाकडे तिला वळविलें पाहिजे, असें त्याला आतांशा फार तीव्रतेनें वाटूं लागलें होतें. या कामीं आपल्याला शरद्ची फार मदत होईल अशी त्याची कल्पना होती; व म्हणून बरें झालें शरद् भेटला, आतां त्याच्याशीं शक्य तेवढी चर्चा करून आशेशीं काय व कसें बोलायचें, आणि देशकार्याचा कोणता कार्यक्रम तिच्यापुढें मांडावयाचा हें आपल्याला ठरवितां येईल असें समाधान त्याला वाटलें होतें.

परंतु, आठदहा दिवस झाले तरी शरद् एकदांहि त्याच्याकडे आला नाहीं. त्याला कोठें गांठावा तेंहि विलासला समजेना.

अखेर त्याच्या मनांत आलें, आशेनें काढलेली जी डेअरी परळभागांत होती तेथें कदाचित् शरद् भेटेल. त्या डेअरीची हकीकत स्वतः आशेकडून व शरद्कडून त्याला माहित झाली होती, व आशा तुरुंगांत गेल्यानंतरहि तिच्या सहकाऱ्यांनीं डेअरीचें काम पूर्ववत् चालू ठेवलें होतें, हेंहि त्याला ठाऊक होतें. त्या डेअरीच्या कामांत शरद् जरी विशेषसा प्रत्यक्ष भाग घेत नव्हता, तरी तेथें

शरद्‌ची गांठ पडणें संभवनीय आहे, निदान त्याची गांठ खात्रीनें कोठें पडेल याबद्दलची खात्रीलायक बातमी तरी तेथें मिळेल असें विलासला वाटलें

म्हणून तिकडे जाण्याच्या हेतूनें त्यानें कपडे केले, व तो निघाला.

तो खालीं आला त्याच वेळीं टेलिफोनची घंटा वाजली, ती ऐकून तो टेलिफोनजवळ गेला, व रिसीव्हर कानाला लावून म्हणाला,

" हॅलो ! कोण पाहिजे ? "

" विलास ! "

तो शब्द ऐकतांच विलास दचकला. कारण, एल्सीचा आवाज त्यानें ताबडतोब ओळखला. लोणावळ्याहून नोकरी सोडून परत आल्यापासून तो एकदांहि तिच्याकडे गेला नव्हता. तिची गांठभेट व्हावी अशी इच्छाहि त्याला नव्हती.

रिसीव्हर तसाच परत ठेवावा किंवा काय अशा विचारात तो स्तब्ध उभा राहिला.

तिकडून एल्सीनें कांहींसें त्रासून विचारलें,

" हॅलो, हॅलो. विलास घरांत आहे का ? "

" होय. मीच बोलतों आहे. "

" O dear ! Is that really you ? " (ओहो ! खरंच का तूच आहेस ? )

तिच्या आवाजांत केवळेंतरी आर्जव भरलें होतें.

पण त्याचा कांहींच परिणाम न होऊन विलास गप्पच उभा राहिला.

एल्सी म्हणाली,

" मी तुझ्यावर फार फार रागावलें आहें, माहित आहे तुला ? "

" रागावली आहेस ? तें काय म्हणून बुवा ? "

" इथं मुंबईत असून तू मला कळवलंसुद्धां नाहींस काय ? काल संध्याकाळीं मी कॅपिटॉल सिनेमाच्या दारांत उभी होतें तेव्हां मोटारींतून जातांना मीं तुला पाहिलं म्हणून मला समजलं तरी. "

" अग, मी कालच इथं आलों. "

" तूं काय वाटेल तें खोटं सांगशील, माहीत आहे मला. "

" मी सांगेन तें खोटंच म्हणायचं ठरवलं असलंस तर माझा नाइलाज आहे. "

" बरं तें जाऊं दे. तूं आत्तां माझ्याकडं सरळ आलं पाहिजेस. तुझ्या भेटीसाठीं मी किती उत्सुक आहें त्याची तुला कांहीं कल्पना ? काय ? येतोस ना ?"

" काय, आत्तां ?"

" हो हो, आत्तां. मी कांहीं मल्याळी किंवा पुष्तु भाषेंत बोलत नाहीं आहें. "

विलास मोठ्यानें हंसला.

तें तिकडे एल्सीला ऐकूं गेलें असावें; कारण ती म्हणाली,

" मला नाहीं हंसतां येत. मला तुझा फार राग आलेला आहे. "

" मग बारा वर्षं माझं तोंड पाहाणार नाहीं अशी प्रतिज्ञा कर कीं !"

" बारा वर्षं ? O God ! मी मरूनच जाईन ! बारा मिनिटं-सुद्धां आतां मला तुझ्यावांचून काढवायचीं नाहींत. येतोस ना ?"

" एल्सी, शपथ मला आत्तां दुसरं काम आहे. "

" कामबीम मला कांहीं समजत नाहीं. माझी तुला अगदीं दया येत नाहीं का ?"

" दयेचा काय प्रश्न आहे ? मला खरंच फार महत्वाचं काम आहे आत्तां. "

असें म्हणून विलासनें रिसीव्हर खालीं ठेवला, आणि एका अर्थीं तिचें तोंड बंद केलें.

पूर्वीच्या आयुष्यांतील पाश तो तोडून टाकीत होता, पण त्यांतील कांहीं तुटत नव्हते.

तें पाहून तो त्रासला.

आणि परळच्या डेअरीवर जाऊनहि शरद्‌चा कांहींच शोध लागला नाहीं, व तेथें तो गेल्या आठदहा दिवसांत आला नव्हता, येवढेंच जेव्हां त्याला कळलें, तेव्हां अधिकच त्रासलेल्या मनानें तो घरीं परत आला.

तो सरळ वर आपल्या खोलीत जाणार होता. पण, एका नोकरानें पुढें येऊन त्याला म्हटलें,

" कुणीतरी तुम्हांला सारखं टेलिफोन करीत आहे. "

" कोण ?"

" नांव माहीत नाहीं. पण गेल्या तासाभरांत पांचसहा वेळां टेलिफोन आला. आवाजावरून कुणीतरी बाईमाणूस असावं असं वाटतं. "

" हो का ? बरं असू दे. "

असें म्हणून विलास जिन्याकडे वळला.

पण तितक्यांत टेलिफोनची घंटा वाजली, व नोकर म्हणाला,

" हा पहा. खास तोच टेलिफोन. "

त्या ठिकाणीं तो नोकर हजर नसता तर विलासनें कदाचित् त्या टेलिफोनची उपेक्षा केली असती. पण, त्याच्यादेखत तसें करणें त्याला बरें वाटलें नाही.

तो परत वळला, व टेलिफोनजवळ गेला.

त्या नोकराला आपलें कर्तव्य पुरतें माहीत होतें. तो तेथून निघून गेला.

रिसीव्हर कानाला लावून विलासनें विचारलें,

" हॅलो ! "

" ओहो ! विलास का ? "

"एल्सी, तूं मूर्ख तर नाहींस ? सारखा टेलिफोन करते आहेस म्हणे !"

"हो; आणखी सारखा करीत राहाणार होतें. अखेर टेलिफोनचा उपयोग झाला नसता तर तुझ्या बंगल्यावर येऊन धरणं धरून बसणार होतें."

"एल्सी, एल्सी, तुझं डोकं फिरलं आहे कीं काय ?"

"काय वाटेल तें म्हण, पण आज तुझी माझी भेट झालीच पाहिजे."

"अन् नाहीं झाली तर ?"

"मी विष खाऊन प्राण देईन, आणि टेबलावर चिठी लिहून ठेवीन, कीं विलासनं माझी प्रेमनिराशा केली म्हणून मीं जीव दिला !"

"काय भयंकर बोलते आहेस !"

"खोटं नाहीं."

"No no ! तूं असं बोलतां कामा नये."

"मग ये तर ताबडतोब. हो म्हण ना."

"बरं येतों."

"There's a darling !"

असें म्हणून तिनें टेलिफोनच्या यंत्राचें चुंबन घेतल्याचा आवाज विलासला ऐकूं आला.

००० ००० ०००

एल्सीच्या राहात्या जागेच्या जिन्यावर जरी नेहमींप्रमाणें अंधार होता, आणि त्या अंधारांतून चढून जातांना तेथें तो अंधार कां असावा याचें जरी विलासला नेहमींप्रमाणें आश्चर्य वाटलें, तरी एल्सीच्या फ्लॅटमध्यें भरपूर रोषणाई होती, व त्या ठिकाणीं प्रवेश करतांच विलासच्या मनाचा त्रासिकपणा थोडासा कमी झाल्यावांचून राहिला नाहीं.

त्याला पाहातांच एल्सीला खरोखरच मनःपूर्वक आनंद झाल्याचें दिसलें. हर्षभरानें तिनें जी बडबड करावयास सुरवात केली ती कधीं थांबणार नाहीं असें विलासला वाटलें.

आपल्या नुसत्या दर्शनानें एखाद्या स्त्रीला इतका हर्ष व्हावा हा विचार कोणत्याहि पुरुषाला उल्हसित करण्यासारखाच असतो. परंतु, उलट ज्या स्त्रीचा असा हर्ष डोळ्यांना दिसतो तिच्याविषयी यत्किंचित्हि आसक्ती अंतःकरणांत नसेल तर पुरुषाची मनःस्थिति मोठी चमत्कारिक होते.

त्या मनःस्थितीचा या वेळीं विलासला अनुभव आला, व त्याची चर्या कांहीं निराळीच दिसूं लागली.

एल्सीचें लक्ष मात्र त्याच्या चर्येतील त्या सूक्ष्म फरकाकडे नसावें. तो आला– नव्हे त्याला आपण यावयास लावलें– या विजयाच्या आनंदांत ती मग्न होती. ती सारखी बोलत राहिली.

तो दूर एका खुर्चीवर बसला, तें तिला सहन झालें नाहीं. आपल्याजवळ कोंचावर येऊन बसण्याविषयीं तिनें त्याला दोन-तीनदां सांगितलें, व त्यानें ऐकलें नाही तेव्हां त्याच्या खुर्चीच्या अर्ध्या भागावर ती त्याला चिकटून बसली.

आपल्या बोलण्याकडे त्याचें लक्ष आहे किंवा नाहीं याचीहि तिला फिकीर नव्हती. आपणच हजार विषय काढून ती सारखी बोलत होती.

आपण त्याची रोज कशी वाट पहात होतों, त्याचें तिनें वर्णन केलें; आपण कुठेंकुठें आणि कुणाकुणाबरोबर टेनिस खेळलों, किंवा समुद्रस्नानाला अथवा पार्टीला गेलों तें तिनें सांगितलें; आपण किती नवे कपडे खरेदी केले त्याची माहिती तिनें दिली, व लगबगीनें उठून त्यांतील कांहीं कपडे दाखविलेसुद्धां; पुन्हा त्याच्याजवळ बसून आपण पाहिलेल्या चित्रपटांचीं नांवें व कथानकें तिनें त्याला सांगितलीं, आणि कोणा एका हस्तसामुद्रिकवाल्याला

एका गिनीची फी देऊन आपलें भविष्य तिनें वर्तवून घेतलें होतें, तें-सुद्धां सांगावयाचें तिनें शिल्लक ठेवलें नाहीं.

विलासचें आपल्या बोलण्याकडे नीटसें लक्ष नाहीं असें जेव्हां तिच्या ध्यानांत आलें, तेव्हां तिला अत्यंत प्रिय असणाऱ्या त्याच्या केंसांच्या झुलपांवर हात दाबून त्याचें मस्तक हालवीत तिनें विचारलें,

" ए, ऐकतो आहेस का नाही ? "

तिचा हात दूर करीत विलास म्हणाला,

" ऐकतों आहें ना. काय सांगितलंन् त्या ज्योतिषानं ? "

" आ: ! कितीतरी गोष्टी सांगितल्या. त्यांतल्या बहुतेक चांगल्याच होत्या. पण एक मात्र भयंकर आहे. "

" ती काय ? तुझं लग्न व्हायचं आहे कीं काय ? "

" छे ! त्याहीपेक्षां भयंकर ! ओळख पाहूं. "

" तुझी मावशी मरणार असेल ! "

" जवळ आला आहेस, पण अजून बरोबर नाहीं. "

" आपण थकलों बुवा ! सांग तूंच. "

" सांगूं ? लवकरच म्हणे माझ्या या जागेंत खून व्हायचा आहे ! "

" अरे बापरे ! या खोलींत कीं काय ? "

" खोलींत नाहीं. पण जवळपास. "

" जिन्यावर असेल ! तिथं सोयिस्कर अंधार आहे खरा. पण या खुनाच्या गोष्टी सांगायला का मला बोलावलंस ? दुसरं कांहींतरी बोल. "

" तूं कांहींच बोलत नाहींस, अन् माझे तर सगळे विषय संपले. मग मी आतां काय बोलूं ? आमच्या ऑफिसांतल्या गमती सांगूं तुला ? कुठं वाच्यता मात्र करायची नाहीं अं ! अत्याचारी लोकांची एक मोठी टोळी पकडली जायची आहे मुंबईत. "

"अस्सं? This is very interesting. (फार गमतीची आहे ही बातमी!)"

"Yes, very interesting. हे अत्याचारी लोक पंजाबांतून आणि बंगाल्यांतून इकडं आले आहेत. मात्र, इथला एक मुंबईचाहि मुलगा त्यांनीं आपल्या नादी लावला आहे; आमच्या डिपार्टमेंटचं सध्यां त्याच्यावर चांगलंच लक्ष आहे. त्याचं नांव काय बरं?.... हां हां. आठवलं. शरच्चंद्र!"

तें नांव ऐकताच विलासला येवढा धक्का बसला, कीं त्यानें तिचा हात एकदम जोरानें दाबून विचारलें,

"काय म्हणालीस? शरच्चंद्र?"

एल्सी त्याच्या चेहऱ्याकडे पाहून विस्मित झाली. ती म्हणाली,

"हें काय? तुझा चेहरा एकदम पाढराफटक कसा झाला? छे छे, भलत्याच गोष्टी मी तुला सांगत बसलें, हा केवढा माझा मूर्खपणा! I'm so sorry! O dear, won't you excuse? थांब. आपण थोडं मद्य घेऊं म्हणजे तुला बरं वाटेल. माझ्या नव्या सैंपाकिणीकडून मी फार सुदर जेवण तयार करवलं आहे. तूं अधाशासारखं जेवशील, माझी खात्री आहे."

असें म्हणून ती मोठमोठ्यानें हंसली, व एका शोभिवंत कपाटांतून तिनें मद्यसेवनाचीं उपकरणें काढलीं.

ooo ooo ooo

जेवणासाठीं तीं दोघें उठलीं, व आंतल्या खोलींत जाऊन बसलीं. तेव्हां खुर्चीवर बसतां बसतां समोरच्या एका फोटोकडे विलासचें लक्ष : गेलें. तो त्याला त्या ठिकाणीं पूर्वीं कधीं दिसला नव्हता, व फोटोंतील व्यक्ति त्याच्या पाहुण्यांतली नव्हती.

एल्सीनें त्याला विचारलें,

"येवढं टवकारून काय पहातो आहेस?"

"तो फोटो."

" त्यांत काय येवढं पाहाण्यासारखं आहे ?"

" कुणाचा आहे तो ?"

" तुला काय करायचं आहे त्याच्याशीं ? तूं आपला माझ्या-कडं बघत राहा."

" पण सांग ना कुणाचा आहे तो ? "

" तुझा फोटो सोन्याची फरेम करून माझ्या निजायच्या खोलींत मी ठेवला आहे, अन् हा फोटो इथं जेवणाच्या जागीं ठेवलेला आहे, तेव्हां तुला मत्सर वाटायचं कांहींएक कारण नाहीं, समजलास !"

विलासचें तिच्यावर प्रेम असतें, किंवा निदान तिच्याविषयीं त्याच्या मनांत पूर्वींची बेफिकिरीचीच का होईना, पण लालसा असती तर त्याला तिच्या या बोलण्यानें कदाचित् बरें वाटलें असतें. पण, त्याची पूर्वींची वृत्ति आतां पार नाहींशी झाली होती, व त्यामुळें तिच्या निमित्तानें आपल्याला दुसऱ्या कोणा व्यक्तीचा मत्सर वाटल्याची शंका तिला यावी ही कल्पनासुद्धां त्याला कशी-शीच वाटली. तो चटकन् म्हणाला,

" मत्सर ? शी: ! तुला सांगायचं नसलं तर नको सांगूंस. मीं केवळ जिज्ञासेनं विचारलं. हा फोटो पूर्वीं कधीं इथं दिसला नव्हता म्हणून–"

" पूर्वीं कसा दिसेल तुला ? त्या गृहस्थाची आणि माझी ओळख झाल्याला तीन महिनेसुद्धां पुरते झाले नाहींत."

" कोण हे गृहस्थ ?"

" तुला माहीत नाहींत याचं आश्चर्य वाटतं ! गेल्या पांचसहा महिने बॅांबच्या गुप्त कटाचा एक खटला इथं कुणापुढं चाललेला आहे तुला माहीत नाहीं ?"

विलासनें आश्चर्यानें विचारलें,

" म्हणजे ? जस्टिस व्हाइट्फील्ड यांचा हा फोटो असं तुझं म्हणणं कीं काय ?"

"Exactly (त्यांचाच.)."

पण तिचें तें उत्तर विलासनें ऐकलें कीं नाहीं कुणास ठाऊक? कारण, तो आपल्याच आश्चर्यांत अगदीं मग्न झाला होता. या तरुण मुलीकडे जस्टिस व्हाइट्फील्ड यांजसारख्या वृद्ध गृहस्थाचा फोटो दिसावा येवढेंच त्याच्या विस्मयाचें कारण नव्हतें, तर अलीकडे त्याच्या वाचनांत 'The Indian Civilization', 'Eve in India', 'The Mission of New India,' हीं जीं पुस्तकें नुकतीच आलीं होतीं, व जी त्याला मन:पूर्वक आवडलीं होती, त्या पुस्तकांचा कर्ता चित्ररूपानें येथे एल्सीच्या घरांत त्याच्या दृष्टीस पडावा या घटनेचेंहि त्याला विलक्षण आश्चर्य वाटले.

जेवतां जेवतां नॅपकिन् मांडीवरून काढून टबलावर ठेवून तो त्या फोटोजवळ गेला, आणि त्याकडे निरखून पाहूं लागला.

त्यानें एल्सीला विचारलें,

"यांची अन् तुझी ओळख कशी झाली?"

"ती एक फार मोठी हकीगत आहे."

"हे तुझ्याकडे वारंवार येतात काय?"

"नाही. ते फार चतुर आहेत. त्यांच्याविषयीं माझ्या मनांत आदर आणि कृतज्ञता असली तरी प्रेम असणं शक्य नाहीं हें ओळखल्यासारखं ते माझ्याशीं वागतात. आपल्या सहवासाचा ते माझ्यावर जुलूम कधींच करीत नाहीत. दु:खानं अगदीं फारच गांजले म्हणजे ते मला आधीं टेलिफोनमधून विचारतात, अन् मीं 'या' म्हटलं तर येतात."

विलासनें विचारलें,

"दु:खानं गांजून जायला यांना काय झालंय? मीं त्यांचीं पुस्तकं वाचलीं आहेत. सुंदर विचारांनीं, उत्साहानं आणखी आनंदानं तीं भरलीं आहेत."

" हा रे वेड्या ! पुस्तकावरनं का लेखकाच्या खाजगी सुख-दुःखांचा कुठं अदमास करतां येतो ? उलट, मनांतलीं असह्य दुःखं क्षणभर विसरायसाठीं माणूस आपल्या लिहिण्यांत जिकडं तिकडं आशेचं आणि आनंदाचं वातावरण निर्माण करतो म्हणतात, तेंच खरं असेल. जस्टिस व्हाइट्फील्ड दुःखानं फार फार गांजलेले आहेत."

" असं ? "

" हो. त्यांच्या बायकोला वेड लागलेलं आहे, मुलगा अट्टल दारूबाज निघालेला आहे, आपखी मुलगी अपघातांत सांपडून कायमची पांगळी होऊन अंथरुणावर पडलेली आहे. मला त्यांची फार कींव येते."

" अरेरे ! "

असें उद्गारून विलास परत आपल्या खुर्चीवर येऊन बसला.

पण जेवणाचे पदार्थ अत्यंत रुचकर झाले असूनहि त्याला मग जेवण सुचेना.

थोडयाच वेळापूर्वी जस्टिस व्हाइट्फील्डसारख्या विद्वान् आणि कीर्तिमान् वृद्ध गृहस्थानें तरुणालाच शोभेल असा षोक ठेवून एल्सीकडे यावें याचा त्याला चमत्कार वाटला होता. पण, आतां त्याला त्यांत अश्लाघ्य असे काहीं वाटेना. या संसारांत सुखदुःखांची ही विलक्षण गुंतागुंत काय म्हणून असावी, येवढेंच आश्चर्य तो आपल्या मनाशीं करीत राहिला.

जेवण आटपल्यावर एल्सीनें पेटवून दिलेली सिगारेट त्यानें अर्धीमुर्धी ओढली, व मग ती राखेच्या भांड्यांत टाकीत तो म्हणाला,

" अच्छा एल्सी ! Good-night!"

एल्सीनें आश्चर्यानें त्याच्याकडे टवकारून पाहिलें व म्हटलें,

" म्हणजे ! "

" म्हणजे काय ? जातों मी ! Good-night!"

त्यानें पुढें केलेला हात दोन्ही हातांनीं धरून ती म्हणाली,

" छे छे ! मी नाहीं तुला जाऊं देणार !"

" एल्सी, मी राहाणं शक्य नाहीं. उगीच भांडण काढण्यांत काय अर्थ आहे ?"

हें विचारतांना विलासची दृष्टि सहजगत्या जस्टिस व्हाइट-फील्डच्या फोटोकडे गेली.

तें एल्सीच्या लक्षांत आलें, व त्याचा निराळाच अर्थ करून ती म्हणाली,

" आलं माझ्या लक्षांत ! पण विलास, तुझ्या गळ्याशपथ सांगतें, तुझ्याखेरीज माझं खरं मन मीं दुसऱ्या कुणालाहि दिलेलं नाही ! तूं माझ्यावर कधींच अनुरक्त नव्हतास, अन् असण्याचा संभवहि नाहीं हें मला कळतं. पण पूर्वी माझ्याविषयीं जी थोडीशी तरी दया तू दाखवीत होतास, आणखी माझ्या सहवासांत थोडा का होईना जो आनंद मानीत होतास, ती दया आणि नो आनंद तुला आतांशा एकदम कसा वाटेनासा झाला ?"

विलासने तिच्याकडे निरखून पाहिलें, व जणू पुष्कळ बोलायची तयारी केली पाहिजे अशा विचारानें एक खोल श्वास घेऊन म्हटलें,

" एल्सी, माझ्यांत काय बदल झाला आहे तो मला सांगतां यायचा नाहीं. आणखी कितीहि सांगितला तरी कदाचित् तुला— तुलाच काय, कुणालाच— तो समजायचा नाहीं. येवढंच सांगतों, कीं सुखाबद्दलच्या आणि उपभोगाबद्दलच्या माझ्या पूर्वीच्या कल्पना आतां शिल्लक उरलेल्या नाहींत. केवळ विहार करण्यासाठीं पौर्णिमेच्या चंद्रप्रकाशांत ज्या प्रदेशांत आपण हिंडलों, तोच प्रदेश मध्यान्हकालच्या सूर्यतापानं रखरखलेला आपल्या दृष्टीस पडला तर त्या प्रदेशाबद्दलची आपली वृत्ति एकदम पालटणार नाहीं का ? तशीच माझी वृत्ति पालटली आहे असं समज. क्रीडा आणि विलास मला आतां हवेसे वाटत नाहींत, चैन करावी अशीहि इच्छा होत नाहीं, आणखी स्त्रीचा सहवास — एका स्त्रीखेरीज दुसरी स्त्री माझ्या दृष्टीला मुळीं दिसतच नाहीं !"

एल्सीनें त्याच्याकडे कांही वेळ पाहिलें, व मग विचारलें,

" तूं प्रेमांत सांपडला आहेस काय ?"

" होय. अशा स्त्रीच्या प्रेमांत, कीं जिची प्राप्ति मला कधींच व्हायची नाहीं !"

" मग मला दुःखी करून तूं काय मिळवणार ?"

" कांहीच नाहीं. पण तुला सुख देणं मला अशक्य आहे, येवढंच. "

तिनें त्याचा हात पुन्हा धरला व म्हटलें,

" मी तुला पुन्हा कधीं त्रास देणार नाहीं. पण आज मला निराश करूं नकोस !"

विलासनें आपला हात सोडवून घेतला, व म्हटलें,

" एल्सी, तूं माझं ऐकलं नाहीस तर मला तुझा तिटकारा वाटूं लागेल !"

" अन् तूं माझं ऐकलं नाहीस तर मला तुझ्याविषयीं द्वेष वाटूं लागेल ! स्त्रीचा द्वेष फार भयंकर असतो, माहीत असूं दे !'

" माझा तूं द्वेष केलास तर मला वाईट वाटेल; पण माझा त्याला उपाय नाहीं. Good-night!"

असें म्हणून तेथें क्षणभरहि अधिक न थांबतां विलास निघून गेला.

त्यानें आज स्वतःला एक नवीनच शत्रु उत्पन्न केला !

पण, त्याची त्याला क्षिति नव्हती असें दिसलें. आशेवर जडलेलें आपलें मन संमोहांतून वांचवून आपण पवित्र ठेवलें याचा त्याला विलक्षण आनंद झाला होता ! ईश्वराची पूजा करणारा भक्त ईश्वराला ती हवी कीं नको याचा विचार करीत नाहीं; पूजेसाठीं ओंजळीत घेतलेलीं फुलें निष्कलंक, ताजीं, टवटवीत, आणि दंवबिंदूंनीं नुकतींच न्हाऊन निघालेलीं असलीं म्हणजे तो खूप आनंदांत असतो झालें !

---

## प्रकरण १६ वें

---

ज्या दिवशीं तिनें म्हातान्या वॉर्डरबाईजवळ शस्त्र मागितलें त्या दिवसापासून आशेची मनःस्थिति मोठी चमत्कारिकच झाली.

आपल्यावर संकट आलें तर आपल्याजवळ संरक्षणाचें साधन आतां आहे असें समाधान तिच्या मनाला एकीकडे वाटत होतें, पण दुसरीकडे त्या संकटाखेरीज दुसरे कसले विचारच तिच्या मनांत येईनासे झाले होते. तिची कल्पना त्या संकटाशींच सारखा चाळा करूं लागली. जागेपणी तर त्याबद्दलचे विचार तिच्या मनांत पुनःपुन्हा येतच, पण झोंपेंतहि त्या विचारांचेच भ्रमण तिच्या डोक्यांत चालू असे. त्याबद्दलचीच वेडीवांकडीं दृश्यें तिला स्वप्नांत दिसत, आणि मग दर वेळीं दचकून उठून तुरुंगांतल्या त्या भयानक शांततेचा कानोसा घेत ती घटकानुघटका तशीच जागी राही. असें सांगतात कीं, माणसाचें एखादें ऑपरेशन व्हावयाचें ठरलें, कीं तें प्रत्यक्ष होण्यापूर्वीं तें झाल्याचा अगर होत असल्याचा भास त्याला आधीं कितीतरी दिवस सतत होत असतो. आशेची अशीच कांहींशी अवस्था झाली होती.

मात्र, आठ दिवस झाले, पंधरा दिवस झाले, महिना झाला, तरी भार्गवरामाचें अशुभ दर्शन झालें नाहीं तेव्हां तिला विलक्षण विस्मय वाटूं लागला.

आपल्यावरचें संकट कांहीं विलक्षण घटना घडून टळलें म्हणावयाचें कीं काय ? असा कांहींसा हर्षदायक प्रश्न तिच्या मनांत मधून मधून येऊं लागला. पण, स्वतःचें मन त्या प्रश्नाशीं रमूं लागलें, की ती म्हणे, "वेड्या मना, कां उगीच भलत्याच आशेला चिकटतोस ? जगांत संकटं दिसलीं, कीं तीं सहसा टळत नाहींत, तीं दृष्टीआड झालीं तर कुठूनतरी आडमार्गानं येत असतात म्हणून दिसत नाहींत येवढंच !"

अशा स्थितीत काढलेले ते दिवस आशेला अत्यंत तापदायक झाले.

अखेर एके दिवशीं संध्याकाळीं एक ऑर्डर्ली बाई तिच्याकडे आली व म्हणाली,

" तुम्हांला जेलरसाहेबांनीं ताबडतोब बोलावलं आहे. "

आशेच्या हृदयांत धस्स् झालें ! तिनें विचारलें,

" कशाला ?"

" मला काय माहीत ? असतील तशा घेऊन ये, येवढं मला साहेबांनीं सांगितलं. "

" ऑफिसांत जेलरसाहेब एकटेच आहेत का ? "

" नाहीं; आणखी एक साहेब आहेत. "

" कोण, भार्गवराम का ? "

" कोण भार्गवराम ? मला नाहीं माहीत. "

" ते सी. आय्. डी. मधले ? "

" माझ्या ओळखीचे नाहींत. असतीलहि. "

आशेच्या हृदयाची विलक्षण धडपड सुरू झाली.

तिनें खालचा ओंठ चावला, क्षणभर कांहींच उत्तर केलें नाहीं, व मग किंचित् कांपऱ्या आवाजानें म्हटलें,

" मी येत नाहीं म्हणून सांग साहेबांना ! "

ऑर्डर्ली स्त्री अत्यंत विस्मयचकित झाली. ती म्हणाली,

" बाई, कैदी लोक असा जबाब देत नाहींत. साहेब फार रागावतील. माझं ऐका. चला मुकाट्यानं. "

आशेला वाटलें, ही लबाडहि त्या दुष्टांची सांथीदार असली पाहिजे. संतप्त होऊन ती गप्प बसली.

ऑर्डर्ली म्हणाली,

" हं चला, चला बाई. साहेब तुमची वाट पाहात बसले असतील. "

" बसूं देत. मी तिकडं आलें नाहीं याबद्दल मला काय शिक्षा करायची असेल ती करूं दे त्यांना. तुला काय ? तूं जाऊन सांग मी येत नाहीं म्हणून."

ती बाई रागानें तोंडांतल्या तोंडांत कांहींतरी पुटपुटली व निघून गेली.

आशेनें दोन्ही हातांनीं तोंड झांकलें, आणि ती रडूं लागली ! कड्यावरून पाय निसटलेल्या माणसाच्या, गलबतावरून तोल जाऊन अथांग समुद्रांत पडणाऱ्या माणसाच्या, आगींत सांपडल्यावर अक्राळविक्राळ ज्वाळांचें तांडवनृत्य भेदरलेल्या दृष्टीनें पाहाणाऱ्या माणसाच्या— अशा सर्व हृदयविदारक भावना तिनें एकदम अनुभविल्या !

तिच्या मनांत एक कल्पना एकाएकीं आली....

आपल्या कमरेचें तें शस्त्र आपल्या स्वतःच्याच हृदयांत खुपसून घेतलें तर ?....

डोळे तसेच गच्च मिटलेले ठेवून, व डावा हात तसाच कपाळावर दाबलेला ठेवून तिनें उजव्या हातानें कमरेचें शस्त्र चांचपून पाहिलें.

त्याच क्षणीं तिला हांक ऐकूं आली,

" आशा ! "

तो शब्द ऐकतांच सत्याग्रहाच्या वेळी ती मूर्छेतून हलके हलके सावध झाली होती त्या क्षणाचें तिला स्मरण झालें, व एका उंच, सडपातळ, देखण्या पुरुषाच्या हातांत आपण आहोंत असा भासहि झाला.

हा मधुर भास संपण्याच्या आंत आपली जीवज्योति आपल्याला मालवितां आली तर किती छान होईल, अशा विचारानें आशेनें शस्त्राच्या मुठीवरचीं आपलीं बोटें घट्ट आंवळलीं.

तितक्यांत तिला पुन्हा ऐकूं आलें,

" आशा ! आशा ! हें काय ? वर पहा ना. "

आशेनें वर मान करून पाहिलें, व एकदम अमर्याद विस्मयानें ती उद्‌गारली,

" कोण, विलास ?"

" हो, मीच. "

" मी स्वप्नांत आहें का जागी आहें ? "

" स्वप्नाची शंका काय म्हणून ? खरोखरच मी तुमच्यापुढं उभा आहें. "

ज्या वस्तूवर दृष्टीचा विश्वास बसत नाहीं ती चांचपून पाहाण्यासाठीं मनुष्य साहाजिकपणें हात पुढें करतो, त्याप्रमाणें आशेनें केलें.

तिचे ते हात आपल्या हातीं घेऊन व दाबल्यासारखे करून विलासनें हंसत विचारलें,

" आतां तरी खात्री वाटते का ? आहें ना मीच ?"

" हो. "

असें म्हणून आशेनें हात मागें ओढण्यासाठीं हालचाल केली.

पण विलासनें तिला तसें करूं दिलें नाही, तेव्हां अधिक प्रतिकार न करतां तिनें विचारलें,

" पण, तुम्हीं या वेळी इकडं कोणीकड ?"

विलास म्हणाला,

" तुमची तुरुंगांतून सुटका झाली आहे, अन् तुम्हांला न्यायसाठी मी आलों आहें ! "

" माझी सुटका ? तिला तर अजून कितीतरी अवकाश आहे ! ज्या क्षणीं माझं मरण ओढवल्यासारखं मला वाटलं, त्या क्षणीं माझी सुटका झाली म्हणून तुम्ही सांगतां ! माझी सुटका होईल कशी ? "

तिच्या बोलण्यांतील मरणाचा तो उल्लेख विलासला समजला नाहीं. पण, त्याबद्दल खुलासा विचारीत बसण्याची ती वेळ नव्हती. तो म्हणाला,

" खरंच सांगतों, तुमची मुक्तता झाल्याचा हुकूम सुटलेला आहे. चला, तिकडे जेलरच्या ऑफिसांत जाऊं. ते अन् मी तुमची वाट पाहात होतों ! तुमचा विचित्र निरोप कळला म्हणून मी इकडं आलों. खरोखरच तुमची सुटका झाली आहे."

" पण ती कां ? मला कळतच नाहीं."

" तें सगळं मी तुम्हांला नंतर सावकाश सांगतों. किंबहुना तें सांगणं मला भागच आहे !"

त्यानें तें अखेरचें वाक्य कां उच्चारलें तें आशेला समजलें नाहीं.

पण, मग ती अधिक कांहीच बोलली नाहीं, व विलास-बरोबर कोठडीच्या बाहेर पडली.

त्याच वेळीं संध्याकाळींच पूर्वेकडे दिसणारें शुद्ध द्वादशीचें पूर्णप्राय चंद्रबिंब ढगाच्या आडून निघून प्रगट झालें, आणि दोन पक्षी आनंदानें चिवचिव करीत एकमेकांना चिकटून भरारी घेत माथ्यावरून निघून गेले.

---

## प्रकरण १७ वें

---

सरकारी हुकूम मिळवून आशेची मुक्तता करून घेणें जितकें अवघड होतें त्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक अवघड त्यानंतरची गोष्ट होती. ज्या गोष्टीमुळें तातडीनें तिची सुटका करून घेण्याचा प्रयत्न विलासनें केला होता, ती गोष्ट तिच्या कानांवर घालण्यांत विलंब करण्यांत अर्थ नव्हता हें त्याला समजत असूनहि त्या गोष्टीचा आपण तोंडावाटें उच्चार करतांच आशेच्या हृदयाला किती भयंकर वेदना होतील तें त्याच्या पुनःपुन्हा मनांत येत होतें, व वारंवार मनाशीं जुळविलेले शब्दहि त्याच्या ओंठांशीं येऊन परतत होते.

तुरुंगाच्या दाराबाहेर पडतांच तेथें विलासची मोटार उभी असलेली पाहून आशेनें कांहींशा विस्मयानें विचारलें होतें,

" म्हणजे ? मोटार घेऊन आला आहांत ? "

त्यानें उत्तर दिलें होतें,

" शक्य असतं तर विमानच घेऊन आलों असतों. "

किंचित् हंसून ती म्हणाली होती,

" होय ? मग माझी सुटका एखाद्या देवदूतानं केली की काय, असा मघांपासून मला होणारा भास अगदीं सार्थ ठरला असता हो. "

यावर उत्तर देण्याचें जरी त्यानें टाळलें होतें तरी अचानक मुक्तता झाल्यामुळें तिला केवढा आनंद झाला होता, याची त्याला कल्पना आली होती, व जी गोष्ट तिला सांगण्याचें कर्तव्य त्याला आतां करावयाचें होतें, ती सांगण्याचें त्याच्या अधिकच जिवावर आलें होतें.

मोटार सुरू झाल्यानंतर तिनें विचारलें होतें,

" माझी अशी अकल्पित सुटका झाली कशी ? "

पण गाडीचा हँडब्रेक आपण सोडविला आहे कीं नाहीं तें पाहाण्याच्या मिषानें विलासनें खालीं वांकून उत्तर देण्याचें टाळलें होतें.

पांचदहा मिनिटांनीं तिनें पुन्हा विचारलें होतें,

" आपण कुठ चाललों आहोंत ? सांगा ना ? "

यावरहि 'सांगतों' येवढेंच म्हणून विलास स्तब्ध राहिला होता.

मात्र तिसऱ्यांदां जेव्हां तिनें विचारलें,

" हें काय ? तुम्ही बोलत का नाहीं ? तुम्ही अकस्मात् आलांत काय, आणि मला मुक्त करून आपल्याबरोबर घेऊन चाललांत काय, मला कांहींच कळत नाहीं ! "

तेव्हां त्यानें मनाशीं ठरविलें, कीं तिला जें सांगावयाचें आहे तें कितीहि अप्रिय असलें तरी तें आतां सांगून टाकलेंच पाहिजे. त्यानें गाडी रस्त्याच्या कडेला घेऊन थांबवली, व म्हटलें,

" मी आतां जें सांगणार आहें, तें ऐकायसाठीं तुम्हीं आपलं मन अगदीं घट्ट केलं पाहिजे. "

आशा कांहींच बोलली नाहीं, ती फक्त त्याच्याकडे पाहात राहिली.

मोटारच्या आंतल्या बाजूस वेगदर्शक यंत्रावर असलेल्या लहानशा दिव्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला होता. तुरुंगांत जाण्यापूर्वी ती त्याच्या अखेरची दृष्टीस पडली होती, तेव्हांपासून ती पुष्कळच सुकली असल्याचें विलासच्या त्या वेळीं विशेष ध्यानांत आलें. सुंदर चेहऱ्यावर मालिन्य आलेलें-अमलें म्हणजे त्याकडे पाहातांच अंतःकरणाला कसलेंतरी शल्य टोंचल्यावांचून राहात नाहीं. दुःखानुभवानें उदास दिसणारी ती सुंदर चर्या आपण आतां अधिकच मलिन करणार आहोंत, ही कल्पना विलासला

सहन करवेना. मन घट्ट करावयास तिला आपण सांगितलें खरें, पण जें बोलावयाचें तें बोलावयासाठी आपल्यालाच आपलें मन घट्ट करावयास पाहिज असें त्याच्या मनांत आलें.

त्याला तिच्या दृष्टीला दृष्टि देणें अवघड झालें.

बोलण्यासाठीं तो खाकरला, पण स्तब्धच राहिला.

आशेनें विचारलें,

" मन घट्ट केलं पाहिजे असं कां म्हणालांत ? एखादी दुःख-वार्ता तर तुम्हाला सांगायची नाहीं ?"

तिच्याकडे वळून न पाहातां विलासनें म्हटलें,

" होय. दुःखाचीच बातमी सांगायची आहे. म्हणूनच ती ऐकण्यापूर्वी तुम्हीं आपलं सगळं धैर्य एकवटलं पाहिजे. कारण, तुमच्या डोळ्यांतून ओघळणारा एक अश्रु जरी मला दिसला तरी माझ्या अंतःकरणाचं पाणी पाणी होईल."

यावर कांहीं वेळ स्तब्ध राहून, व नंतर एक निःश्वास टाकून आशा म्हणाली,

" ठीक आहे. मी आपलं मन अगदीं घट्ट केलेलं आहे. सांगा. तुम्ही काय सांगणार आहांत त्याची मीं अर्धवट कल्पना केलेलीच आहे. मी या जगांत सर्वथा पोरकी झालें काय ?—"

त्या वेळच्या तिच्या स्वरांत जो कंप होता तो ऐकून आपल्या हृदयांत एखादें तीक्ष्ण शस्त्र शिरल्यासारखें विलासला वाटलें.

तिनें जी कल्पना केली होती, ती खरी नव्हती, असें आश्वासन देण्यासाठी त्यानें झटकन् म्हटलें,

" छे छे, असं नाही. पण, भाऊसाहेब अत्यवस्थ आहेत येवढं खरं. तुम्हांला दुःख होऊं नये म्हणून त्यानीं आपल्या प्रकृतीची खरी हकीगत तुम्हांला कळविली नाही; मला मात्र त्यांनी ती कळविली. मग माझ्या वडिलांच्या मदतीनं सरकारी अधिकाऱ्यांच्या भेटी घेऊन, अन् त्यांचीं मनं वळवून तुमची ताबडतोब सुटका व्हावी असा हुकूम मीं मिळविला, आणि मोटार घेऊन तडक तुमच्याकडे

आलों. भाऊसाहेबांची तब्येत मी स्वत: जाऊन पाहून आलों आहें, त्यावरून तुमची त्यांची भेट होईल याबद्दल मला शंका वाटत नाहीं. मात्र....ती.... अखेरचीच ठरेल कीं काय..."

"काय म्हणतां ? अखेरची ?"

असा उद्गार काढून आशेनें एकदम दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकलें, आणि हुंदका दिला.

आंतल्या आत आंवरून धरलेल्या शोकावेगानें तिचें सुकुमार शरीर गदगदा हाललें.

वाऱ्याचा जोराचा झोत आला, रस्त्यावरच्या झाडांचीं कांहीं वाळलेलीं पानें मोटारच्या टपावर सळसळ आवाज करून निघून गेलीं, लांब कोठेंतरी एक टिटवी ओरडली तिचा कर्कश शब्द हवेंत उठला आणि नाहींसा झाला.

तिचें सात्वन कसें करावें तें विलासला समजेना.

असह्य शोकाचा त्याला आयुष्यांत प्रथमच अनुभव येत होता.

०००　　　०००　　　०००

आणि दुसरे दिवशीं एकीकडे मृत्यु भाऊसाहेबांस इहलोकांतून ओढून नेत असतां दुसरीकडे प्राणापलीकडेहि प्रिय अशा आपल्या कन्येशीं अखेरचे शब्द बोलण्याची त्यांच्या जिवाची जी धडपड चालली होती, ती पाहून तर विलासला प्राणांतिक वेदना झाल्या.

आशा फक्त पुन:पुन्हा 'भाऊ' 'भाऊ' येवढेंच कसेंबसें उद्गारत होती, आणि आपलीं आंसवें पित्याच्या तोंडावर पडूं देत होती. मोठ्या प्रयत्नानें खोकल्याची ढास आंवरून तो वृद्ध पिता म्हणाला,

"आशे, तुझं सारं धैर्य कुठं गेलं ? मी दुखानं का बरं मरतों आहें ? नाहीं. माझ्या अंतकालीं तुझा कढत श्वास माझ्या

गालावर मला लागत असतांना मी दुःख काय म्हणून करीन? हें बघ, मरणाची घटका दोनच माणसांना बिकट वाटते. ज्यांनीं या जगांत दुसऱ्याचे घातपात केले असतील त्यांना, आणखी या संसारी सृष्टीचा ज्यांनीं विलक्षण हव्यास धरला असेल त्यांना. अशा माणसांपैकीं मी आहें का बरं?"

आशेनें त्यांच्या मस्तकावर आपलें मस्तक टेकलें, व तिच्या हुंदक्यांतून फक्त येवढाच उद्‌गार बाहेर पडला,

"नाहीं, नाहीं! पण भाऊ..."

भाऊसाहेबांनीं आपल्या उजव्या हाताचा विळखा तिच्या-भोंवतीं घातला, कांहीं वेळ डोळे घट्ट मिटून धरले, व आंत ओढली जाणारी दृष्टि शक्य तेवढी तिच्या चर्येवर स्थिर करून म्हटलें,

"आशे, मी फार सुखानं मरतों आहे. तुझी आई अशीच सुखानं मेली. प्रत्येकाला या जगाचा निरोप केव्हांतरी घ्यायचाच असतो ना? तो घेतांना आपल्या प्रेमांतलं माणूस डोळ्यांनीं पाहता आलं, 'बरं येतों!' असं म्हणून निघतां आलं, तर त्याहून अधिक मोठं भाग्य दुसरं कोणतं? या विलासनीं तुझी व माझी भेट करविली-"

पुढें बोलण्याऐवजीं त्यांनीं डावा हात पुढें केला, व त्यांची इच्छा ओळखून विलासनें तो झट्‌कन् आपल्या हातांत घेतला.

त्यांना खोकला आला, व त्या वेळचे त्यांचे हाल पाहाणें विलासला कठीण झालें.

खोकल्याची ढास संपल्यावर ते डोळे मिटून इतके स्तब्ध पडले, कीं विलासला भीति वाटली.

पण, कांहीं वेळानें त्यांनीं डोळे उघडले.

त्यांनीं आशेकडे व विलासकडे पाळीपाळीनें पाहिलें. त्यांच्या नेत्रांची शक्ति जवळजवळ लोपली असावी, व जें आपल्याला प्रिय तें आतां आपल्याला दिसत नाहीं याबद्दल मनांतल्या मनांत त्यांना अत्यंत खेद झाला असावा.

त्यांनीं डोळे पुन्हा मिटून घेतले.

नंतर त्यांनी ते उघडले तेव्हां विलासकडे पाहून ते म्हणाले,

"विलास, माझी ही मुलगी अद्वितीय आहे! डोक्यावर संकट घेण्याचं काम आमच्या घराण्यानं आजपर्यंत केलं. हीसुद्धां तेंच करील पण संकटाच्या वेळी प्रेमाचं रक्षण माणसाला मिळालं तर हवं असतं..."

विलासचा हात दाबण्याची इच्छा असल्याप्रमाणें त्यांचीं बोटें थोडीशी हालली. तें विलासला कळलें.

तो कांहीसें बोलणार होता, पण तितक्यांत भाऊसाहेबांना फारच जोराची उबळ आली, व तीच त्या करारी देशभक्ताच्या आयुष्यांतील अखेरची ठरला!

क्षणापूर्वी कन्यशीं धीरोदात्त भाषण करणारा वृद्ध पिता कायमचा नाहीसा झाला! क्षण र्धापूर्वी ज्या नेत्रांतून प्रेमवृष्टि स्रवत होती ते नेत्र कायमचे मिटले! सचेतन देह निमिषार्धांत अचेतन झाला!...

सृष्टींतील सर्वांत मोठें, आणि हृदयाला थक्क करणारें गूढ विलासच्या दृष्टीला प्रथमच दिसलें! त्याने कपाळावर हात ठेवला आणि डोळे मिटून घेतले.

आशेने पित्याच्या मृत शरिराला विळखा घालून जो हंबरडा फोडला तो ऐकण्यापेक्षां आपली श्रवणशक्ति नष्ट झाली तर बरें, असें त्याला वाटलें!

००० ००० ०००

आणि मग पुढें कितीतरी दिवस आशेचा तो दीन स्वर त्याच्या कानांत घुमत होता.

मनुष्याचें मन मोठें चमत्कारिक आहे. भोंवतालच्या व्यक्तींच्या अमुकच गोष्टींचा ठसा आपल्या मनावर विशेषत: कां उठावा, व ती ती व्यक्ति दृष्टीस पडली कीं त्या गोष्टींचीच आठवण मनानें कां करावी, तें कधीं सांगता येणार नाहीं.

प्रथम एका पहांटे ऐकलेला आशेच्या गाण्याचा स्वर, आणि तिच्या पित्याच्या मृत्यूच्या वेळीं तिनें हंबरडा फोडून काढलेला करुण स्वर, या दोहोंची विलासच्या मनांतील आठवण कांहीं केल्या बुजेना; आणि एकान्तांत जिच्या कंठांतील भूपाळीचा उत्साह-वर्धक स्वर आपण ऐकला, तिनेंच का तो दुसरा हृदयविदारक रुदनाचा आर्त स्वर काढला, याचा ज्याप्रमाणें तो मनाशीं विस्मय करी, त्याप्रमाणेंच पित्याच्या मृत्यूच्या वेळीं स्वत:चेंहि जीवित सर्वतोपरी संपल्याच्या निराशेनें जिनें किंकाळी फोडली तीच का आतां कालांतरानें शांत, गंभीर व निश्चयी मुद्रेनें आपल्या जीवित-कर्तव्याची वाट पुढें चालत आहे, असे आशा मुंबईस आल्यावर तो जेव्हां जेव्हा जाऊन तिला भेटे तेव्हा तेव्हा त्याच्या मनांत येई.

कारण, खरोखरच पितृनिधनाचें दु:ख शक्यतों बाहेर न दाखवितां आशेनें आपली देशभक्तीची वाट पूर्ववत् चालण्यास प्रारंभ केला होता.

बंदिखान्यांत असतांना तिच्या विचारसरणींत जी क्रांति झाली होती, तिच्या अनुरोधानें कार्य करण्याची तिची इच्छा होती, आणि तें करण्याच्या कामीं आपल्याकडून दिरंगाई होतां कामा नये, असें तिला वाटत होतें.

विलासनें एकदां तिला सहज सुचविलें, कीं तिनें थोडी विश्रांति घ्यावी; तेव्हां ती म्हणाली,

" तुरुंगांत असतांना मीं विश्रांतीच नाहीं का घेतली ? शिवाय, ज्यांनीं माझ्याबरोबर सत्याग्रह केला ते अजून तुरुंगांतच पडले असतांना मी मात्र आधीं सुटलें याबद्दल मला एक प्रकारची खंत वाटते. आतां जर मीं विश्रांति घेतली तर त्यांच्याशीं द्रोह केल्या-सारखं मला वाटेल. शिवाय आतां तुमच्याकडून सहकार्याची अपेक्षा मला करतां येईल, हें पाहून मला केवढा नवीन उत्साह वाटतो तें मला सांगतां येत नाहीं."

हें बोलतांना तिच्या किंचित् म्लान व गंभीर चेहऱ्यावर जी चमक दिसली, ती अलीकडे दोनतीन वेळां विलासच्या दृष्टीस पडली होती, व आपल्यांत जें परिवर्तन घडलें त्याचा तिला इतका आनंद वाटावा हें पाहून दर वेळीं त्याला समाधान वाटलें होतें.

तो म्हणाला,

" माझ्या सहकार्याला तुम्ही थोडंतरी महत्व देतां हें पाहून मला किती उत्साह वाटतो त्याची तुम्हाला कल्पना नाहीं. नोकरी सोडून परत मुंबईस आल्यापासून तुम्ही, मी आणि शरच्चंद्र मिळून कितीतरी कार्य करायला प्रारंभ केव्हां करूं अशा अधीरतेंत मीं दिवस काढले आहेत."

शरच्चंद्राचें नांव निघतांच आशेनें कांहींशा चिडलेल्या स्वरांत विचारलें,

" पण शरच्चंद्र आपल्याला भेटतील तेव्हां ना ? कांहीं पत्ता लागला का ?"

जो शरच्चंद्र तिच्या प्रेमासाठीं भुकेलेला व दोनअडीच महिने तिच्या दृष्टीसहि पडला नव्हता, त्याजविषयीं विचारतांना तिच्या प्रश्नांत अधीरतेचा तीव्र स्वर असावा हें विलासला साहाजिकच वाटलें.

तो म्हणाला,

" कुठं गेली आहे स्वारी कांहीं पत्ता लागत नाहीं ! पण, आज नाही उद्यां तो येईल यांत शंका कसली ? "

आशा म्हणाली,

" पण त्यांचं हें वागणं मला सहन होत नाहीं. "

प्रियकराच्या भेटीसाठीं उत्सुक झालेल्या आशेला धीर देणें विलासचें कर्तव्य होतें, व तें त्यानें केलें. तो म्हणाला,

" त्याला काय कल्पना तुम्ही तुरुंगांतून अचानक सुटलां आहांत याची ? ती कल्पना त्याला असती तर तुम्हांला भेटण्यांत त्यानं एका पळाचाहि विलंब केला नसता, नाहीं का ? "

०००   ०००   ०००

आणि लगेलरच दोन दिवसांनीं जेव्हां शरच्चंद्र अकस्मात् विलासच्या बंगल्यावर येऊन दाखल झाला, व आशा सुटून आल्याचें त्याला विलासकडून कळलें, तेव्हां तो एक पळभरहि तेथें अधिक थांबला नाहीं.

विलासनें त्याला म्हटलें,

" अरे हो, पण जाशील, येवढी घाई कसली ? इतके दिवस कुठं नाहींसा झाला होतास तें तर सांगशील ?"

पण, शरच्चंद्र जागेवरून उठला होता तो खालीं बसला नाहीं. तो म्हणाला,

" छे छे, आतां एक क्षणभरसुद्धां मला इथं धीर निघायचा नाहीं. आशेला केव्हां एकदां डोळे भरून पाहीन असं मला झालं आहे. "

" अरे, पण चहा तरी घेशील कीं नाहीं ?"

" अंहं. "

" सिगरेट तरी ? "

" छे: !"

" काय रे तुम्हा प्रेमिकांची ही घाई ?"

तें ऐकून शरच्चंद्र हंसला, व नंतर मानेचा हावभाव करीत म्हणाला,

" समजेल हं महाराज. जेव्हां एखादी मुलगी इष्काची तरवार तुझ्या हृदयावर चालवील, अन् मग मनांतल्या मनांत, जागेपणीं, झोंपलेपणीं आशेचा खेळ करीत बसशील तेव्हां समजेल !"

हें म्हणतां म्हणतां शरच्चंद्रानें दरवाजाकडे पावलें टाकलीं व तो अर्धवट धांवतच खालीं गेला तेव्हां तो जिन्याच्या दोनदोन पायऱ्या एकदम उतरून गेला असला पाहिजे, अशी विलासला खात्री वाटली.

तो मनाशीं म्हणाला,

" आशेचा खेळ ?...."

त्या शब्दांचे अनेक अर्थ होण्यासारखे होते असें त्याच्या लक्षांत आलें, व त्यांपैकीं एकेका संभवनीय अर्थाशीं तो त्या दिवशीं पुन:पुन्हा खेळत राहिला.

शरच्चंद्र आशेची भेट घेऊन त्याच्याकडे पुन्हा आला तेव्हां सुद्धां त्याच्या मनाचा तो खेळ संपला नव्हता. त्याच्याशीं बोलतांना देखील प्रथम कांहीं वेळ तो आपल्याच विचारांच्या तंद्रीत होता. शेवटीं शरच्चंद्रानें म्हटलें,

" तूं धड बोलत का नाहींस ? विचार कसला करतो आहेस ? "

" कुठं ? कांहीं नाही ! "

असे उद्गारून विलासनें मान हालविली, व जणूं शरच्चंद्र आपल्याकडे आला आहे याची पुरती जाणीव त्या क्षणीच प्रथम झाल्यासारखी चर्या करून त्यानें विचारलें,

" बरं महाराज, आपली स्वारी इतके दिवस कुठं नाहीशी झाली होती तें सांगा ना ? कुठं गेला होतास ? "

" अरे, कुठं कसलं ? मुंबईचा कंटाळा आला म्हणून गेलों होतों थोडासा प्रवासाला झालं. "

" प्रवासाला ? कुठं ?"

" कानपूरला. "

त्या शहराचें नांव ऐकतांच विलास मनांतल्या मनांत दचकला. एल्सनें सांगितलेल्या गुप्त कटाच्या हकीगतीची त्याला एकदम आठवण झाली. गुप्त कटाच्या संबंधांत कानपूरचें नांव त्यानें वारंवार ऐकलें होतें. त्यानें विचारलें,

" काय म्हणतोस ? कानपूरला गेला होतास ? मग जाण्यापूर्वीं मला भेटला नाहीस ? कांहीं गुप्त कामगिरी होती कीं काय ?"

" गुप्त ? नाहीं बुवा ! माझं जायचं एकदम ठरलं, अन् तिथं गेल्यावर इकडं परत यायचं रोजच मी मनाशीं ठरवीत होतों, म्हणून तुला कळवलं नाहीं झालं. पण काय रे विलास..."

" असा विषय बदलूं नकोस. कां गेला होतास कानपूरला ?"

" अरे, कां कसलं ? कानपूरचे एक दोस्त सहज भेटले. ते म्हणाले, चला, आमचं शहर दाखवितों येत असाल तर. म्हणून गेलों."

" असं का ? या तुझ्या दोस्ताचें नांव तरी काय ? "

" नांव ? विलास, तूं एखाद वेळेस फारच चवकसपणा करतोस. चल, तुझी गाडी काढीत असलास तर काढ. आपण फिरायला जाऊं."

विलासनें त्याच्याकडे क्षणभर अगदीं भेदक नजरेनें पाहिलें, पण मनाशी विचार केला, कीं या वेळीं हा विषय इतकाच सोडलेला बरा.

मात्र, केव्हांतरी शांतपणें तो विषय काढून शरच्चंद्राची कानउघाडणी केलीच पाहिजे असें त्यानें मनाशीं ठरविलें. अत्याचाराचा मार्ग अगदीं चुकीचा होता, असें त्याला स्वतःला वाटत होतें व आशेच्या विचारसरणीत क्रांति घडलेली असली, व सविनय कायदेभंगाखेरीज देशजागृतीचा व देशसेवेचा दुसरा कोणतातरी मार्ग पत्करण्याची आतां तिची तयारी झाली असली, तरी गुप्त कट आणि अत्याचार असल्या गोष्टी तिला केव्हांहि संमत होणें शक्य नव्हतें, हें त्याने तिच्याशी केलेल्या संभाषणावरून त्याला स्पष्ट कळून आलें होतें. शरच्चंद्र असल्या वाममार्गानें जात आहे हें जर आशेला कळलें तर तिला केवढें दुःख होईल....? शरच्चंद्रावरील तिच्या प्रेमाला केवढा धक्का बसेल....?

त्याचें स्वतःचें आशेवर विलक्षण प्रेम होतें, पण म्हणूनच शरच्चंद्रावरील आशेच्या प्रेमांत किंचित्‌हि अंतर पडूं नये अशी त्याच्या मनाला तळमळ वाटत होती !

प्रेमाचे खेळ किती चमत्कारिक असतात !

---

# प्रकरण १८ वें

---

आशा तुरुंगांतून सुटून मुंबईस परत आली आहे ही गोष्ट जसजशी अधिकाधिक लोकांना कळत गेली तसतसें तिच्या डेअरीच्या जागेंत मध्यंतरीं लुप्त झालेलें उत्साहाचें आणि धांदलीचें वातावरण पुन्हा अधिकाधिक प्रमाणांत दिसूं लागलें. त्या भागांतील गरीब लोकांशीं ती नेहमीं अत्यंत ममतेनें वागली होती. त्यांच्या सुखदु:खांची तिनें नेहमीं आपुलकीनें चवकशी केली होती, त्यांपैकीं कितीकांना तरी थोडीफार मदत केली होती, आणि सर्वांनाच सदाचाराच्या व देशभक्तीच्या गोष्टी सांगितल्या होत्या. 'आपल्या आशाबाई परत आल्या की' असें जो तो दुसऱ्याला सांगूं लागला, आणि तिचे वडील वारल्याचें कळतांच वयस्क स्त्रीपुरुष तिच्या समाचाराला येऊं लागले. तरुण मंडळी अंशत: तिचें सांत्वन करण्याच्या हेतूनें, आणि अंशत: तिच्याशीं राजकारणाची चर्चा करण्याच्या हेतूनें येऊं लागली. तिची पूर्वींची सत्याग्रहावरील निष्ठा उडाली आहे हें पाहून तिच्या मित्रमंडळींत जे गांधीभक्त होते ते तिची ती निष्ठा कायम राहावी म्हणून तिच्याशीं तासन्‌तास चर्चा करीत बसूं लागले; व ज्यांचा सत्याग्रहाखेरीज इतर मार्गांवर विश्वास होता ते आतां कदाचित् आशा आपल्याशीं सहकार्य करील अशा आशेनें आपलीं मतें तिच्या गळीं उतरविण्यासाठीं तिच्याशीं वादविवाद करूं लागले.

आशेच्या त्या डेअरीच्या जागेला एखाद्या खलबतखान्याचें स्वरूप प्राप्त झालें.

या खलबतांच्या वेळीं शरच्चंद्र बहुतेक हजर असे, पण विलास न चुकतां हजर असे. किंबहुना, विलास हजर असल्याखेरीज आशा विशेष चर्चा करावयास उत्सुक नसे, आणि चर्चेच्या वेळींहि ती पुन:पुन्हा स्वत:ऐवजीं विलासलाच बोलावयास लावी,

आणि त्याचें बोलणें संपल्यावर त्याविषयीं फक्त आपलें एकमत प्रदर्शित करी, हें पुष्कळांच्या ध्यानांत आलें होतें.

विलासच्या व आशेच्या मतानें एक गोष्ट अगदीं स्पष्ट होती, ती ही कीं, सत्याग्रहाचा मार्ग जरी वर्ज्य मानला तरी राष्ट्रीय सभा ही हिंदुस्थानची सार्वभौम राजकीय संस्था आहे हें विसरता कामा नये, व सत्याग्रह सोडून नव्या मार्गानें जावयाचें झालें तरी ज्यायोगें राष्ट्रीय सभेच्या कार्याशीं आपल्या कार्याचा विरोध येणार नाहीं अशा प्रकारचेंच आपलें धोरण ठेवलें पाहिजे.

मुंबईंत मजुरांची चळवळ करणाऱ्या ज्या व्यक्ति त्या वेळीं होत्या, त्यांपैकीं प्रत्येकाला वाटे, कीं आशा, विलास व शरच्चंद्र हें त्रिकूट आपल्या पक्षांत सामील व्हावें. 'गिरणी कामगार युनि-यन', 'ट्रेड युनियन', 'लाल बावटा युनियन' असे जे निर-निराळे संघ होते, त्यांपैकीं प्रत्येक संघाचे पुढारी आपल्या विशिष्ट धोरणाचें श्रेष्ठत्व आशेला पटविण्याचा प्रयत्न करीत. स्वतःच्या पक्षाचें समर्थन करतां करतां ते इतर सर्व पक्षांना नांवें ठेवीत, त्यांच्या चुका दाखवीत, उखाळ्यापाखाळ्या काढीत, इतरांच्या देशभक्तीविषयीं शंका प्रदर्शित करण्याससुद्धां चुकत नसत.

त्याचें असलें बोलणें आशेला आवडत नसे. ती एकदां म्हणाली,

" असं बोललेलं मला नाहीं आवडत. खरंच नाहीं आवडत. जे आपल्यापेक्षां भिन्न मार्गानं जाऊं पाहातात त्यांचा अनुदार बुद्धीनं धिक्कार करणं योग्य नाहीं, हा राजकारणांतील पहिला धडा आपण शिकला पाहिजे. इतर कोणत्याहि कारणासाठीं नसलं तरी हा धडा हिंदी लोकांना शिकविण्याची खटपट केल्याबद्दल गांधींना आपण सदा मोठंच मानलं पाहिजे. तुम्हीच पाहा, मुंबईंतल्या मुंबईंत कितीतरी लहानमोठीं अशीं युनियन्स आहेत, कीं ज्यांना सर्वांनाच कामगारवर्गाची संघटना करावयाची आहे. या संस्थांचं एकीकरण कां होऊं नये ? प्रत्येक युनियननं सवता सुभा ठेवून

दुसऱ्याचा धिक्कार काय म्हणून करावा ? तुमच्या लाल बावटा युनियनचं इतर संस्थांशीं कां पटूं नये हो ?"

ह्या प्रश्न तिनें ज्या तरुणाला विचारला तो लाल बावटा युनियनचा एक मोठा आधारस्तंभ होता. तो शरिरानें अगदीं कृश, जवळजवळ रक्तक्षय झालेल्या माणसाप्रमाणें फिकट होता. त्याचे डोळे किलकिले होते, गाल बसलेले होते, त्यामुळें आधींच गोबरें असलेलें नाक आणखी मोठें असल्याचा भास होत होता, आणि केंस खूपच वाढलेले आणि कधीहि न विंचरलेले दिसत होते. तो डोक्याला टोपी कधीच घालीत नसे, पण टोपीची लांबट घडी त्याच्या हातांत नेहमीं असे, व बोलतांना ती डाव्या तळहातावर वाजविण्याची त्याला खोड होती.

आशेचा प्रश्न ऐकतांच "बरं झालं विचारलंत. तुम्हांला अगदीं सविस्तरपणें सांगतों..." असा प्रारंभ करून, व टोपीची घडी जोरानें डाव्या तळहातावर वाजवून तिच्या आवाजाच्या तालांत त्यानें एक लांबलचक व्याख्यान झोडलें.

त्या व्याख्यानाचा सारांश असा होता कीं, मार्क्सचे ग्रंथ वाचल्याखेरीज, अथवा न वाचतां त्याचा पुनःपुन्हा आधार देण्याचें धैर्य अंगीं असल्याखेरीज कामगारांची चळवळ हातीं घेण्याचा कोणालाहि अधिकार नव्हता. रशियांत ज्या अर्थी मजुरांचें राज्य प्रस्थापित झाले होते, व ज्या अर्थी तसें राज्य प्रस्थापित झाल्याखेरीज हिंदुस्थान देशाला तरणोपाय नव्हता, त्या अर्थी रशियांत जें झालें तें तें– नव्हे तें तेंच, हिंदुस्थानांत घडलें पाहिजे.

विलासनें मध्येंच विचारलें,

"तें सारं घडलं पाहिजे म्हणतां?"

टोपीचा खाड्‌कन् आवाज करून लाल बावटावाले म्हणाले,

"हो हो, तें सारं."

आशेनें विचारलें,

"रक्तपातसुद्धां !"

" आमच्या बावट्याचा लाल रंग हेंच तुमच्या प्रश्नाचं उत्तर आहे. "

विलास म्हणाला, " रशियानं फडकविलेल्या लाल निशाणाबद्दल तुमचा येवढा अट्टाहास कां हवा ? मला समजत नाहीं ! तें निशाण हातीं न धरतां आम्ही हिंदुस्थानातल्या लोकांनीं आमच्या कामगारांची संघटना केली तर तिला संघटना नाहीं म्हणायच ? आमच्या राष्ट्रीय सभेचं निशाण काय वाईट आहे ? "

टोपीच्या घडीचा पुन्हा फाड्कन् आवाज झाला, व उत्तर आलें.

" त्या निशाणामागं 'बूर्ज्वा मेंटॅलिटी ' आहे. मजुरांची जागतिक संघटना करायला तें निशाण कधींच उपयोगी पडायचं नाहीं. त्या निशाणाखालीं येणाऱ्या लोकांची दृष्टि फक्त हिंदुस्थानापुरती, आणि तीसुद्धां श्रीमंत आणि मध्यम वर्गापुरती संकुचित राहाणार. ध्येयाचा असला संकोच आम्हांला नको आहे. "

" ठीक आहे हो ध्येयाचा विस्तार करा. पण, आपल्या राष्ट्रीय सभेच्या निशाणावर राग कशासाठीं ठेवतां ?"

" ठेवणार. तें निशाण आम्हांला कधींच मान्य व्हायचं नाहीं. आम्हांला चारी खडांतल्या मजुरांचं साम्राज्य स्थापायचं आहे. 'Workers of the world unite!' असं आमच्या गुरूचं ब्रीदवाक्य आहे. "

" पण माझ्या एका शंकेचं समाधान करतां का ?"

" अलबत ! बोला. "

" जगांतल्या सर्व राष्ट्रांतल्या मजुरांचं एकछत्री साम्राज्य स्थापायचं तुम्ही म्हणतां, पण हें ... शक्य आहे का ?"

" कां नाहीं ?"

" इंग्लंडमधील मजूर, जर्मनीमधील मजूर, जपानमधील मजूर, हिंदी मजूर याच्या हितसंबंधाचा विरोध कधींच उत्पन्न

व्हायचा नाहीं ? आज श्रीमंतांचे एकमेकाशीं विरोध येऊन युद्धं होताहेत; उद्यां मजुरांच्या हितसंबंधांचे विरोध उद्‌भवतील आणि युद्धं होतील. मजुरांचं झालं तरी जागतिक साम्राज्य स्थापन होईल, ही कल्पना जरा धाडसाचीच आहे."

"हां, इथंच तर तुम्ही चुकतां." टोपी वाजवून तो उघड्या माथ्याचा तरुण म्हणाला. "अहो, मजुरांचं राज्य कांहीं सध्यांच्या राज्यासारखं व्हायचं नाहीं. त्यांत खाजगी मालमत्ता कुणाचीहि नसणार स्वार्थ ही गोष्टच मुळी उरायची नाहीं. मग तुम्हीच सांगा, विरोध कसले आणखी युद्ध कसली ?"

आशा म्हणाली,

"तुमचं म्हणणं बरोबर असेल, पण तें आम्हांला कळत नाहीं खरं."

पण विलास चटकन म्हणाला,

"कळत नाही का ? यांनाच बुद्धि आहे अन् आम्हांला नाहीं अशांतली गोष्ट आहे कीं काय ? मजुराचा कैवार रशियानं घेतला याबद्दल त्या देशाचं आम्हीं अतिशय कौतुक केलं पाहिजे हें अगदीं कबूल; पण म्हणून रशियानं सांगावं अन् जगानं ऐकावं हा आग्रह काय म्हणून ? निरनिराळ्या राष्ट्रांच्या मजुरांच्या मनात बंधुभाव उत्पन्न करतां आला तर नको कोण म्हणतो आहे ? पण, तो करायसाठीं आमच्या मजुरांनीं 'मे डे' च्या मिरवणुकी काढल्या पाहिजेत, लेनिनच्या नांवाचा जयघोष केला पाहिजे, अन् डोक्यावर उंच धरून लाल बावटाच फडकविला पाहिजे हा निवळ वेडा दुराग्रह आहे."

हें ऐकून आशेला एकदम हंसूं आलें.

व तिचें तें हंसणें ऐकून तो उघड्या माथ्याचा तरुण आपल्या आवडत्या बावट्यापेक्षांहि लाल झाला ! उठून निघून जातां जातां तो म्हणाला,

"तुम्हांला कांहीं अक्कल नाहीं ! तुमच्या हातून कसली देशसेवा होणार !"

चर्चेचा शेवट अशा चिडाचिडींत झाला, कीं आशेला फार खेद होई. मग मंडळी निघून गेल्यावर ती किती वेळ तरी विषण्ण चित्तानें स्वस्थ बसे.

एकदां अशा वेळीं विलास तिला म्हणाला,

"तुम्ही इतक्या खिन्न कां झालांत?"

आशा म्हणाली,

"वादाचं पर्यवसान भांडणांत झालं, कीं मला फार वाईट वाटतं. मनांत येतं, हीं भिन्न मतं, भिन्न स्वभाव, दुराग्रह, हट्ट यांच्या गुंतागुतींतून आपल्या देशाचं राजकारण निघायचं तरी केव्हां अन् कसं? ती आशा नसेलच तर राजकारणाचा नादच सोडून केवळ समाजसुधारणेच्या चळवळीनं शेतकऱ्यांना, मजुरांना, आणि कामकऱ्यांना जेवढे अधिक सुखाचे दिवस प्राप्त करून देतां येतील तेवढ्यांवर समाधान मानावं झालं."

विलास कांहीं बोलला नाहीं. तो किंचित् हंसला अशी आशेला शंका आली म्हणून तिनें विचारलें,

"कां हंसलांत?"

"येवढ्याचसाठीं, कीं फक्त सामाजिक सुधारणेचं कार्य करावं असं तुम्ही म्हणालात, पण त्यांत तरी मतांतरं, दुराग्रह, हट्ट, विरोध होणार नाहीं अशी तुमची खात्री आहे काय?"

आशा बोलली नाहीं; पण तिनें आपल्या जुळविलेल्या ओंठांचा आणि नेत्रांचा जो अभिनय केला त्याचा 'तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं' असा स्पष्ट अर्थ होता, हें विलासला समजलें. तो पुढें म्हणाला,

"अन् शिवाय, समाजकारण आणखी राजकारण हीं दोन क्षेत्रं अलग आहेत असं आपल्याला प्रथम कितीहि वाटलं तरी त्यांत पडून काम करायला लागलं, की समाजसुधारकालाहि अखेर राजकीय चळवळ केल्याशिवाय गत्यंतर उरणार नाहीं. राजकारणाला

त्याला स्पर्श करायचा नसेल तर त्याला प्रत्यक्ष कार्याबद्दल अल्प-संतुष्टता ठेवावी लागेल, अन् उलट ज्या गरिबांचा आपण कैवार घेतों ते पूर्णांशानं सुखी झाले पाहिजेत अशी त्याच्या महत्वाकांक्षेची उडी असेल तर त्याला राजकारणांत पडणं भाग पडेल! असं आपलं मला वाटतं• हो, तुम्ही बोला ना कांहींतरी."

"अंहं, तुम्ही बोलत असलां म्हणजे तेंच ऐकत राहावंसं मला वाटतं."

हें म्हणतांना तिचे ओंठ किंचित् विलग झाले, व तिची दंतमाला थोडीशी दिसली. तिच्या जिव्हणीचे दोन्ही कोपरे किंचित् दबले गेले, व सरल नासिकेखालीं अनपेक्षित भासणारा तिच्या जिव्हणीच्या रेषेचा रुंदपणा विलासच्या लक्षांत आला.

'असं असं' या अर्थी मान हालवून तो म्हणाला,

"उगीच प्रशंसा करण्याचा बायकांचा धर्म असतो म्हणतात!"

"वा! म्हणजे बायकांना कोणतीहि गोष्ट आवडली, कीं त्या स्वत:ची फसवणूक करून घेत असतात असं म्हणणं कीं काय?"

"तसं नाहीं. पण, बायकांना जितक्या गोष्टी मनापासून आवडतात त्यापेक्षां अधिक गोष्टी आवडल्याचा देखावा त्या करतात."

"अन् पुरुषांना काय? कांहीच आवडत नाहीं वाटतं?"

असें विचारून त्याचें उत्तर ऐकण्यासाठीं त्याच्याकडे पाहाण्या-ऐवजीं आशेनें आपल्या वेणीचा लांबसडक पेड पाठीवरून पुढें ओढून घेतला, व त्याच्या टोंकाशीं ती चाळा करूं लागली.

तो तिचा प्रश्न ऐकून व त्या वेळचा तिच्या नेत्रांचा आणि हातांचा चाळा पाहून जें उत्तर विलासच्या ओंठांशीं आलें, तें त्याचें त्यालाच अनुचित वाटलें. आपलें आशेविषयीचें प्रेम एका अवाक्षरानें देखील उघड न करण्याचें व्रत आपल्याला पाळावयाचें आहे, याची त्याला आठवण झाली. तो गप्प बसला.

इतकेंच नव्हे, तर हें गमतीचें व थट्टेचें संभाषण असेंच पुढें चालू राहिल्यास: आपल्या मनाचा तोल संभाळणें आपल्याला अधिक कठीण जाईल अशी भीति वाटून तो उठला, व म्हणाला,

" बरं, मी जातों आतां. "

त्यानें एकाएकीं असें उठावें याचें आश्चर्य वाटून आशा म्हणाली,

" हें काय ? एकदम काय निघालांत ?"

" एकदम ? मी आल्याला तीनचार तास होऊन गेले ! "

" म्हणजे घड्याळाकडंच सारखं लक्ष होतं तर ?"

" वा ! तसं कसं ! उलट त्याचं भान मुळींच न राहिल्या-मुळं चार तास चोरीला गेले. "

" हो हो ! मोठीच चोरी झाली म्हणायची ! कारण, कुणीसं म्हटलं आहे ना, कीं पैशापेक्षां वेळेचं मोल जास्ती आहे ! "

" माझ्या वेळेच येवढं नाहीं; पण तुमच्या वेळेचं महत्व मला ओळखलं पाहिजे. "

" मग तर मुळीच जातां यायचं नाही तुम्हाला. कारण, माझा वेळ केव्हां चांगला जातो अन् केव्हां वाईट जातो हें माझं मलाच काय तें माहीत. मी जेव्हां सांगेन, 'आतां घरी जा', तेव्हांच तुम्हांला जातां येईल– म्हणजे कधीच जातां यायचं नाहीं. "

तिच्या त्या सरळ, मुग्ध, भाबड्या विनोदाचा आपल्या मनानें विपरीत अर्थ करूं नये अशी खबरदारी घेणें विलासला अधिकच कठीण वाटूं लागलें, व तो म्हणाला,

" अरे बाप रे ! आतां पुन्हा इकडं यायचं म्हणजे विचार-पूर्वकच आलं पाहिजे ! बरं जातों हं. खरंच उशीर झाला आहे. "

तेवढ्यांत तो आतां थांबत नाहीं असें पाहून आशा जागेवरून उठून त्याच्याजवळ येऊन उभी राहिली होती. तिनें विचारलें,

" उद्यां लवकरच येणार ना ? वाट पाहायला लावूं नका. "

" नाहीं नाहीं; लवकर येतों. "

असें म्हणून विलास बाहेर पडला, व आपल्या गाडींत बसून मार्गाला लागला.

मात्र, मागें वळून पाहिल्याशिवाय त्याच्यानें राहावलें नाहीं; व आशा दारांत उभी राहून आपल्याकडेच पाहात असल्याचें दिसतांच त्यानें नजर फिरविली !

गाडी चालवितां चालवितां तो स्वतःला फार दोष देत होता, व आशेशीं तो जें जें बोलला तें तें पुनःपुन्हा आठवून त्यांत कांहीं वावगे शद्ब तर नव्हते ना, याची तो छाननी करूं लागला

०००  ०००  ०००

रात्री चांदणें अगदीं टिपूर पडलें होतें.

आशेनें घरांतले सगळे दिवे मालविले, आणि आपल्या खोलींत एका खिडकीशीं खुर्ची ओढून घेऊन ती स्वस्थ विचार करीत बसली.

बाहेर रस्त्यावर बहुतेक सामसूम झाली होती. त्या भागांतल्या बहुतेक राहात्या घरांत अंधार होऊन फक्त त्यांच्या छाया रस्त्यावर पडल्या होत्या. दूर कोंपऱ्यावर चहाचीं एकदोन दुकानें होतीं तेथेंच काय तो दिव्यांचा प्रकाश दिसत होता, व तेथल्या कपबशांचा आवाज मधूनमधून ऐकूं येत होता. चौकापलीकडे मोठा रस्ता होता तेथून जाणाऱ्या ट्रॅमची घरघर व घंटा थांबून थांबून कानांवर येत होती, .व वळण घेणाऱ्या ट्रॅमचा दांडा तारेला घांसला म्हणजे विजेच्या ठिणग्या उठत त्या दिसत होत्या. मधूनच ‘ कुल्पी ’ किंवा ‘ गंडेऽरीऽ ’ असा रस्त्यानें हिंडणाऱ्या फेरीवाल्याचा शद्ब ऐकूं येत होता.

आशा रस्त्याकडील खिडकींत बसलेली असूनहि त्या रस्त्यानें शरच्चंद्र केव्हां आला तें तिला कळलें नाहीं. त्यानें जेव्हां खिडकीखालीं थांबून तिला हांक मारली तेव्हां ती बरीचशी दचकली. तिनें दार उघडलें, व परत खोलींत येऊन दिवा लावला तेव्हां मागोमाग आलेल्या शरच्चंद्राला तिनें विचारलें,

"हें काय? या वेळेस इकडे कुणीकडे?"

"तुझ्याकडे आलों आहें हें दिसत असून कुणीकडे म्हणून काय विचारतेस?"

"तुमचं मराठी फार कच्चं आहे बरं का. अशा वाक्यांत 'कुणीकडं' याचा अर्थ 'कां' असा घ्यायचा असतो."

"कां होय? कां तें काय सांगूं? इकडे आल्याशिवाय राहावेना म्हणून आलों, येवढंच!"

"हें मला कसं खरं वाटेल? तुम्ही तर आतांशा इकडे यायची टाळाटाळ करतां अशी मला शंका यायला लागली आहे."

"मला आतां कंटाळा आला आहे."

"कसला? देशकार्याचा?"

"छे छे!"

"मग माझा?"

"नाहीं."

"मग?"

"तुझ्या या वागण्याचा! हा अनिश्चितपणा मला आतां सहन होत नाहीं."

"कसला अनिश्चितपणा? मी समजलें नाही."

"आशे, समजत असून न समजल्याचं सोंग तूं किती दिवस करणार आहेस?"

तें ऐकतांच आशा मनांतल्या मनात दचकली, पण आपल्या मुद्रेवर तो भाव तिनें दिसूं दिला नाहीं.

ती बोलेल म्हणून काहीं वेळ स्तब्ध राहिलेला शरच्चंद्र पुढें म्हणाला,

"आशे, मीं अनेक वेळां स्पष्टपणानं तुला सांगितलेलं आहे, कीं माझं तुझ्यावर अनिवार प्रेम आहे. माझ्या प्रेमाचा तूं कधीं स्वीकार केला नाहींस; पण कधीं स्पष्ट शब्दांनीं नकारहि दर्शविला

नाहींस. कदाचित् तुझ्यावरच्या प्रेमानं प्रवृत्त होऊन तुझ्या कार्यांत मी तुला सहाय्य करीत आलों हें तूं मनांतल्या मनांत ओळखलं असशील; किंवा कदाचित् आपलं मन माझ्याकडं खरोखर ओढ घेत आहे कीं नाहीं याचा तूं स्वतःशीं अदमास घेत राहिली असशील ! या दोन्ही गोष्टी मला समजत होत्या, अन् म्हणूनच माझं मन मीं आशेंत गुंतवून ठेवलं होतं. निराश झालेलं प्रेमहि आंवरतां येत नाहीं; मग आशेला गुंतलेलं माझं प्रेम दिवसेंदिवस अनावर होत गेलं असलं तर त्याबद्दल तूं मला दोष देशील का? तूं कदाचित् म्हणशील, ज्या आशेवर मीं आजपर्यंत दिवस काढले त्या आशेवरच यापुढंहि राहयला मला काय हरकत आहे? पण मला वाटतं प्रेम जितकं संथ असतं तितकंच उतावळंहि असतं; आणखी जितकं त्यागी तितकंच लोभीहि असतं! किंबहुना, प्रेमाचा लोभ आणि उतावळेपणा प्रथम जितका गुप्त असतो तितकाच कांहीं एका कालमर्यादेनंतर तो प्रगट होतो. मला देशसेवेची हौस आहे; आणखी तुझ्या ठिकाणची तसली हौस पाहूनच मी तुझ्यावर प्रथम अनुरक्त झालों. माझ्याविषयीं तुझ्या मनांत यत्किंचितहि प्रतिकूल विचार येऊं नयेत म्हणून देशसेवेचे तुझे मार्ग तेच माझे मार्ग मीं मानले. त्यासाठीं माझ्या स्वाभाविक वृत्तींशीं जें युद्ध मीं केलं, त्याच्या यातना माझ्या सहकार्यानं तुला होणाऱ्या आनंदांत मी विसरलों! तुझ्यावर मी कांहीं उपकार केले अशा बुद्धीनं हें मी सांगत नाहीं. कदाचित् प्रेमाचा स्वार्थत्याग हा त्याच्या स्वार्थाचाच एक प्रकार असेल! तुझं हृदय जिंकण्याच्या आपमतलबी हेतूनच जें जें मीं आजपर्यंत केलं, तें केलं असेल. मी नाकबूल करीत नाहीं. पण, तुला मी केव्हांतरी वश करीन, ही कल्पना माझ्या सुखाला आणि मनःशांतीला आतां पुरेनाशी झाली आहे. नुसती तुझ्या प्रेमाची आशा यापुढं माझ्या मनाचं समाधान करूं शकणार नाहीं. मला आतां तुझं स्पष्ट अन् प्रत्यक्ष प्रेम हवं आहे. मला तूं हवी आहेस.

आशे, तुझी पूर्ण प्राप्ति झाल्याखेरीज मला आतां कशांतच सौख्य वाटायचं नाहीं.... !"

त्याच्या नजरेला नजर देण्याचें आशेला धैर्य नव्हतें. खालीं मान घालून ती शून्य दृष्टीनें पाहात राहिली होती. त्याच्या भाषणांतील वक्तृत्वानें तिचें अंतःकरण एकीकडे थरारत होतें, आणि दुसरीकडे त्याच्या निस्सीम प्रेमाचा आपल्या अंतःकरणांत किंचित्हि प्रतिध्वनि ऐकूं न आल्यामुळें दयेनें आणि भीतीने तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले होते ! त्याचें प्रेम आज कितीतरी दिवस ती जाणून होती; आणि प्रेमाचें प्रतिदान त्याला देणें आपल्याला अशक्य आहे हें ती ओळखून होती. पण, तिच्या शरिराइतकेंच तिचें अंतःकरण सुकुमार होतें. त्यामुळें नकाराच्या शद्बांनीं त्याचें हृदय घायाळ करण्याचें तिनें नेहमीं टाळलें होतें. तिनें मनाशीं अशी अपेक्षा केली होती, कीं आपल्या मौनाचा योग्य तो अर्थ घेऊन शरच्चंद्र अखेर आपला नाद सोडून देईल. मौन म्हणजे अर्धी संमति हा साधा विचार त्या वेडीला सुचला नव्हता. त्यामुळें शरच्चंद्राचें तें निर्वाणीचें भाषण ऐकून ती दचकली, गांगरली, भ्याली ! काय उत्तर करावें तें तिला सुचेना. भाषेंतले सारे शद्ब ती विसरली; तिच्या जिव्हेंतील सारी शक्ति नष्ट झाली ! खालीं घातलेली मान वर करून शरच्चंद्राकडे पाहाण्याचें देखील तिला धैर्य होईना. अशा विलक्षण मनःस्थितींत अत्यंत कोमल अंतःकरणाची स्त्री जें करील तेंच तिनें केलें.

ती रडूं लागली !

शरच्चंद्रानें हलकेंच तिचा हात धरला, व म्हटलें,

" आशे, हें काय ? माझ्याकडं पाहा ना. "

तिनें मान वर केली; पण तिनें नेत्र मिटलेले होते, आणि अधर दांतांखालीं धरला होता.

तिचा हात दाबून शरच्चंद्र म्हणाला,

" सांग ना ? तुझ्या प्राप्तीची मला कांहीं आशा आहे का ?"

आशेने फक्त सांचलेल्या आंसवांना वाट देण्यासाठीं डोळ्यांची उघडझांक केली

शरच्चंद्रानें पुन्हा विचारलें,

" आशे, सांगतेस का ? तुझ्या एका शब्दावर माझं सारं जीवित अवलंबन आहे ! "

" शरच्चंद्र-- "

येवढेंच उद्गारून व नकारार्थी मान हालवून आशा स्तब्ध झाली व तिनें आपला हात त्याच्या हातांतून काढून घेतला.

००० ००० ०००

शरच्चंद्र आशेच्या घरांतून बाहेर पडला तेव्हां रस्त्यावर अगदीच शुकशुकाट होता. आभाळांत ढगांची गर्दी होऊन दोन घटकापूर्वीचें चांदणें पार नाहीसें झालें होतें, वाऱ्याचे वांकडेतिकडे झोत सुटले होते. सृष्टीचा वसंत ऋतु संपून ग्रीष्माच्या प्रारंभीं पडणाऱ्या आकस्मिक जलधारांची तयारी करणारी महाभूतें धडपडत होती

शरच्चंद्र स्वतःशी म्हणत होता,

" संपलं ! प्रेमाचं सुखस्वप्न संपलं ! आतां जागृति सुरू झाली ! माझ्या अत्याचाराच्या इच्छेला ओढून धरणारा रेशमी धागा तुटला ! आतां मी अन् माझी इच्छा ...माझ्या सर्वनाशाची मला काय आतां पर्वा ! ..."

तितक्यांत त्याच्या अंगावरून वेगानें गेलेल्या डेपोमध्यें परत जाणाऱ्या रिकाम्या ट्रॅमचा वरचा दांडा विजेच्या तारेंतून निखळला. खालच्या रुळांतून तिची कांहीं चाकें एकदम बाहेर आली, आणि ती वांकडीतिकडी होऊन कांहीं अंतर जाऊन धाडकन् जमिनीवर कोसळली !

शरच्चंद्रानें फक्त किंचित् हास्य करून मान हालविली !

---

# प्रकरण १९ वें

नंतरच्या पांचसहा दिवसांत बाह्यतः आनंदी मुद्रा ठेवून आशा वागत होती खरी, परंतु तिच्या अंतःकरणाला यत्किंचितहि स्वस्थता नव्हती.

एक तर देशसेवेचा कोणता नवा मार्ग पत्करावा याबद्दल तिच्या मनाचा निश्चय होईना. निरनिराळ्या पंथांची जी मंडळी तिच्याकडे येऊन आपापल्या मार्गाविषयीं तिचें मत अनुकूल करून घेण्यासाठीं घटकान् घटका वाद करीत त्यांपैकीं कोणाचीच विचारसरणी तिला पूर्णपणें पटेना. सत्याग्रहाच्या मार्गांतील दोष तिला स्वानुभवाने दिसून आले होते; व जणू त्यामुळेंच तिच्या श्रद्धेचा मळचा साधेपणा कमी व चिकित्सेचा शंकेखोरपणा अधिक होऊन प्रत्येक तऱ्हेची विचारसरणी तिला दोषास्पद वाटू लागली होती. राजकारणांत काय किंवा समाजकारणांत काय, सत्ता आणि श्रीमंती हीं एकवटली आहेत, व त्यामुळेंच नाना प्रकारचे अन्याय उद्भवले आहेत, हें तिला विचाराअंतीं स्पष्ट दिसत होतें; व अर्थातच सत्तेचा पुष्कळसा अंश गरिबांच्या हातीं आल्याखेरीज स्वातंत्र्याचा आणि समतेचा प्रश्न सुटणार नाही, याबद्दल तिची खात्री पटत चालली होती. परंतु, गरिबांच्या हातीं सत्ता आली पाहिजे, हें म्हणणें तत्त्वतः जितकें सोपें होतें, तितकेंच ती त्यांच्या हातीं येण्यासाठीं कोणता मार्ग सर्वांत श्रेयस्कर होईल हें ठरविणें कठीण होतें. आणि याच गोष्टीचा आशेच्या मनाला त्रास होत होता. भिन्नभिन्न मार्गांबद्दल सर्वांगीण विचार करण्यांतच ज्यांचें चित्त रमतें, व प्रत्यक्ष कृतीविषयीं ज्यांच्या अंतःकरणांत अधीरता नसते, त्या माणसांना विचारांतच काळ गेला तरी मानसिक कष्ट होत नाहींत. परंतु, अशा माणसांपैकीं आशा नव्हती. प्रत्यक्ष कृतीची आणि कार्यमग्नतेची हौस बाळगण्याचा तिचा स्वभावधर्म होता.

ल्हानपणापासून आतांपर्यंत ही तिची स्वाभाविक हौस पूर्ण व्हावी अशा तऱ्हेनेंच तिचें आयुष्य गेलें होतें. त्यामुळें सध्यांचे अनिश्चिततेचे दिवस तिला सुखाचे वाटेनात.

शिवाय, त्या दिवशीं रात्रीं शरद्शीं जो प्रसंग घडला त्यानें तिच्या मनोव्यथेंत मोठीच भर पडली होती. कारण त्यानंतर आठ दिवस झाले, तरी शरद् तिच्याकडे एकदांहि आला नव्हता. त्याच्याविषयीं तिच्या मनांत प्रणयभावना कधींहि उद्भवलेली नसली तरी तो तिला फार प्रिय होता. किंबहुना, तो आपल्याला इतका आवडत असूनहि त्याच्याविषयीं तारुण्यसुलभ प्रीति आपल्या अंतःकरणात कां नसावी, याविषयीं स्वतःशींच आश्चर्य करण्यांत एकांतांतील किती तरी घटका तिनें घालविल्या होत्या. त्याचा पराक्रम, त्याची साहसी वृत्ति, आणि त्याच्या स्वभावांतील औदार्य व मोकळेपणा तिला अतिशय प्रिय वाटत असे; इतकेंच नव्हे, तर अंगच्या साहसी वृत्तीमुळे शरद् स्वतःवर एखाद संकट ओढवून घेईल की काय या कल्पनेनें तिचें अंतःकरण जेव्हां जेव्हां भयभीत होत असे, तेव्हां तेव्हां आपण त्याचें रक्षण केलें पाहिजे असा निश्चय ती मनाशीं करीत असे. अशा वेळीं तिला वाटे, शरद्ला दुःखापासून सुरक्षित ठेवण्याची तीव्र इच्छा आपल्या हृदयांत असतांना त्याला हवें तें सुख देण्याची इच्छा मात्र आपल्या मनांत यत्किंचितहि नसावी हे केवढें आश्चर्य! कां कोणाचा तरी प्रतिपाळ करण्याची, कोणावर तरी मातृप्रेमाचा वर्षाव करण्याची अनिवार प्रेरणा येवढीच काय ती स्त्रीधर्मांतील मुख्य गोष्ट आहे? पत्नीधर्माच्या अगोदरच मातृधर्म स्त्रीच्या ठिकाणीं उद्भवतो? प्रणयाच्या अनुभवावांचूनहि वात्सल्याचा अनुभव घ्यावा असें स्त्रीला वाटतें? विद्वान तर म्हणतात, कीं प्रणयावांचून स्त्रीचें जीवित पूर्ण होत नाहीं! तें खरें, कीं वात्सल्यावांचून स्त्री जगूं शकत नाहीं हें खरें? कीं अपत्याला जन्म दिल्यानंतर ज्या वात्सल्यधारा स्त्रीच्या वक्षःस्थलांतूनच स्रवतात

त्याच खऱ्या दुग्धधारा, आणि त्यांवांचूनच प्रकट होणाऱ्या वात्सल्याला जलधाराच म्हणावयाचें ?......

या प्रश्नांचा आशेला कधींहि उलगडा करतां आला नव्हता. परंतु, शरद्‌विषयीं वात्सल्यासारखें प्रेम आपल्या अंतःकरणांत कांठोकांठ भरलेले आहे याविषयी तिला शंका नव्हती. म्हणूनच त्याला दुखविण्याचें तिला कधीहि धैर्य झालें नव्हतें; आणि म्हणूनच अखेर त्या दिवशीं रात्री त्याला दुखविणें जेव्हां तिला भाग पडलें तेव्हां त्याच्या अंतःकरणाला कदाचित् झाल्या नसतील इतक्या यातना तिला स्वतःला झाल्या.

आणि शरद् त्यानंतरच्या आठ दिवसांत एकदांहि तिच्याकडे आला नाहीं हें पाहून तर आपलें दुःख कसें आंवरावें तें तिला समजेना. एरवींचें सामान्य दुःख मनुष्य कसेंतरी सोसूं शकतो; परंतु प्रिय व्यक्तीला दुःख दिल्याचें दुःख जेव्हां मनुष्याला होतें तेव्हां तें सहन करणें फार कठिण असतें.

आशेसारख्या अत्यंत कोमल हृदयाच्या मुलीला तर तें सहन करणें शक्यच नसतें. तिनें तें कितीहि लपविलें तरी सूक्ष्मपणें पहाणाऱ्याच्या नजरेंत तें आल्यावांचून रहात नाहीं.

विलास आशेकडे किती सूक्ष्म नजरेनें पहात होता याची आशेला कल्पना नव्हती. त्यामुळें एके दिवशीं त्यानें जेव्हां तिच्या गुप्त दुःखाबद्दल सूचक प्रश्न विचारला तेव्हां आपल्याला कोणी तरी एकदम पकडलें असें तिला वाटले,

त्यानें विचारलें,

" आतांशा हवा कां अशी बिघडली आहे ? "

तिनें भोळेपणानें म्हटलें

" आतां पावसाळा सुरू झाला नाहीं का ? "

" पण पाण्याचे डाग गालावर कसे दिसतात ? प्रत्यक्ष वृष्टि झालेली जरी माणसानं लपवली, तरी तिचे ओघळ कांहीं दिसल्या-

वांचून रहात नाहींत ! काय झाल आहे आताशा ? मला सांगण्या-सारखं आहे का ? "

या प्रश्नानें ती एकदम चमकली व म्हणाली,

"कुठं ? मला काय झालं आहे ?"

तिनें हंसण्याचा प्रयत्न केला. तिच्या चेहऱ्यावर एकदम प्रकाश दिसू लागला. पण तो अंधुक होता.

तिच्या चेहऱ्यावरील छायाप्रकाशाच्या त्या खेळाकडे पाहाणे विलासला नेहमी जरी सुखाचें वाटत असे, तरी या वेळीं वाटलें नाही. पण तिच्या चेहऱ्यावरची त्याची नजर हालली नाहीं, व त्यामुळें गोंधळून जाऊन नजर खाली वळवून आशा पुन्हा म्हणाली,

"खरंच, मला कुठं काय झालं आहे ?"

"मला सांगायचं नसेल तर माझा आग्रह नाहीं; पण दुःख दुसऱ्याला सांगितलं म्हणजे कमी होतं म्हणतात."

"ते झालं सामान्य दुःखाबद्दल !"

"म्हणजे तुम्हांला कांही तरी दुःख होत आहे, इतकंच नाही, तर ते असामान्य आहे, अशी दुहेरी कबूली दिलीस कीं !"

ती भोळेपणानें कशी पकडली गेली या कल्पनेनें विलासने किंचित् हास्य केलें. आपण सहज फसलों हें मनांत येतांच त्या मनःस्थितींतहि आशा थोडीशी हंसली, व क्षणभर थांबून म्हणाली,

"माणसानं शब्दांचे सरळ अर्थ करावे बाई."

"अन् माणसानं आपल्याला कांही होत असेल तर नीट सांगावं बुवा !"

आपल्याच वाक्याची झालेली ही नक्कल ऐकून आशेला आणखीच हंसू आलें, व ती म्हणाली,

"पुरे पुरे. खरंच सांगते, मला कांही झालं नाही."

यावर विलासनें ओळखले, कीं तिला अधिक आग्रहानें विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून तो स्तब्ध राहिला.

जरा वेळानें त्यानें म्हटलें,

" शरद् आज आठ दिवसांत दिसला नाहीं. कुठं नाहींसा झाला आहे ?"

वास्तविक हा प्रश्न त्याने अगदीं सहज म्हणून केला होता; पण तो ऐकतांच आशेला एकदम वाटलें, आपल्या दुःखाचा व शरद्‌चा संबंध असल्याचें यांनीं कसें ओळखलें ? ती एकदम गोरी-मोरी झाली. विलास म्हणाला,

" मला वाटतं, आतांशा त्याची अन् माझी वेळ जुळत नाही. कां मुळींच आला नाही ? लहरी आहे. "

आशेचे ओठ एकमेकाला चिकटून राहिले; पण तिच्या पापण्या थरथरल्या. विलासच्या मनांत एकदम एक कल्पना येऊन त्यानें म्हटलें,

" हो, असंच दिसतंय्. शरद्‌ची आणखी तुमची आठ दिवसांत भेट झालेली नाहीं; आणखी म्हणूनच तुम्ही अशा सारख्या मनांतल्या मनांत उदास आहांत. हो ना ?"

आशेनें कांहींच उत्तर केलें नाहीं. तिनें मानदेखील हालविली नाही. फक्त तिने आवंडा गिळला, व मान किंचित् फिरविली, त्यामुळें तिच्या कंठस्थलाच्या खळगीची मोहक हालचाल झाली.

आपला तर्क बरोबर आहे असें वाटून विलास म्हणाला,

" शरद् मोठा विचित्र आहे ! आतां माझी त्याची भेट झाली की या लहरीपणाबद्दल मी त्याची खचित कानउघाडणी करीन. हात धरून त्याला इथं आणीन अन् अपराधाचं प्रायश्चित्त म्हणून सांगेन, की इथं तुमच्याजवळ सतत आठ दिवस त्यानं बसलं पाहिजे. मग तर झालं ?"

तो असें बोलला याचें कारण शरद्‌चें व आशेचें कांहीतरी प्रेमाचें भांडण झालें असले पाहिजे अशी त्यानें कल्पना केली होती. त्याचें तें बोलणें ऐकून आशा म्हणाली,

" तुम्ही इतकं केल्यावर मग आणखी काय पाहिजे ?"

त्यामुळें त्याची ती कल्पना अधिकच दृढ झाली, व तो घरीं जावयास निघाला तो मनाशी असा निश्चय करूनच, कीं शरद् भेटल्याबरोबर त्याला आशेकडे आणून त्याचा व आशेचा तात्पुरता प्रेमकलह मिटवून टाकावयाचा.

आपल्या गाडींत तो मनाशीं म्हणत होता,

"हा शरद् अगदीच अरसिक आहे ! आशेसारख्या असामान्य मुलीवर प्रेमाचा वर्षाव किती केला पाहिजे हें याला कसं कळत नाहीं ? राज्याप्रमाणच प्रेम एक वेळ मिळवणं सोपं, पण राखणं कठिण असतं ......"

००० ००० ०००

परंतु शरद्‌ला आशेवर प्रेम कसें करावें तें शिकविण्याचे बेत मनाशीं करणाऱ्या विलासला पुढच्या तीन दिवसांत शरद् तर भेटला नाहीच, पण त्याला स्वतःलाहि आशेकडे जातां आलें नाहीं.

कारण, तो घरीं येतांच सुदेष्णाबाई त्याच्या खोलींत येऊन त्याला म्हणाल्या,

"विलास, तुला कळलं का ?"

"काय ?"

"बाबासाहेब सुनेत्राला घेऊन छिंदवाड्याला जात आहेत."

"म्हणजे ? आठ दिवसांपूर्वी मी गेलों होतों तेव्हां ते कांहीं बोलले नाहीत"

"तेव्हां कसं बोलतील ? काल तर मुळीं त्यांना डॉक्टरांनीं सांगितलं"

"काय सांगितलं ?"

"सुनेत्राला कुठं तरी हवेच्या ठिकाणी ताबडतोब नेलं पाहिजे"

"असं ?"

असें उद्गारून अंगांतून काढलेला कोट नीट ठेवण्यासाठी विलास वळला. 'वास्तविक, आईनें सांगितलेली बातमी ऐकून त्याच्या चर्येवर खेदाची गाढ छटा आली होती; परंतु, सुदेष्णाबाईंना वाटलें, कीं त्याच्या मनावर कांहीच परिणाम झाला नाहीं सुनेत्राच्या बिघडलेल्या प्रकृतीविषयीं त्यानें जें औदासिन्य नेहमीं दाखविलें होतें, त्याचीच कल्पना या वेळींहि त्यांनीं केली. विलासचें आशेवरील प्रेम त्यांना माहीत नव्हतें, व त्या प्रेमामुळें त्याच्या मनांत कांहींशी क्रांति घडून सुनेत्राविषयीं जी करुणा निर्माण झाली होती तिचीहि त्यांना कल्पना नव्हती.

म्हणून कांहीं वेळ स्तब्ध बसून त्या म्हणाल्या,

"विलास–"

त्यांच्याकडे वळून विलासनें म्हटले,

"आई तूं काय बोलणार आहेस मला माहीत आहे. मी जेवण आटपल्याबरोबर सुनेत्राच्या समाचाराला जाईन."

"खरंच म्हणतोस ?"

असें विचारतांना त्यांच्या चेहऱ्यावर केवढा तरी आनंद दिसला. तो विलासच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं, आणि त्या गोष्टीचें, त्या वेळींहि. त्याला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. त्याच्या मनांत आलें, सुनेत्राकडे जाण्याविषयीं आपण दाखविलेली येवढीशी उत्सुकता आपल्या आईला इतकी आनंदित करूं शकते ?...

मग आपण सुनेत्राविषयीं किंचित् जरी प्रीति दाखवूं शकलों असतों तर आपल्या आईला केवढा आनंद झाला असता '...

असता !

पण, तें शक्य कोठें होतें ? दुसरी व्यक्ति आपल्या वागण्यानें सुखी व्हावी असें मनःपूर्वक वाटत असूनहि, व तिला सुख देण्याचा मार्ग स्पष्ट दिसत असूनहि त्या मार्गानें जाणें अशक्य असावें ? काय ही भावनांची गुंतागुंत !....

तो रात्रीं सुनेत्राच्या घरीं पोंचला तेव्हांहि विलासच्या मनांत हे व अशा प्रकारचेच विचार चालू होते.

त्याला पहातांच सुनेत्राचे वडील बाबासाहेब म्हणाले,

"या या सुनेत्राचा आतां जरा डोळा लागला आहे म्हणून मी इथं व्हरांड्यांत पडलों होतों. बसा इथंच जरा. हं, काय? राजकारण काय म्हणतं आहे आता?"

खुर्चीवर बसल्यावर विलासनें खिशांतून सिगरेट काढली होती. तेव्हां काड्याची पेटी वाजवीत तो म्हणाला,

"थांबा, पेटवून सांगतों!"

पण बाबासाहेबांना कोठला धीर निघायला? त्यांनी एकदम संभाषणांत-- किंवा खरें म्हणावयाचें म्हणजे भाषणांत-- उडी घेत-लीच! ते म्हणाले,

"तुम्ही कशाला सांगायला पाहिजे? गांधीच्या चळवळीचं वाटोळं झालं ते दिसतंच आहे. मी पहिल्यापासून तुम्हांला सांगत नव्हतों, कीं गांधींच्या या बहिष्काराच्या कार्यक्रमामुळं राजकार-णाचा सगळा खेळखंडोबा होणार? त्याप्रमाणं होत आहे बघा! तीन बहिष्कारांपैकीं शाळा-कॉलिजांवरचा बहिष्कार तर आतां मागं घेतलाच गांधींनीं. आतां आस्ते आस्ते उरलेल्या दोन बहि-ष्कारांचं सुद्धां असंच दिवाळं वाजायचं आहे! अन् तें वाजवून सुद्धां गांधी माझं नाक वर म्हणणार हें मी सांगून ठेवतों! अहो, बोलून चालून दिवाळी वाजवून सवकून शेअर बाजारांत 'केम छो' म्हणून सावकारांना नमस्कार करीत ऐटीनं हिंडणाऱ्या बनियांच्या जातींतला हा गांधी. आजच्या 'लीडर'मध्ये चिंतामणीनं असा खर-पूस समाचार घेतला आहे, कांहीं विचारूं नका. आपण तर खूष झालों अग्रलेख वाचून. बाकी, हे मवाळ तरी, मी म्हणतो, दीड शहाणेच! गांधीनं कॉंग्रेस जिंकली तेव्हां बसले बांगड्या भरून, अन् आतां मोडताहेत बोटं त्यांच्या नांवानं"

बिलासनें एक मोठी जांभई दिली, आणि बोटें मोडलीं. तो म्हणाला,

" बाबासाहेब, मला वाटतं वर्तमानपत्रांचं वाचन तुम्हीं अजि-बात बंद केलं तर तुम्हाला सुखाचं होईल. "

" म्हणजे कसं म्हणतां ?"

" अहो, तुम्ही आपल्या जिवाला किती शीण करून घेतां या वाचनानं ! राजकारणांत पडलेले, आणखी न पडलेले सगळेच लोक मूर्ख असल्याकारणानं मूर्खपणाच्या कृत्यांखेरीज दुसरी कसलीच बातमी मिळत नाहीं तुम्हांला वाचायला. अन् मग तुमच्या प्रेमळ मनाला देशाबद्दल हळहळ वाटते, आणखी तुमच्या जीवाला साहजिक त्रास होतो. मला वाटतं, आतां छिंदवाड्याला गेलांत म्हणजे सुनेत्रापेक्षां तुमचंच वजन भराभर वाढेल. कारण, तिथं वर्तमानपत्रं कांहीं फारशीं मिळायचीं नाहींत-"

" छे छे छे छे, ती व्यवस्था मीं अगदी पक्की केली आहे. सगळी वर्तमानपत्रं तिथं मला बिनचूक मिळतील. "

" होय का ?"

असें म्हणून विलासनें कपाळावरचा घाम पुसला.

बाबासाहेब म्हणाले,

" हें पहा विलास, आतां येत्या कॉंग्रेसमधे काय होणार ते मी तुम्हांला आत्तांच सांगून ठेवतों. तुम्ही आतांशा राजकारणांत लक्ष घालायला लागलां आहांत, म्हणून ऐकून ठेवा. ऐकूनच नाहीं, कागदावर लिहून ठेवा ना. "

हें बोलतां बोलतां त्यांनीं टेबलाचा खण उघडला, तेव्हां विलासला वाटले, आतां त्यांतून कागद-पेन्सिल निघणार !

पण तितक्यांत आंतून निरोप आला, कीं विलासचा आवाज ऐकून सुनेत्रा जागी झाली आहे, व तो अजून कां आंत येत नाही म्हणून विचारते आहे.

आंतल्या खोलींत प्रकाश अगदी कमी होता. मागच्या खिडक्या लावून घेतलेल्या होत्या. कोठें तरी उदबत्ती लावलेली होती, तिचा

वास दरवळला होता. भिंतीवर घड्याळ होतें, त्यांत अर्ध्या तासाचा ठोका पडला, त्याचा आवाज कांहीं वेळ घुमत राहिला. सुनेत्राच्या बिछान्याजवळच्या खुर्चीवर बसण्यापूर्वी विलास उभ्याउभ्याच वांकला व तिला म्हणाला,

"तुला झोंप लागली होती ?"

ती कांहीं बोलली नाहीं. तिनें फक्त आपला डावा हात उचलून वर केला, व तो त्यानें आपल्या हातीं घ्यावा अशा आर्जवाच्या अभिप्रायाची चर्या केली.

विलासनें तिचा पंजा हातांत धरला. व त्यावरून आपला उजवा हात फिरविला.

सुनेत्राची आई उशागती उभी होती, तिच्याकडे नजर करून सुनेत्रा म्हणाली,

"तुम्ही कुणीच जरा वेळ इकडं येऊं नका."

आई तेथून निघून गेल्यावर सुनेत्रानें विलासकडे पाहिलें त्या अंधुक प्रकाशांत त्याचें तोंड तिला नीट दिसेना, म्हणून ती त्याला म्हणाली,

"तेवढं बटन दाबून दिवा लावा."

"पण तुला दिव्याचा त्रास होतो ना ?"

"त्रास ? छे ! तुम्हांला अगदीं खूप न्याहाळून घ्यायचं आहे मला."

दिव्याचा झगझगीत प्रकाश पडल्यावर ती विलासकडे टक लावून पहात राहिली.

ती पुष्कळच कृश झाली होती. पण, त्या क्षणीं तिच्या चेहऱ्यावर कसल्या तरी आनंदाची छटा येऊन तिचा एरवींचा फिकट चेहरा प्रफुल्लित दिसत होता.

ती म्हणाली,

"मी आतां जाणार !"

" हो, कळलं मला "

" आतां मी परत येणार नाहीं ! "

" तें कां ? तिकडे तुला लवकर बरं वाटेल, आणखी मग तुम्ही सगळींच परत याल. "

" मला नाहीं वाटत. आतां मी जाणार म्हणजे कायमचीच जाणार ! डॉक्टर जरी स्पष्ट सांगत नसले, तरी माझं मला समजत नाहीं का ? "

" छे ! असं वेड्यासारखं बोलतं काय कुणी ? "

पण, जणुं त्यानें तिला प्रतिपादिलें नाहींच, अशा आविर्भावानें ती म्हणाली,

" म्हणून जाण्यापूर्वीं तुम्हांला एकदां खूप खूप पाहून घ्यायचं आहे. पुनर्जन्म आहे कीं नाहीं कुणास ठाऊक ? पण असला तर कित्येक जन्मपर्यंत माझ्या दृष्टीला तुम्हीं दिसावं, म्हणून आता डोळे झांकण्यापूर्वीं तुमच्या दर्शनानं मी माझी दृष्टि भरून घेणार आहें. आणखी तुमचा हा स्पर्श अगदीं पक्का पक्का लक्षांत ठेवणार आहें. "

विलासनें तिच्या कपाळावर हात टेकला व म्हटलें,

" असल्या बोलण्यानं तुला त्रास होईल ना बरं. स्वस्थ पड. "

" छे छे. असं बोलण्याचच काय तें सुख मला आतां या आयुष्यांत अखरचं मिळवतां येईल ! या दुखण्यांत स्वस्थ एकटं पडून पडून मी मनाशीं फार विचार केला आहे. तुमचं प्रेम मीं कां जिंकू शकलें नाही ते आतां माझ्या ध्यानांत आलं आहे. पण आतां फार उशीर झाला ! मनाची आणि जनाचीं जी अनेक बंधनं मान्य करून मीं तुम्हांला माझ्या हातून जाऊं दिलं तीं किती व्यर्थ होतीं, आणखी त्यांच्या निरगांठी सहन करीत, माझं तुमच्याविषयींचं प्रेम कांचून टाकून ते तुम्हांला नीरस वाटेल अशी त्याची अवस्था मी माझ्या हातानंच कशी केली, हें मला आतां पुरतं कळलं आहे. पण आतां

फार उशीर झाला ! तुमची टेनिसची मॅच असावी, मी पहिल्या रांगेतल्या खुर्चीवर बसावं, आणखी प्रत्येक चेंडूच्या वेळीं खिशांतला रुमाल काढून तुमच्या विजयाचं अन् माझ्या प्रेमाचं निशाण मी निर्भयपणानं फडकवावं, असं मला आतां वाटतं. पण आतां फार उशीर झाला !........"

पुढें बोलण्याऐवजीं तिचे ओंठच नुसते थरथर हालले, आणि अंत:करणांतील भावनांच्या भारानें एक निःश्वास सोडून तिनें डोळे झांकून घेतले.

विलास तिच्या चेहऱ्याकडे पहात राहिला.

किती अल्पावकाशांत तिचें शरीर खंगून गेलें होतें ! केवळ मानसिक निराशेखेरीज तिला दुसरें कांहींहि होत नव्हतें याविषयीं थोड्याच दिवसांपूर्वी त्याची खात्री होती. तिच्या शरिरांत कोणतीहि विकृति नसल्याचें तिच्या डॉक्टरांनीं त्याला अगदीं निश्चयपूर्वक सांगितलें होतें. पण, आता त्याच डॉक्टरांनीं रक्तक्षयाचें निदान करून तिला चांगल्या हवेंत नेण्याचा आग्रहाचा सल्ला दिला होता. पूर्वी केवळ मनाला पोखरणारी तिची व्यथा आतां शारीरिक व्याधि होऊन बसली होती. मनाचा आणि शरिराचा इतका निकट संबंध आहे ? माणसाचें हें मन आहे तरी कोठें ? शरिरांत तर कोठेंच नाहीं ! का देहाच्या अणुरेणूंत आहे ?.... देहाच्या एखाद्या अवयवाप्रमाणें हें मन धरतां येईल, हात उचलून ठेवावा त्याप्रमाणें तें हवें तेथें ठेवतां येईल, देतां घेतां येईल, गुंतवितां येईल, तर संसारांतील किती तरी दुःख कमी होईल ?...."

आजारी माणसाचा हात हातीं धरून बसल्या क्षणीं आपल्या मनांत हे असे विचार यावेत, याचा विलासला चमत्कार वाटला ! आभाळांत उंच गेलेला पतंग दोरी भराभर ओढून परत आणावा त्याप्रमाणें त्यानें आपलें चित्त ओढून जवळ आणलें. सुनेत्राच्या हातांतील सोन्याची बांगडी खालीं कोंपरापर्यंत गळली होती, ती वर सरकवून तो म्हणाला,

"डॉक्टर वाटतं म्हणत होते, कीं छिंदवाड्याच्या हवेंत तुला फार लवकर आराम वाटेल."

"डॉक्टर तसं कां सांगतात मला माहीत आहे. आजपर्यंत मीं माझी स्वतःची फसवणूक केली; आतां तुम्हीं सगळींजणं माझी फसवणूक करतां आहांत. पण, मी आतां सारं ओळखून आहें. ही पाहिलीत, तुम्हीं वर सरकवलेली बांगडी पुन्हा खालीं गळली?"

विलासनें ती पुन्हा वर केली, व आपल्या बोटांनीं धरून ठेवली, तेव्हां सुनेत्रा म्हणाली,

"कशाला हवा आहे तो प्रयत्न? कुणीं आतां मला जगवावं असंहि मला वाटत नाहीं. पत्त्याचा एक खेळ तुम्हांला माहीत आहे ना? त्यांत हवं तें पान वेळेवर निघालं नाहीं, कीं डाव मोडून टाकणंच भाग असतं. माझ्या आयुष्याचा डाव आतां सांवरणं शक्य नाहीं! त्याचं दुःखहि मला आतां वाटेनासं झालं आहे. आतां फक्त उरलेल्या या दोन दिवसांत तुम्ही माझ्याजवळ सारखे बसा म्हणजे झालं."

तिचे ते अखेरचे शद्ब विलासला अत्यंत कारुण्यपूर्ण वाटले.

या मुलीनें आपल्यावर वृथा प्रेम करून स्वतःची काय ही अवस्था करून घेतली! जें तिनें केलें, त्यांत सर्वस्वीं तिचीच चूक होती खरी!....

पण आपली चूक मुळीच नव्हती काय?....

प्रेम मिळत असून त्याचा स्वीकार न करणें ही चूक ठरेल काय?....

चूक म्हणजे काय याचा अतिविचार करणें हीच कदाचित् चूक असेल!

असें मनांत येऊन विलासनें सुनेत्राच्या मस्तकावर पुन्हा हात फिरविला, व म्हटलें,

"बसेन हं. मी तुझ्याजवळ सारखा बसेन!"

" नुसतं बसून उपयोगी नाहीं. सारख बोललं पाहिजे."

" पण तुला कसं बोलवेल ?"

" मी नाहींच बोलणार; मी नुसतं ऐकणार."

" बरं बरं."

असें म्हणून विलास हंसला, व सुनेत्राच्या क्षीण मुद्रेवरहि हास्य प्रगट झालें.

००० ००० ०००

विलासनें आपलें वचन पाळलें. तो सुनेत्राजवळ तीन दिवस सतत बसून राहिला.

तिला पोंचवावयास तो स्टेशनवरहि गेला, व गाडी सुटेपर्यंत तिच्याजवळ बसून राहिला.

ती त्याच्याशीं क्वचितच बोलत होती, पण तिची दृष्टि मात्र सारखी त्याच्याकडे लागून राहिली होती. त्या दृष्टींत आनंदाबरोबरच कधीं न शमणाऱ्या अशा विलक्षण भुकेची उदास आतुरता विलासला स्पष्ट दिसत होती.

मध्येंच तो म्हणाला,

" मीं बाबासाहेबांना बजावलं आहे, तुझ्या प्रकृतीबद्दल दर दोनचार दिवसांनी मला पत्र येऊं दे म्हणून."

पण त्याबद्दल बोलण्याऐवजीं तिनें फक्त विचारलें,

" माझी आठवण ठेवाल ना ?"

हाच प्रश्न तिनें नंतर पुन्हा दोनतीनदां विचारला, व अखेर गाडी सुटणार म्हणून विलास जेव्हां उतरूं लागला तेव्हांहि तोच प्रश्न करून डोळ्यांतून एकदम वाहूं लागलेलें पाणी तिनें त्याचा हात धरून वर करून त्याच्या हातानें पुसलें, व अखेर झट्कन् त्याच्या हाताचें चुंबन घेतलें !

हेंच त्या प्रेमळ भित्र्या मुलीच्या आयुष्यांतील पहिलें आणि अखेरचें धाडसाचें कृत्य होतें !

---

# प्रकरण २० वें

संध्याकाळीं विलास आशेकडे गेला.

सुनेत्राच्या सहवासांत त्यानें सतत तीन दिवस काढले होते. व आतां आशेच्या सहवासासाठीं त्याला आतुरता वाटत होती. ज्या अंतःकरणाचें प्रेम त्याला मिळालें होतें पण स्वीकारावेंसें वाटलें नव्हतें, त्या अंतःकरणाला अखेरचें समाधान देण्याचें कर्तव्य त्यानें केलें होते. आतां जिचें प्रेम मिळण्याची त्याला आशा नव्हती, तिच्या सहवासांत त्याला स्वतःच्या अंतःकरणाचें समाधान करून घ्यावेंसें वाटत होतें.

तो आशेकडे पोंचला तेव्हां ती कांहींसें लिहीत बसली होती. तें पाहून त्यानें विचारलें,

"काय लिहिणं चाललं आहे ?"

आशेनें वर पाहून हास्य केलें व म्हटलें,

"कोणाला माझ्याविषयीं किती कळकळ वाटते, ते टिपून ठेवतें आहे."

"असं ? माझी समजूत होती, कीं या गोष्टी कागदावर टिपतां येत नाहींत."

"पण येतील तितक्या टिपलेल्या बऱ्या. पुढं कुणीं नाकबूल केलं, तर हिशोब कागदावर लिहिलेला दाखवतां यावा. शरद्‌ची अकरा दिवस, आणखी तुमची तीन दिवस गैरहजेरी लागली आहे."

"हो. पण, मी जरी प्रत्यक्ष आलों नाहीं, तरी तुमची आठवण होत होती मला हेंहि टिपायला विसरूं नका. आणखी शरद्‌च्या वतीनं असंहि टिपायला सांगतों, कीं तो अकरा दिवसांत

इथं आलेला नसला, तरी तो क्षणोक्षणी तुमची आठवण काढतो आहे."

"हं? माझ्यापेक्षांहि शरच्चंद्रांचं मन तुम्हीं जास्ती ओळखलं आहे म्हणायचं?"

"ओळखलं असलं तर त्यांत कांही आश्चर्य नाहीं. खेळ खेळणाऱ्यापेक्षां पाहाणाऱ्याला अधिक दिसतो ना?"

यावर अधिक बोलण्याऐवजी आशेनें टेबलावरचे कागद गोळा करून दूर ठेवले, आणि फाउंटन पेनहि टोपण घालून बंद करीत ती म्हणाली,

"थट्टा राहूं दे. कुठं होतांत तीन दिवस?"

"मुंबईत नव्हतोच म्हणानात. पण तें जाऊं दे. शरद् खरंच का अजून आला नाहीं तुमच्याकडे? भांडण तरी कसलं झालं आहे?"

आशा स्तब्ध राहिली.

विलासला काय कल्पना, की ज्याप्रमाणें सुनेत्राची गोष्ट तो तिला सांगूं शकत नव्हता, त्याप्रमाणेंच शरद्‌ची हकीगत ती त्याला सांगूं शकत नव्हती?

तो तिच्याकडे पहात राहिला. तिच्या सुंदर मुखमंडलावरील मघांच्या विनोदी संवादाच्या वेळचा खेळकर प्रकाश नाहींसा होऊन खिन्नतेची दाट छाया एकदम पसरलेली त्याला दिसली. तिचा व शरद्‌चा प्रेमकलह कशामुळें झाला असावा, याचा तो मनाशी परोपरीनें तर्क करूं लागला.

ती एकदम वर पाहून म्हणाली,

"शरच्चंद्रांचा हात धरून आणतो, अशी तुम्हीं प्रतिज्ञा केली होती ना?"

"पण तो माझ्याकडं आला असता तर. तो तर माझ्याकडं फिरकलाहि नाही. बरं, त्याच्याकडे जावं, तर तो कुठं रहातो, हेंहि मला माहित नाहीं."

" मी सांगते. "

" सांगा. तुम्ही म्हणत असाल, तर आत्तांसुद्धां त्याच्याकडं जाईन मी. किंवा असं केलं तर ? "

" कसं ? "

" आपण दोघं मिळूनच जाऊं. बाहेर माझी गाडी उभी आहे. "

" जाऊं या. शरच्चंद्रांची इकडं यायची लहर केव्हां लागेल, त्याची वाट पहात किती दिवस बसायचं ? सध्यां काम करीत असलेल्या कोणत्याहि पक्षांत जर आपल्याला मिसळायचं नाहीं, तर आपला नवा स्वतंत्र पक्ष आपण लवकर स्थापन केला पाहिजे. आणखी, त्या पक्षाचं धोरण आणि कार्यक्रम ठरवून जाहीर करण्यापूर्वी आपल्या तिघांची गांठ पडून चर्चा नको का व्हायला? शरच्चंद्रांना आतां विलंब न करतां गांठलं पाहिजे. चला जाऊं. म्हणतात ना, ' डोंगर सरकत नसेल तर महंमदानं डोंगराकडे सरकलं पाहिजे.' "

" आपण नाहीं बुवा महंमद व्हायला तयार. "

" नाही म्हणून कसं चालतंय ? मी बोलून चालून स्त्री. तेव्हां महंमदाची भूमिका तुमच्याकडेच आली. "

असें म्हणत हास्य करीत ती दूर झाली, व पलीकडच्या एका टेबलावर कचकड्याचे आंकडे पडले होते ते हातीं घेऊन आरशांत न पहातांच आपल्या केंसांचा आंबाडा मागून हातानें उचलून त्यांत एक एक आंकडा ती बसवूं लागली.

तिच्याकडे पहात रहाण्याचा मोह विलासला आंवरतां आला नाहीं. ती जेव्हां वळून म्हणाली,

" चलायचं... "

तेव्हां तो चमकला !

तिची तयारी इतक्या लवकर झाली ; हें त्याला बरें वाटलें नाहीं.

गाडींत बसल्यावर तो विचार करूं लागला, कीं आतां उगाच भांडलेल्या या दोन प्रेमिकांची गांठ पडल्यावर यांचें जें बोलणें होईल तें ऐकण्याचें आपण टाळावयाचें कसें? आशेला शरच्चंद्राच्या खोलींत सोडून आपण कोणती सबब काढून तेथून निसटावयाचें?...

पण, तशी सबब सांगण्याची त्याला वेळच आली नाही.

कारण, काळबादेवी रोडवरच्या जांभूळवाडींतील शरच्चंद्राच्या बिऱ्हाडाला तर कुलूप होतेच, पण आशेच्या म्हणण्यावरून ती दोघें तो कदाचित् भेटेल अशा ज्या दोनतीन जागा होत्या, तेथें गेलीं, तरी त्यांना तो भेटला नाहीं.

आशा फारच खिन्न झाली व म्हणाली,

"आतां काय करायचं?"

"आणखी नाही ना एखादी जागा शरच्चंद्र भेटेल अशी?"

"मला तरी माहीत नाहीं."

"मग काय? परतच जायला पाहिजे."

"बरं, चला."

तो गाडी सुरू करणार, इतक्यांत संध्याकाळच्या वर्तमानपत्राची शेवटची आवृत्ति विकणारी पोरें रस्त्यानें धांवत गेलीं, व त्यांतील एक लहान मुलगा गाडीजवळ येऊन वर्तमानपत्राची घडी पुढें करून ओरडला,

"फाइनाऽल! शेठ पाहिजे?"

त्याच्या हातांतील मुख्य बातम्यांच्या जाहिरातीवर पहिलाच मथळा लिहिला होता,

"गुप्त कटाच्या खटल्याचा निकाल!
आरोपीस स्हा सहा वर्षांची शिक्षा!"

विलासनें वर्तमानपत्र विकत घेतलें, व पहिल्या पानावरून दृष्टि टाकीत म्हटलें,

"ओहो! जजमेंटचा पुष्कळसा भाग दिला आहे; वाचलाच पाहिजे."

तो खरोखरच वाचूं लागला, व आशेनेहि वाचावें अशा बेतानें त्यानें वर्तमानपत्र धरलें, तेव्हां ती म्हणाली,

"इथं रस्त्यांत! चारपाच कॉलम दिसतो आहे मजकूर. आपण अशीं गाडींत वाचत बसलों, तर भोंवनालचे लोक म्हणतील—"

"पण घरीं जास्तवर आपल्याला नाहीं बुवा धीर निघणार."

"पण इथं रस्त्यांत विचित्र नाहीं का दिसत?"

"मग कसं करावं बरं? हां हां, इथं पलीकडे एक सुंदर हॉटेल आहे; तिथं जाऊं या?"

"हॉटेलांत जाऊन वर्तमानपत्र वाचायचं?"

"कां? त्याला काय झालं?"

"मग चहा प्यायसाठीं वर्तमानपत्राच्या कचेरींत जावं असंहि तुमचं म्हणणं असेल तर?"

तें ऐकून विलास मोठ्यानें हंसला. क्षणभर थांबून त्यानें विचारलें,

"मग काय? येणार का?"

"बरं, चला."

असें तिनें म्हटलें, व उतरावयाची तयारी करण्यासाठीं ती साडीचा पदर सरसावून घेऊं लागली. तितक्यांत वाऱ्याचा झोत आला, आणि तिच्या उजव्या खांद्यावरील पदराचें टोंक उडालें, तें विलासच्या डाव्या गालाभोंवतीं लपेटलें गेलें. तें ओढून घेत आशा म्हणाली,

"बाई बाई! हा मेला वारा!"

विलास हंसला व म्हणाला,

"हं, वाऱ्याला नांव ठेवूं नयेत हं. लोक म्हणतील, ही बाई वाऱ्याशीं भांडणारी आहे."

आशा हंसली, व मग चट्‌कन् खालीं उतरली.

तीं दोघें हॉटेलांत गेलीं, तों तेथें दिव्यांचा झगझगाट झाला होता, आणि फॅशनेबल स्त्रीपुरुषांची गर्दी झाली होती. कितीतरी स्त्रिया तलम रेशमी वस्त्रांचे कपडे करून आणि नाना तऱ्हेचे अलंकार घालून आपापल्या माणसांशीं हास्यविनोद करीत बसलेल्या होत्या. त्यांनीं आपले चेहेरे स्नो व पॉवडर लावून सुशोभित केले होते, कांहींच्या ओंठांवर कृत्रिम लाल रंगहि दिसत होता, कांहींच्या उघड्या वक्षांगांवर मोत्यांचे सर दिसत होते, आणि बहुतेक सगळयांच्याच कानांत लांबट कर्णकुंडलें होतीं. तीं मागेपुढें हालून पुन:पुन्हा चमकत होतीं.

पण, त्या सबंध घोळक्यांत खादीचा साधा वेष केलेली साधीसुधी आशा आपल्या जन्मजात अनुपम सौंदर्यानें एखाद्या राणीसारखी शोभत आहेसें विलासला वाटलें.

असल्या जागेची संवय नसल्यामुळें आशा किंचित् थबकून इकडेतिकडे पाहात होती. एखाद्या चमकलेल्या हरिणीप्रमाणें तिची दृष्टि विलासला वाटली.

अगदीं टोंकाला कोंपऱ्यांत एक निवांत टेबल दिसलें, तें बोटानें दाखवीत तो तिला म्हणाला,

"आपण तिथं बसूं."

"तिथं ?"

असें विचारून आशेनें उजवा हात वर केला.

गर्दींतून वाट काढून तेथपर्यंत जावयास ती चाचरत आहे असें वाटून विलासनें तिचा हात पकडला, आणि तिला अलगद त्या जागेपर्यंत नेलें.

तीं दोघें खुर्चीवर बसल्यावर परिचारकानें जवळ येऊन विचारलें,

"साहेब, काय आणूं ?"

विलासनें आशेला विचारलें,

" काय घेणार ? "

" काय तुम्ही म्हणाल तें. मी जन्मांत प्रथमच असल्या हॉटेलांत आलें आहें. "

" असं ? मग माझ्याकडून आज मोठाच गुन्हा झाला म्हणायाचा ! तुम्हांला भ्रष्ट केलं मीं. मग नको कां म्हणालां नाहींत ?"

" इतर कोणीं विचारलं असतं तर तसं म्हटलं असतं. "

त्या उत्तराचें विलासला आश्चर्य वाटलें. पण अर्थात् ती अगदीं सरळ भावानेंच तसें बोलली असली पाहिजे. त्याचा विपरीत अर्थ न करण्याबद्दल आपल्या मनाला बजावीत विलासनें तिच्या चेहऱ्यावरची आपली नजर वळविली, आणि परिचारकाला म्हटलें,

" कॉफी आण. "

परिचारक तेथून गेल्यावर त्याने आशेला विचारलें,

" कॉफी चालेल ना ? "

" हूं. अमुक कांहीं घ्यायसाठी थोडींच इथं आलों आहोंत आपण ? आपलं मुख्य काम जजमेंट वाचायचं आहे. "

" अर्थात्. " असें म्हणून विलासनें वर्तमानपत्र टेबलावर पसरलें, व तीं दोघें वाचूं लागलीं.

कॉफी निवून गेली, तरी त्या दोघांचें लक्ष तिकडे गेलें नाही. जजमेंट फारच चांगलें लिहिलें होतें, व त्यांतील शेवटचा पॅरिग्राफ तर अतिशयच चांगला होता. तो एकदां वाचून विलासचें समाधान झालें नाहीं. त्यांतील अखेरचीं वाक्यें त्याने पुन्हा वाचलीं—

" ....या आरोपींस शिक्षा सांगतांना कोणाहि सहृदय माणसाच्या अंतःकरणाला थोडें तरी वाईट वाटल्यावांचून राहाणार नाहीं. हे सर्व आरोपी कोंवळ्या वयाचे तरुण आहेत. त्यांच्या हातून वास्तविक मायदेशासाठीं मोठालीं सत्कृत्ये घडण्यासारखी आहेत. यांच्यासारखे तरुण सन्मार्गानें गेले, तर केवढेंतरी लोक-

कल्याण करूं शकतील ! परंतु, भावनेच्या भरांत कार्याकार्याचा विचार न करतां यांनी अत्यंत विघातक आणि भयंकर अशा गोष्टी केलेल्या आहेत. या गोष्टींनी कुणाचेंहि हित साधणें शक्य नाहीं, आणि यांच्या कारस्थानांचा कठोरपणानें बीमोड करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. कायद्यांत सांगितलेली जास्तींत जास्त शिक्षा या आरोपींना दिली जावी, असे जें सरकारी वकिलांचें म्हणणें आहे, तें वास्तविक पहातां वावगें नाही. परंतु, कालांतरानें या तरुणांस आपली चूक कळून येईल, अशी आशा बाळगण्यास मला हरकत वाटत नाही, व पश्चात्ताप झाल्यावर अन्य मार्गानें लोककल्याण करण्यासाठीं या तरुणांना अवकाश उरावा, अशी माझी इच्छा आहे; म्हणून, त्यांना प्रत्येकी सहासहा वर्षांची शिक्षा मी सांगतों."

शेवटचें वाक्य वाचल्यावर विलासनें वर पाहून आशेला म्हटलें,

"किती छान लिहिलं आहे नाहीं ?..... कां, तुम्ही बोलत कां नाहीं ?"

"जज्मेंट छान आहे. पण, आपल्या देशांतील पांच साहसी तरुण सहा वर्षं तुरुंगांत डांबले गेले, या विचारानं मनाला कष्ट झाल्यावांचून रहात नाहींत. अन् विशेषतः स्वातंत्र्य मिळविण्याचा कोणता मार्ग योग्य आणि कोणता अयोग्य तें एका परकी माणसानं आम्हांला सांगावं हें कसंसंच वाटतं. पण गुप्त कट, अत्याचार असल्या मार्गांनीं हिंदुस्थानचं कल्याण होणार नाहीं असं मलाहि वाटतं. पण, ही भाषा आम्ही– हिंदुस्थानच्या लोकांनीं बोलायची ! ती साहेबाच्या तोंडून ऐकली, की खरी असली तरी बरी वाटत नाहीं ! मनांत येतं, आम्ही दास्यांत सांपडलेले गुलाम ! कुणींहि उठावं, आणखी हें बरं नाहीं, तें बरं नाहीं, असा शहाणपणा सत्तेच्या जोरावर आम्हांला शिकवावा ! आम्हांला शिक्षा द्यावी, आणि ती देतांना म्हणावं, तुमच्यावर दया करतों आहें !....."

हें बोलतां बोलतां आशेचा चेहरा अत्यंत गंभीर आणि खिन्न झाला. तिनें कॉफीचे दोनतीन घोट घेतले, पण मग तिनें एकदम म्हटलें,

"मला शरच्चंद्रांची फार काळजी वाटते. या अकरा दिवसांत ते भेटले नाहींत, हें कांहीं चांगलं लक्षण नाहीं."

तिला शरच्चंद्राची आठवण कशामळें झाली तें ओळखणें अवघड नव्हतें. तिच्या कोमल हृदयाला विरहाची व्यथा किती जांचक होत होती, तें तिच्या चेहेऱ्यावर विलासला स्पष्ट दिसलें. त्याचें अंत:करण व्यथित झालें. तिला धीर द्यावयासाठीं तो म्हणाला,

"तुम्ही शरद्‌ची व्यर्थ चिंता कां करतां? माणसाला सुविचाराच्या मार्गावर ठेवणारी प्रीति ही एक विलक्षण शक्ति आहे! तुम्हांला दु:ख होईल, असं कृत्य शरद्‌च्या हातून घडणं शक्य नाहीं. कारण, त्याचं मन निराळं असलं, तरी त्याच्या हृदयांत अंत:करण आहे तें तुमचं आहे!..."

तें ऐकतांच आशेनें ओंठ चावला, आणि झट्कन् मान वळविली, ती तिच्या पापण्यांच्या कडेशीं अश्रुबिंदु आले म्हणूनच, असें विलासला वाटलें.

त्या गोष्टीचा विलासला किंचित् विस्मय वाटला, पण त्याबद्दल अधिक विचार न करतां विलास स्वत:शीं इतकेंच म्हणाला, "शरद्‌ला कसा आणि कुठं गांठावा, कांहीं कळत नाहीं."

००० ००० ०००

नंतरच्या दोनतीन दिवसांत विलास याच विवंचनेत होता. आणि त्यामुळें एके दिवशीं दुपारीं भर बारा वाजतां शरद् त्याच्याकडे अकस्मात् आला तेव्हां त्याला अत्यानंद झाला.

त्याचे दोन्ही हात पकडून विलास म्हणाला,

"अरे काय गृहस्था! कुठं, नाहींसा तरी कुठं झाला होतास?"

त्या प्रश्नाचें उत्तर देण्याऐवजीं आपले हात मोडवून घेत शरद् म्हणाला,

" अरे काळे केलेस कीं माझे हात ! कशानं भरवले आहेस एवढे ?"

" माफ कर हं. माझे हात घाण आहेत याचं मला भानच राहिलं नाहीं. माझ्या शिकारीच्या बंदुका आणि रिव्हॉल्व्हर पुशीत बसलों होतों. "

" हं ? कुठल्या शिकारीची तयारी आहे ?"

" शिकार कसली ? पण, हीं हत्यारं फार दिवस न पुसता ठेवणं बरं नाही. "

" असं होय ? त्यातलं आपल्याला कांहीं कळत नाहीं बुवा ! हा रिव्हॉल्व्हर काय तुझा ? तुझा आहे तेव्हां फार किमतीचा असणार हें उघडच आहे. कसा उडवतात रे ? दाखव तरी ?"

" ए, असा धरतात वाटतं रिव्हॉल्व्हर ? शहाणाच आहेस !"

" मग असा होय ? भरलेला नाहीं ना रे बाबा ?"

" काय मॅड आहेस रे ! ही चेंबर रिकामी नाहीं दिसत तुला ?"

" याला चेंबर म्हणतात होय ? अन् गोळ्या कुठं आहेत ? "

" गोळ्या चांगल्या बंदोबस्तांत आहेत त्या कपाटांत. पण या चवकशा करण्यापेक्षां आशेचं कसं आहे म्हणून विचार कीं. "

" मीं विचारायलाच कशाला पाहिजे आहे ? तूं सांग कीं ! "

" सांगत नाहीं; दाखवतों. आत्तां मी तुला घेऊन जाणार तिच्याकडे. "

" आत्तां ? अरे बापरे ! अरे, माझं जेवण व्हायचं आहे अजून. आत्तां नको. मी संध्याकाळीं खास येतों आशेकडे. "

" शरद्, ही थाप नाहीं ना ?"

" नाहीं रे, शपथ घेतों. "

" आशेची शपथ घे."

" बरं आशेशपथ."

" शाबास ! तूं इतका शहाणा झालास, याबद्दल तुला काय बक्षीस देऊं ? थांब हं. हें सगळं आंवरून ठेवतों, आणखी मग हात वगैरे धुऊन तुला सुंदर सरबत आणून देतों."

" नुसतं सरबतच ? कांहींतरी भक्कम खायला दे बुवा. मला फार भूक लागली आहे ! अन् खरं म्हणशील, तर सरबतापेक्षां चहाच सांग."

" पण तिकडे डेअरींत मिळणाऱ्या चहाइतकी आमच्या घरच्या चहाला लज्जत लागेल का तुला ? "

" चावटपणा बस् कर. ते बॅरल नीट पूस लवकर ! "

मग विलासनें हत्यारें पुसण्याचें आपलें काम घाईनें आटोपलें, बंदुका उचलून ठेवल्या, रिव्हॉल्व्हर ड्रॉअरमध्यें ठेवला, आणि 'आलोंच हं' असें शरद्‌ला सांगून तो खालीं गेला.

पांच मिनिटांनीं तो जिन्याच्या खालच्या पायरीवरून ओरडला,

" शरद्, माझ्याकडे मोटारकंपनीचा माणूस आला आहे. त्याला माझ्या गाडींत काय दुरुस्ती पाहिजे आहे तें दाखवायचं आहे. दहाबारा मिनिटं लागतील. Will you mind ? टेबलाच्या उजव्या खणांत सिगरेटचा डबा आहे बरं का. मात्र खिशांत घालायच्या नाहींत अं ! "

शरद् वर मोठ्यानें हंसला, तें ऐकून विलासहि खालीं हंसला.

नंतर पंधरावीस मिनिटांनीं तो वर गेला, तोंपर्यंत चहा आणि फराळाचें सामान आचाऱ्यानें वर आणून ठेवलें होतें.

चहा घेतांना विलासनें पुनःपुन्हा शरद्‌ला विचारलें,

" तूं आणखी आशा एकमेकांशीं भांडतां कमलीं रे ? "

" तुला कुणीं सांगितलं आम्ही भांडलों म्हणून ? "

" अरे, सांगायला कशाला पाहिजे ? दोघांच्याहि अंगावर ओरखडे दिसताहेत की ! "

" शाबास ! म्हणजे आम्हांला मांजरं ठरविलींस वाटतं ? "

" एका परेंच पंडितानं पूर्वींच ठरविलं आहे तसं. तो म्हणतो, Lovers are at their best when they behave like cats! They purr and scratch most wonderfully. "

" हल्लीं प्रणयसाहित्यबत्तिशीचं अध्ययन चाललं आहे वाटतं तुझं ? "

अशा प्रकारें त्या दोघां मित्रांचें बराच वेळ मोठ्या मजेचें संभाषण झालें, व शरद् जावयास निघाला. तेव्हां विलासनें विचारलें,

" संध्याकाळीं आशेकडे खास जाणार का ? "

" अलबत् ! शपथ घेतली आहे. "

त्याच्या पाठीवर थाप मारून विलासनें विचारलें,

" त्या हँडबॅगेंत काय आहे रे ? "

" आमच्या कंपनीचे कागदपत्र आहेत. "

" तुमची कंपनी ? ती कसली बुवा ? "

" लोकांचे प्राण घ्यायची ! — किती दचकलास रे ! अरे, प्राण घ्यायची म्हणजे लाइफ इन्शुअरन्स कंपनी ! मीं एजन्सी घेतली आहे, अन् मिळतील तितक्या लोकांचीं Lives ( प्राण ) घेत असतों ! तुझं लाइफ देतोस का मला ? "

" अरे, मित्रासाठीं प्राण द्यायलाच पाहिजे ! हं, जा जा आतां. माझी गाडी दिली असती तुला; पण आत्तांच रिपेअरीला कारखान्यांत पाठविली. "

" अच्छा, Good bye ! "

" Good bye काय ? संध्याकाळीं भेटतोंच कीं ! मी येस्तोवर आशेकडून उठूं नकोस हं. "

" नाहीं नाहीं. "

असें म्हणून शरद् निघून गेला.

००० ००० ०००

संध्याकाळीं विलास आशेकडे गेला, तो अतिशय घाबरलेला दिसला.

त्यानें तिला विचारलें,

" शरद् गेला काय ? "

" म्हणजे ? ते आले होते कधीं ?"

" काय ! इथं नव्हता आला ? "

" छे ! तुम्ही कशावरनं विचारतां ? "

" माझ्याकडे तो दुपारीं आला होता. अन् संध्याकाळीं इकडे येतों, असं त्यानं वचन दिलं होत. "

" पण वचन देऊनहि इकडे आले नाहींत, तर त्यांची मर्जी ! त्यांत इतकं घाबरायला काय झालं ? "

आपल्याला पिस्तुलाबद्दल आलेली शंका- शंका कसली, वाटत असलेली खात्री- कांही झालें तरी आशेजवळ बोलून दाखवितां कामा नये, हें तितक्यांत विलासच्या लक्षांत आलें.

" कुठं, घाबरलों आहें कुठं ?"

असें म्हणून तो हंसला.

पण आपलें हंसणें फारच कृत्रिम झालें कीं काय, अशी त्याची त्यालाच शंका आली.

---

# प्रकरण २१ वें

---

दुसऱ्या दिवशीं विलासनें शरद्ला गांठण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला. त्या दिवशीं आशेनें ज्या ज्या जागीं त्याला नेलें होतें, तेथें तेथें जाऊन त्यानें शरद्चा शोध केला, पण त्याच्याबद्दल कोणालाच निश्चित बातमी सांगतां येईना.

गुप्तमंडळांत शिरलेल्या माणसांविषयीं लोकांना निश्चित बातम्या सांगतां आल्या, तर मग तीं गुप्तमंडळें कसलीं ?

शरद् स्वतः पक्कें ओळखून होता, की रिव्हॉल्व्हर गेलेला पहातांच विलास आपला कसून तपास करणार, पण त्याची अशीहि खात्री होती, कीं विलासला आपला शोध लागणें शक्य नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपल्या ओळखीचें माणूस कर्मधर्मसंयोगानें आपल्याला भेटलें, तरी त्याला आपण ओळखूं येणें शक्य नाहीं.

कारण, त्यानें वेषांतर अगदीं बेमालूम केलें होतें.

त्याची ती सैल पत्राणी विजार, पायांतला चढाव, लांबघोळ खमिसावरचें रंगीत जाकोट, गळ्यांतला ताईत, हातांतली लाठी, वरच्या ओंठावरच्या मिशा, हनुवटीवरची छोटीशी दाढी, आणि डोक्याला गुंडाळलेल्या फेट्यांतून दिसणारा आंतल्या टोपीचा जरीचा कळस- हें सारें पाहून तो शरच्चंद्र आहे, अशी शंका तरी कोणाला येण्यासारखी होती काय ?

आपणच शरच्चंद्र काय, अशी त्याची त्याला मात्र वारंवार शंका येत होती.

कुलाब्याच्या भागांतील एका बकाली चाळींतल्या तिसऱ्या मजल्यावर कडेच्या खोलींत आरसा पुढें धरून उजव्या हाताच्या करंगळीनें जेव्हां जेव्हां तो आपल्या मिशा साफसूफ करी, तेव्हां तेव्हां तो आपल्या प्रतिबिंबाला म्हणे,

"क्यों ? तूं शरच्चंद्र है ? छीः, झूट ! शरच्चंद्रका मामला तो खलास हो गया !"

आणि खरोखरच त्या वेषांतराशीं तो जों जों समरस होऊं लागला, तों तों आपण शरच्चंद्र आहोंत, हें त्याचें त्यालाच खरें वाटेनासें झालें होतें. मनःपूर्वक केलेल्या अभिनयाचा परिणाम मोठा चमत्कारिक असतो ! असें म्हणतात, की माणसानें एखादी खोटी गोष्ट पुन्हा पुन्हा सांगितली, कीं अखेर ती त्याची त्याला खरीच वाटूं लागते.

मग स्वत्व विसरून जस्टिस व्हाइट्फील्डचा खून पाडणाऱ्या पंजाबी मुसलमानाच्या भूमिकेशीं शरच्चंद्र अल्पकालांत तादात्म्य पावला, यांत नवल नाहीं ! कारण, त्याच्या मनाला आतां एकच ध्यास होता. शनिवारी रात्री जस्टिस व्हाइट्फील्डचा प्राण घ्यायचा !

ज्या गुप्तमंडळांत शरच्चंद्र सामील झाला होता, त्यांतीलच सभासदांना जस्टिस व्हाइट्फील्डनें शिक्षा ठोठावल्या होत्या; आणि या शिक्षेचा सूड म्हणून व्हाइट्फील्डचा प्राण घेण्याचें मंडळानें ठरविलें होतें. तें काम कोणी करावयाचें याबद्दल चिठ्या टाकण्यांत आल्या, तेव्हां शरच्चंद्राचें नांव निघालें होतें. इतर सभासदांनीं अर्थात त्याला मदत करावयाची होतीच ती त्यांनी केलीहि. जस्टिस व्हाइट्फील्डच्या हालचालीवर सूक्ष्म नजर ठेवून तो रात्रीच्या वेळीं एल्सीकडे वारंवार येतो, व शनिवारी रात्री तर हटकून येतो, एवढी माहिती एल्सीच्या घरासमोर असलेल्या इराण्याच्या हॉटेलमध्यें बसून बसून त्यांनीं मिळविली होती; व या माहितीच्या आधारावर शरच्चंद्रानें ठरविलें होतें, की येत्या शनिवारी रात्रीं व्हाइट्फील्डचा प्राण घ्यावयाचा. आतां शनिवारची रात्र केव्हां एकदां येते, अशी विलक्षण अधीरता त्याच्या मनाला त्रास देत होती.

शुक्रवारीं रात्रीं तर त्याला हा त्रास असह्य वाटूं लागला. त्याची झोंप गेल्या चारपांच दिवस उडालीच होती. पण आज तर डोळे झांकण्याची शारीरिक क्रियाहि करावीशी त्याला वाटेना.

उद्यांच्या रात्रींच्या प्रसंगाची आपण कशी काय तयारी केली आहे, याची उजळणी तो आपल्या मनाशीं वारंवार करीत होता.

त्यानें एल्सीच्या बिऱ्हाडाची जागा अगदी बारकाईनें पाहून ठेवली होती. रात्रीच्या वेळीं त्या रस्त्याच्या कोणत्या भागावर किती प्रकाश असतो; एल्सी ज्या इमारतींत रहात होती, त्या इमारतीच्या प्रवेशद्वाराजवळ रात्रीं कोणी रखवालदार बसतो कीं नाहीं; वर चढणाच्या जिन्याच्या कोणत्या भागावर जास्तींत जास्ती अंधेर आहे; जिन्याच्या वळणापाशीं कितव्या पायरीवर वर जाणाऱ्या अथवा खालीं येणाऱ्या माणसाला सगळ्यांत असावध स्थितींत गांठतां येईल; पिस्तुलाचा आवाज झाल्याबरोबर आजूबाजूचीं माणसें कोणत्या दिशेने येण्याचा संभव आहे व कोणत्या दिशेनें तेथून निसटून जाणें अधिक शक्य आहे– इत्यादि सगळ्या बारीकसारीक गोष्टी त्यानें मनाशीं अगदीं पूर्णपणें ठरवून ठेवल्या होत्या. त्यात आपल्या हातून काहीं चूक घडेल, अशी शंका त्याला उरली नव्हती. विलासकडून आणलेला रिव्हॉल्व्हर त्यानें नीट पाहून ठेवला होता, व गोळयाहि अगदी सुसज्ज ठेवल्या होत्या. आतां फक्त उद्यांसाठीं एक मोटार मिळविण्याचें काम शिल्लक राहिलें होतें. पण, तेंहि त्याचे सवंगडी बरोबर करणार होते. मोटारदुरुस्तीच्या एका कारखान्यांतला एक मिस्त्री त्यांनीं फितवून ठेवला होता, त्याच्यामार्फत दुरुस्तीला आलेल्यांपैकीं सगळ्यांत उत्तम गाडी त्यांना मिळणार होती. नवराची पार्टी काढून टाकली, कीं मग कसली पोलिसाची भीति ?

या गोष्टी शरच्चंद्र पुन:पुन्हा आपल्या मनाशीं पडताळून पहात होता, व तयारी तर जय्यत झाली असें जों जों त्याला वाटे, तों तों पुढचे चोवीस तास केव्हां सरतील, अशा उतावळीचा त्रास त्याच्या मनाला अधिकाधिक होई.

तो पुन:पुन्हा स्वत:शीं म्हणे,

"उद्यां रात्रीं या वेळीं व्हाइट्फील्ड जगांतून नाहींसा होईल ! ... आणि शरच्चंद्र ? ..."

त्या प्रश्नाचें मात्र उत्तर त्याला सांपडेना. डोळे मिटावेसेंसुद्धां त्याला वाटत नव्हतें, याचें कारण हेंच होतें.

या जगांतील आजची रात्र त्याची अखेरची होती किंवा नव्हती, याची याला कांहीच कल्पना करतां येईना.

त्याच्या मनांत पुनपुन्हा येवढेंच येत होतें, कीं निर्भयपणें वावरण्याची ही रात्र जर खरोखरीच अखेरची असेल तर ती उलटण्यापूर्वीं आशेचें, निदान तिच्या रहात्या जागेचें, एकदां अखेरचें दर्शन घ्यावें...

तो विचार मनावेगळा करण्यासाठीं तो धडपडत होता, परंतु त्याचा प्रयत्न काहीं केल्या सफल होईना. तो पुनःपुन्हा स्वतःला बजावी, कीं जें प्रेम एकदां संपलें, त्याचा मोह आतां कशासाठी ? त्या रात्री तिच्याकडून आपण परत आलों, तें पुन्हा त्या मोहांत न सांपडण्याचा निश्चय करून. तो निश्चय आपण इतके दिवस पाळला, आणि आतां केवळ एका दिवसासाठीं तो मोडावयाचा ? ... पण यावर त्याचें मन म्हणे, आतां एकच दिवस उरला आहे, म्हणूनच तर तिचें एकदां अखेरचें दर्शन घ्यावयाचें ! नुसतें दर्शन, गांठ नव्हे; मग त्यांत मोह तो कसला ?....

त्याच्या मनांतील परस्परविरोधी विचारांची ती झटापट कांहीं केल्या संपेना...

अखेर तो उठला, आणि बाहेर पडून परळकडे जाणाऱ्या ट्रॅममध्यें बसला.

आशा रहात असलेल्या जागेच्या रस्त्यावर तो उतरला तेव्हां तेथें बरीच सामसूम झाली होती.

तो कोंपऱ्यावरच उभा राहिला, आणि आशेच्या घराची एक खिडकी प्रकाशित झाली होती, तिच्याकडे त्यानें दृष्टि लावली.

कोंपऱ्यावर एक पठाण अशा प्रकारें बराच वेळ उभा रहावा, हें त्या रस्त्यावर हिंडणाऱ्या पोलिसाला बरें वाटलें नाहीं. त्यानें शरच्चंद्राजवळ येऊन हुकुमी आवाजांत विचारलें,

"काय रे, इथं काय उभा राहिला आहेस? काय काम आहे तुझं?"

"काम? हं:, कुछ नहीं जी."

"मग आपल्या रस्त्याला लाग तर."

"हां हां, जाताहि है."

तितक्यांत डेअरीच्या दारांतून विलास बाहेर पडलेला शरच्चंद्राच्या दृष्टीस पडला, खिडकीतील प्रकाशहि दिसेनासा झाला, आणि जड पावलांनीं, आणि त्याहूनहि जड अंत:करणानें शरच्चंद्र परत फिरला!

००० ००० ०००

व्हाइट्फील्डचा मारेकरी ज्याप्रमाणें त्या सबंध रात्रीं जागा होता, त्याप्रमाणेंच स्वत: व्हाइट्फील्डहि अर्धी रात्र उलटली, तरी जागाच होता.

आपल्या खोलींत तो लिहीत बसला होता.

खोलीचें दार बंद होतें, आणि साऱ्या खिडक्यांचे पडदे सरकवून लावलेले होते; जणुं बाहेरच्या जगाचा यत्किंचितहि संपर्क त्याला नको होता!

संध्याकाळीं वेड्याच्या इस्पितळांतील टेलिफोन आल्यावरून त्याला तिकडे जावें लागलें होतें, व तेथें त्याला कळलें होतें कीं, त्या दिवशीं एकदम अनावर होऊन त्याच्या बायकोनें इस्पितळांतील माळ्याच्या हातांतील खुरपें हिसकून घेऊन दोघांतिघां नोकरांस जखमा केल्या होत्या. तेथून तो परत आला, तों त्याचा मुलगा खूप झिंगून घरीं येऊन सैंपाक्याला बेदम मारून नुकताच बाहेर निघून गेला होता......

या साऱ्या गोष्टी विसरण्यासाठीं व्हाइट्फील्ड आपलें आवडतें लेखनाचें काम काढून बसला होता. शक्य तितकें त्यांत चित्त गुंतविण्याची त्याची इच्छा होती.

पण, तें त्याला फार अवघड जाऊं लागलें.

आपल्या बायकोविषयीचे आणि मुलाविषयींचे विचार त्याच्या मनांत राहून राहून येत, आणि त्याबरोबरच थोडयाच दिवसांपूर्वी ज्या गुप्त कटवाल्या तरुणांस त्यानें शिक्षा ठोठावल्या होत्या, त्यांची आठवण त्याला होत होती. त्या आरोपीस त्यानें कोणत्या अपराधाबद्दल सजा दिली होती? राजद्रोहाच्या, नव्हे? म्हणजे एक प्रकारच्या वेडाबद्दलच नव्हे काय? मग त्याच्या बायकोला आणि मुलाला तो कां शिक्षा देत नव्हता? दोघांच्याहि हातून अत्याचार घडत होते. न्यायाच्या कठोर समदृष्टीनें तीं दोघेहि अपराधीच ठरावयास पाहिजे होतीं. मग त्यांच्याशीं मात्र तो दयेच्या आणि क्षमेच्या व्रतानें कां वागत होता? केवळ योगायोगानें तो एका व्यक्तीचा पति आणि दुसऱ्या व्यक्तीचा पिता होता म्हणून? म्हणजे काटेकोर न्याय देण्यासाठीं न्यायासनावर बसणारा न्यायाधीशहि पक्षपात करतोच तर?...

या विचारांनीं व्हाइट्फील्डच्या लेखनकार्यांत वारंवार व्यग्रता येत होती. आणि ती घालविण्याकरितां त्याला मोठा निकराचा प्रयत्न करावा लागत होता.

तो सध्यां लिहीत होता, तें पुस्तक आपल्या आतांपर्यंतच्या सर्व पुस्तकांहून अधिक सरस होईल, अशी त्याची खात्री होती; व त्यांतील विचारसरणी शक्य तितकी तर्कशुद्ध, आणि भाषाशैली शक्य तितकी आकर्षक करण्याची त्याची इच्छा होती. त्या पुस्तकाचें नांव 'SLAVES OF FREEDOM' (स्वातंत्र्याचे गुलाम) असें त्यानें ठेवलें होतें; आणि तो जें प्रकरण आज लिहीत होता. त्याचें नांव 'THE PSYCHOLOGY OF POLITICAL MURDERERS' (राजकीय खून करणाऱ्या इसमांच्या मनाचें पृथःकरण) असें त्यानें लिहिलें होतें.

त्याला कोठली कल्पना, कीं तें पृथःकरण करूं पहाणाऱ्या त्याच्या मेंदूवर चोवीस तासांच्या आंतच पिस्तुल रोखलें जाणार होतें ?

आपल्या विचारसरणीचे धागे जुळविण्यांत खाजगी संसारांतल्या शीणाचा त्याला जसजसा विसर पडला, तसतसा लिहिण्याच्या कामांत तो अधिकाधिक रंगत गेला. दोहोंचे ठोके पडले, तेव्हां त्यानें घड्याळाकडे पाहून एक मोठी जांभई दिली, लिहून झालेले कागद एकत्र जुळवून टेबलाच्या खणांत टाकले, पाइप काढून तिच्यांत तंबाखू भरून व पेटवून ती ओढीत तो रस्त्याकडच्या खिडकींत कांहीं वेळ उभा राहिला, आणि मग अंथरुणावर पडला.

००० ००० ०००

शनिवारीं दुपारीं कोर्टांतून परत येतांच तो टेलिफोनजवळ गेला, व एल्सीचा नंबर घेऊन त्यानें विचारलें,

"हॅलो एल्सी ?"

पण, एल्सीऐवजीं तिच्या सैंपाकिणीचा स्वर त्याच्या कानीं आला. तिच्याकडून त्याला कळलें, कीं एल्सी बाजारांत गेली आहे.

त्यानें स्नान केलें, व कपडे बदलून पुन्हा टेलिफोनमध्यें विचारलें,

"एल्सी आली कीं नाहीं ?"

"होय, एल्सीच बोलते आहे."

"एल्सी, आज शनिवार."

"होय, मी तुमची वाटच पहातें आहें. केव्हां येतां ?"

"क्लबवर जातों आणि तिथून तुझ्याकडेच येतों."

"ठीक. मी वाट पहातें. लवकर या"

सुमारें दीडदोन तासांनंतर व्हाइट्‌फील्ड तिच्याकडे जाऊन पोंचला, तों ती खरोखरच त्याची वाट पहात होती.

तो कोंचावर बसतांच टेबलावर ठेवलेल्या मद्यप्राशनाच्या साहित्याकडे बोट दाखवून ती म्हणाली,

"काय देऊं? व्हिस्की कीं ब्रँडी?"

व्हाइट्‌फील्डने कोंचावरच पाय ताणून पसरले, व म्हटलें,

"व्हिस्की. नेहमीपेक्षां थोडी जास्त. मला आज असं वाटतं आहे, कीं जगांतल्या सगळ्या गोष्टींचा विसर पडावा."

"माझासुद्धां?"

"एल्सी, माझ्या जागीं एखादा तरुण या वेळीं तुझ्याशीं बोलत असता, तर तो कदाचित् म्हणाला असता, 'छे छे, तुझा कसा?' पण मी तरुण नाहीं, व खोट्या शब्दांनीं तुला फसवून तुझ्या भावनांशीं लटका खेळ खेळण्याची मला इच्छा नाहीं. मी इथं तुझ्याकडे कां येतों, तें मीं कधी स्पष्ट सांगितलं नसलं, तरी ओळखण्याइतकी चतुर तूं खचित आहेस. म्हातारपणीं माणसाच्या शरीरधर्माचा उच्छृंखलपणा उरत नाहीं. पण मला वाटतं, जो स्त्रीसहवास जवानींत मनुष्याला शरीरसुखासाठीं हवासा वाटतो, तोच वय झालेल्या माणसाला एक प्रकारच्या विस्मृतीची शांति मिळवून देऊं लागतो, आणि सर्व प्रकारच्या मानसिक चिंतांचें परिशमन करण्याचें अमोघ साधन म्हणून त्याला तरुण माणसाइतकीच त्याची चटक लागते. एका वेश्येच्या आत्मचरित्रांत मी वाचलं आहे, कीं तिच्या अनुभवाप्रमाण व्यभिचारी लोकांत ऐन उमेदींतल्या तरुणांपेक्षां वयस्क पुरुषांचंच प्रमाण अधिक असतं. तरुणांनीं आयुष्य फारसं पाहिलेलं नसतं. त्यांना चिंता फारशा नसतात. असल्या, तरी त्यांपुढं त्यांचं मन खचलेलं नसतं. त्यांचे उमेदीचे दिवस चालू असतात. ज्यांचं वय झालं, त्यांची गोष्ट निराळी असते. आयुष्याचे धक्के त्यांनी खूपसे खाल्लेले असतात. मनांतल्या चिंतांचा भार वाढलेला असतो. उमेद सरलेली असते. हजार तऱ्हेच्या

मनोव्यथा त्यांना छळीत असतात. या सर्वांचा विसर पडेल, तर त्यांना हवा असतो. या असल्या विस्मृतीसाठीच मी तुझ्याकडे येत असतों. अन् आज तर मला ती विस्मृति जितकी पूर्णतेनं मिळेल तितकी हवी आहे. एका बायकोचा नवरा, मुलाचा बाप, न्याय देणारा न्यायाधीश, या सर्व नात्यांचा आणि जबाबदाऱ्यांचा साफ विसर पडेल तर मला हवा आहे..."

"O, darling! You are talking too much to-night. ( बाई बाई! आज बोलायचं तरी किती मेलं! )"

असें म्हणत एल्सी व्हाइट्फील्डच्या अगदी जवळ सरकली, आणि तिनें आपले ओंठ त्याच्या गालावर टेकले.

व्हाइट्फील्डनें तिचा प्रतिकार केला नाही.

००० ००० ०००

जिन्याच्या पायथ्याशीं अंधेरांत बसून राहिलेल्या शरच्चंद्राला व्हाइट्फील्ड एल्सीचा निरोप घेऊन निघाल्याची चाहूल नंतर तीनचार घटकानी लागली.

त्यानें कान टवकारले व तो ऐकूं लागला.

"Good-night Elsie!"

"Good-night! तुम्ही आपली काठी घेतली ना?"

खालीं शरच्चंद्रानें विचार केला, याच्याजवळ काठी आहे काय? ठीक....

"घेतली घेतली." व्हाइट्फील्ड म्हणाला.

"मी तुम्हांला खालपर्यंत पोंचवायला येऊं काय?"

खालीं शरच्चंद्र मनाशीं म्हणाला, "कशाला येतेस मरायला?"

"नको नको. मी नेहमीं नाहीं का एकटा जात?" व्हाइट्फील्डनें म्हटलें.

"खिशांत टॉर्च आहे ना तुमच्या?"

"आहे आहे."

शरच्चंद्राच्या झटकन् मनांत आलें, अरेच्या! या गोष्टीचा आपण हिशोब केला नव्हता! पण हरकत नाहीं. तो आणखी मागें सरकला, व वरून येणाऱ्या माणसाच्या हातांतील टॉर्चच्या उजेडांत न सांपडण्यासाठीं कसें उभें राहिलें पाहिजे, त्याचा त्यानें अजमास घेतला.

अगदीं वरच्या दोनतीन पायऱ्यांवर व्हाइट्फील्डनें टेकलेली काठी वाजली, व शरच्चंद्राला पुन्हा ऐकूं आलें,

"Good-night darling!"

"Good-night dear!"

काठीचा आणि बुटांचा आवाज जवळजवळ येऊं लागला. विजेच्या प्रकाशाचा कवडसाहि खालीं खालीं सरकूं लागला. शरच्चंद्र सरसावून उभा राहिला. रिव्हॉल्व्हरवरची पकड त्यानें घट्ट केली.

जिना ज्या ठिकाणीं वळत होता, त्या अर्ध्या पायरीवर व्हाइटफील्ड आल्याचें पहातांच त्यानें रिव्हॉल्व्हरचा चाप ओढला.

कानठळ्या बसण्यासारखा बार झाला!

व्हाइट्फील्ड दचकून ओरडला, पण पडला नाहीं! त्यानें फिरविलेल्या टॉर्चच्या प्रकाशानें शरच्चंद्राचे डोळे दिपले. पण पूर्वीचा अदमास कायम ठेवून शरच्चद्रानें पुन्हा रिव्हॉल्व्हर झाडला!

त्याच क्षणी त्याच्या स्वतःच्या हातावर काठीचा जोराचा तडाखा बसला, व रिव्हॉल्व्हर सुटून कोणीकडे उडाला, तें त्याला कळलें नाहीं!

मात्र, त्यानें दुसऱ्यांदा झाडलेली गोळी व्हाइट्फील्डला लागली याबद्दल त्याला शंका उरली नाहीं. कारण व्हाइट्फील्डनें किंकाळी फोडलेली त्यानें ऐकली, व त्याचें शरीर कोसळून पायऱ्यांवरून गडगडलें तें त्यानें पाहिलें!

त्याच क्षणीं एल्सीच्या खोलीचें दार धाड्कन् उघडलें गेलें व जिन्यावरून धांवत खालीं येतां येतां तिनें किंकाळ्या फोडल्या त्याहि त्यानें ऐकल्या...

त्यानें धूम ठोकली......

एकदीड फर्लांगाच्या अंतरावर अंधारांत एके ठिकाणीं त्याचा एक सांथीदार मोटार सज्ज ठेवून वाट पहात बसला होता. तेथें पोंचतांच तो मोटारमध्यें बसला व मोटार वेगानें चालू झाली.

त्या दोघांना वाटलें, आपण सुरक्षितपणें सुटलों !

पण तसें झालें नव्हतें.

कारण, त्याच वेळीं त्या रस्त्याला दोन कॉन्स्टेबल फेरी घालीत होते. इमारतींतल्या किंकाळ्या ऐकतांच त्यांपैकीं एक-जण इमारतीकडे धांवला, व मोटार एकदम सुरू होऊन अति-शय वेगानें गेलेली पाहून दुसरा तिच्या मागोमाग दोडत गेला.

त्यानें कोंपऱ्यावरच्या झगझगीत दिव्याच्या प्रकाशांत मोटारचा नंबर पहाण्याचा प्रयत्न केला, पण गाडीला नंबरची पाटी नस-ल्याचें त्याला दिसून आलें. मात्र गाडीचा टप अजीबात काढून ठेवलेला होता, येवढी खूण त्यानें लक्षांत ठेवली, व रस्त्यावर पुढें कोठें शिपाई असले तर त्यांना इशारा मिळावा म्हणून त्यानें आपली शिटी पांचसहा वेळां फुंकली.

शरच्चंद्राला व त्याच्या साथीदाराला त्या शिट्या ऐकूं आल्या व त्यांनीं गाडीला खूपच वेग दिला

आतां आपल्या बिऱ्हाडाकडे आपण गेलों, आणि कदाचित् आपला पाठलाग झाला, तर आपण सगळेच पोलिसांच्या हातांत सांपडूं, तेव्हां अगदीं भलतीकडेच कोठेंतरी जाणें इष्ट आहे असा त्या दोघांनीं विचार केला.

शरच्चंद्राच्या मित्रानें विचारलें,

"पण भलतीकडे म्हणजे कोणीकडे ?"

"पुण्याच्या रस्त्याकडे चल. आत्तांच्या आत्तां मुंबईपासून शक्य तितकं दूर आपण गेलों तरी पुष्कळ झालं."

"ठीक." असें म्हणून साथीदारानें गाडीला आणखी वेग दिला.

त्यांच्या मागोमाग शिटपा होत असलेल्या त्यांना ऐकूं येतच होत्या.

क्वीन्स रोड, सँढर्स्ट ब्रिज, अशा मार्गानें त्यांची गाडी चालली होती, ती हँगिंग गार्डनच्या चढणीच्या रस्त्यावरील झाडींत आली असतांना एकदम थांबली.

शरच्चंद्राच्या साथीदारानें खालीं उडी टाकून एंजिनशीं खटपट केली, व परत आंत बसून गाडी सुरू करण्याचा प्रयत्न केला. पण, ती कांहीं केल्या सुरू होईना. तो उद्‌गारला,

"घात झाला!"

"काय झालं रे?"

"पेट्रोल खलास!"

"ठीक. आतां तुला वाट फुटेल तिकडे तूं जा, मला वाट फुटेल तिकडे मी जातों; आटप."

त्या दोघांनीं खालीं उड्या टाकल्या.

त्याचा साथीदार कोणीकडे पळाला, तें शरच्चंद्राला धड दिसलेंहि नाहीं.

शरच्चंद्रानें क्षणभर जागच्या जागीं उभें राहून विचार केला, व मग त्याच्या मनांत एक कल्पना येतांच नेपियन सी रोडच्या बाजूला त्यानें धूम ठोकली.

विलासच्या बंगल्याच्या फाटकापाशीं तो पोंचला; तोंच आंतून एक टॅक्सी बाहेर पडली.

त्याला वाटलें, विलासच बाहेर कोठेंतरी निघाला आहे. म्हणूनच तो परतून पांचसहा पावलें टाकून ओरडला,

"विलास, ए विलास—"

विलासनें ओ दिलेली त्याला ऐकूं आली, पण ती मागच्या बाजूनें बंगल्याच्या बागेंतून.

विलास बाहेर जाण्याऐवजीं कोठून तरी नुकताच घरीं आला होता तर !....

शरच्चंद्र बागेंत घुसला. त्याचा पठाणी पोषाख पाहून दचकलेल्या विलासला पुरतें दचकण्यासहि त्यानें अवसर दिला नाहीं. त्याच्याजवळ जाऊन त्यानें त्याचा हात पकडला व म्हटलें,

"विलास, मी भयंकर संकटांत आहें; मला मदत कर."

"कोण, शरद ?"

"होय, शरद् ! चल आटप, तुझी गाडी काढ."

"माझी गाडी कारखान्यांत दुरुस्तीला टाकली आहे रे. पण हा तुझा वेष, अन् हें तुझं घाबऱ्या घाबऱ्या येणं, ही आहे तरी काय भानगड ?–"

"सगळं सांगतों. पण, एक मिनिटसुद्धां घालवूं नकोस. पोलिसांच्या हातीं जाण्यापेक्षां मला आधींच मरण आलेलं बरं. मला इथून दूर कुठंतरी ताबडतोब ने; किंवा तें होत नसेल, तर तूं आपल्या हातांनीं मला मारून टाक–"

"स्, असं बोलूं नकोस. माझी गाडी नसली, तरी दादांची मोठी गाडी आहे."

"शाबास ! आटप."

नंतर पांचच मिनिटांनीं दादासाहेबांची मोठी गाडी बंगल्या बाहेर पडली, आणि ताशीं चाळीस मैलांच्या वेगानें रस्त्याला लागली !

---

# प्रकरण २२ वें

दुसऱ्या दिवशीं सकाळपासून मुसळधार पाऊस सुरू झाला. दोनतीन तास अशी वृष्टि झाली, कीं जणुं सारें शहर धुऊन काढण्याचा वरुणराजानें निश्चय केला होता. मुंबईच्या साऱ्या रस्त्यांत पाणी खळाळूं लागलें. सखल भागांत गुडघा गुडघा पाणी होऊन ट्रॅमची रहदारी बंद झाली. उपनगरांच्या वाटा पाण्यांत बुडून जाऊन लोकल गाड्यांची जा-ये वेळेवर होईनाशी झाली. गर्द झाडांच्या फांद्यांवर आपापल्या घरट्यांत रात्रीं आसऱ्यासाठीं शिरलेल्या पक्ष्यांना बाहेर पडतां येईना, आणि घरट्यांतहि थंडीनें काकडून काकडून पंखांत खुपसलेल्या त्यांच्या चोंची बंद झाल्या, आणि माणसांचे नित्याचे व्यवहारहि बरेचसे बंद पडून, व सूर्यप्रकाश जवळ जवळ नाहींसा होऊन एखाद्या लढाऊ शत्रूप्रमाणें महाभूतांनीं सारें शहर आपल्या ताब्यांत घेतल्यासारखी अवकळा जिकडे तिकडे पसरली.

आणि अखेर ती मुसळधार थांबली, तरी पाऊस थांबला नव्हताच. झिमझिम सुरूच होती. आकाश ढगांनीं भरलेलें होतें. सूर्य दिसत नव्हता. वादळी वारा घोंगावत होता.

दादासाहेबांना आज कचेरी नव्हती.

ते पुनःपुन्हा नोकराला वर बोलवीत, आणि विचारीत,

" विलास आला काय ?"

आणि त्यानें नकारार्थी मान हालविली, कीं ते स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत, आणि टेबलावरचे कामाचे कागद पाहूं लागत.

एकदोन वेळां सुदेष्णाबाईंसहि वर हांक मारून त्यांनीं त्यांस विलासबद्दल विचारलें, व जणुं विलास रात्रीं गेला, तो अजून परत आला नाहीं, हा सुदेष्णाबाईंचाच दोष होता, अशा अर्थाचें भाषण केलें.

त्यांची पत्नी नेहमीप्रमाणें स्तब्ध राहिली.

दुपारच्या जेवणाची वेळ टळून गेली, तरी विलास घरीं आला नाहीं, किंवा टेलिफोनवर त्याचा काहीं निरोपहि आला नाहीं, तेव्हां मात्र सुदेष्णाबाई अतिशय सचिंत झाल्या, आणि दादासाहेबांच्या मनांतहि मुलाबद्दलच्या रागाऐवजीं हळुहळु चिंता डोकावूं लागली

हळुहळु तिसरा प्रहर उलटून चार साडेचार झाले, तेव्हां पतिपत्नी मनांतल्या मनांत फारच अस्वस्थ झालीं. आपल्या पुत्राविषयीं विचार करण्याच्या त्याच्या नेहमीच्या वृत्तीतील भिन्नता नाहींशी होऊन दोघेंहि एकाच चिंतेनें अस्वस्थ झालीं; आणि चमत्कारिक खरेंच, पण त्यायोगे दोघांमधील एरवीं विशेष प्रगट न होणारा निकट भाव या वेळी प्रगट झाला. प्रेमच नव्हे, तर हर्ष, शोक, विषाद, खिन्नता, कोणत्याहि विकाराचा दोन अंतःकरणांत एकदम उद्‌भव झाला की तीं अशीच परस्परांकडे ओढली जातात !

चहाच्या वेळीं सुदेष्णाबाई म्हणाल्या,

"खालीं आचाऱ्यानं चहा ठेवला आहे. चलायचं ना ?"

"नको. मला आज चहाची इच्छा नाहीं."

"हें काय ? विलास संध्याकाळपर्यंत खचित घरीं येईल. उगीच काय काळजी करायची ?"

"काळजी मी करतों आहें का तुम्ही जास्ती करतां आहांत ? दरवाजांत सारखं कोण उभं राहिलं होतं, तें मला माहीत आहे"

नंतर पांच वाजतां खालीं एक टेलिफोन आला. तो घेऊन सुदेष्णाबाई वर पतीकडे गेल्या आणि म्हणाल्या,

"आत्तां साडेपांच वाजतां कसली मीटिंग आहे काय ? टेलिफोनवरून आठवण केली आहे त्यांनीं."

" माझ्या लक्षांत होतं; पण मी जाणार नाहीं मला कांहीं सुचत नाहीं आज ! विलास अजून आला नाहीं."

" येईल. रात्र व्हायच्या आंत तो खास येईल."

" मला धीर द्यायसाठीं तुम्ही कहींतरी बोलतां आहांत."

" तसं नाहीं. मनातल्या मनांत मला खरंच तसं वाटतं आहे. ती पहा गाडी वाजली."

दादासाहेबांनीं झट्कन् खुर्चीवरून उठून खिडकीजवळ जाऊन वांकून पाहिलें, तों खरोखरच एक मोटार त्यांच्या बंगल्यांत शिरली.

सुदेष्णाबाईंनीं पाठीमागून अधीरतेनें विचारलें,

"विलासच ना ?"

" नाहीं." आंत वळून न पहातां दादासाहेबांनीं म्हटलें, " ही दुसरी कोणाची तरी मोटार दिसते आहे."

मोटारीतून दोन पोलीस सार्जंट उतरून आंत शिरतांना दिसतांच दादासाहेबांनीं आश्चर्याचा उद्गार काढला, आणि ते खोलींत परत वळले.

"कोण आल ?" असें सुदेष्णाबाईंनीं विचारलें. पण ते फक्त म्हणाले,

"तुम्हांला आतां खालीं जावं लागेल."

सुदेष्णाबाई खालीं जावयासाठीं खोलींतून बाहेर पडल्या. वर येऊं लागलेले सार्जंट त्यांना जिन्याच्या पायथ्याशीं भेटले. हे लोक येथें कां आले असावेत, अशा आश्चर्यानें त्याजकडे पाहून त्या खालच्या दिवाणखान्यांत शिरल्या.

सार्जंट वर जाऊन दादासाहेबांनीं पुढें केलेल्या खुर्च्यांवर बसले, व कांहीं वेळ स्तब्ध राहिले.

मग त्यांपैकीं एकजण म्हणाला,

"तुम्हीं आम्हांला माफ केलं पाहिजे. तुमच्या मनाला त्रास होईल, अशी एक गोष्ट करण्यासाठीं आम्ही आलों आहोंत."

दादासाहेब काहींच न बोलतां त्यांच्याकडे पहात राहिले.

सार्जंट पुढें म्हणाला,

" काल रात्रीं तुमच्या मुलानं जस्टिस व्हाइट्फील्डवर गोळ्या झाडल्या; त्याला पकडायसाठीं वॉरंट घेऊन आम्ही आलों आहोंत. "

विजेच्या धक्क्यानें स्तंभित झाल्याप्रमाणें दादासाहेब सार्जंट-कडे पहात क्षणभर स्तब्ध बसले.

मग शुद्धीवर येत चाललेल्या माणसाप्रमाणें हातापायांची हालचाल करून त्यांनीं विचारलें,

" पण विलासवरच वॉरंट काय म्हणून काढलंत ? काहीं पुरावा ? "

" पुरावा अगदीं बिनचूक सांपडला आहे; पण तो तुम्हांला सांगायला आम्ही बांधलेले नाहीं. विलास कुठं आहे तेवढं सांगा. घरांतच आहे काय ? "

" नाहीं. "

" मग कुठं आहे ? "

" मला माहीत नाहीं. काल रात्रीं तो बाहेर गेला, तो अजून आला नाहीं. "

" बाहेर कुठं गेला तें सांगून गेला काय ? "

" नाहीं. "

" तुम्हीं विचारलं नाहीं काय ?"

" नाहीं. "

" कोणाबरोबर गेला ?"

" माहित नाहीं. "

" चालत गेला काय ?"

" नाहीं. मोटारींतून गेला. "

तें ऐकतांच, गुन्हेगार मुंबईतून पसार झाला असला पाहिजे, ही एकच कल्पना दोघांहि सार्जंटांच्या मनात येऊन त्यांनीं एक-मेकांकडे पाहिलें.

आतां पुढें काय करावें, याविषयीं ते एकमेकांत कुजबुजूं लागले, तोंच बंगल्याच्या आवारांत शिरणाऱ्या मोटारचा आवाज आला.

दादासाहेबांनीं आवाजावरून मनांतल्या मनांत ओळखलें, कीं खचित विलासच आला असला पाहिजे. पण त्यांच्या तोंडून कसलाच उद्‌गार बाहेर पडला नाहीं. कारण, तो या क्षणीं यावा, यात त्यांना मुळींच आनंद वाटण्यासारखा नव्हता. इतकेंच नव्हे, तर त्याच्या येण्याविषयीं त्याचें मन मघांसारखें उत्सुकहि राहिलें नव्हतें.

खालीं सुदेष्णाबाईंची मनःस्थिति मात्र निराळी झाली होती. त्यांच्या मनाची आतांपर्यंतची उत्सुकता कायम होती; व पोर्चमध्यें वेगानें येऊन थडकलेल्या गाडीतून विलास खालीं उतरलेला दिसतांच त्यांची दिवसभर वाहिलेली चिंता एकदम नाहींशी झाली, व त्याचें अंतःकरण एकदम आनंदित झालें.

धांवत पुढें येऊन त्यांनीं म्हटलें,

" काय भिजला आहेस रे हा ! "

" वाटेनं सारखा पाऊसच लागला ग. आई, मला अगदीं गरम गरम पाण्यानं स्नान करायचं आहे हं. अन् मग अगदीं गरमागरम चहा. "

असें म्हणून विलास आपल्या वरच्या खोलीकडे धांवला.

सुदेष्णाबाईंनीं सांगितल्यावरून नोकरानें लगबगीनें वर दादासाहेबांकडे जाऊन विलास आल्याची वर्दी दिली.

ती ऐकून दादासाहेब नोकराला म्हणाले,

" ठीक आहे. त्याला म्हणावं मीं इकडे लवकर बोलावलं आहे. "

आपलें काम आतां साधत आहे, अशी आशा वाटून दोघां सार्जंटांचे चेहरे प्रफुल्लित झाले.

कांहीं वेळानें विलास स्वतःच जेव्हां त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला, तेव्हां तर त्यांच्या चेहऱ्यावरची ती प्रफुल्लता अधिकच वाढली.

मघांशीं दादासाहेबांशीं बोलणारा सार्जंट विलासला म्हणाला,

"तुमची एक रेसिंग मॉडेलची मोटारगाडी आहे काय?"

विलासनें त्यांच्याकडे तीक्ष्ण नजरेनें पाहिलें व विचारलें,

"तुम्ही काय म्हणून मला हा प्रश्न करीत आहांत?"

"तुमच्यावर पकडवॉरंट आहे."

"मग मला पकडा तर; प्रश्न कसले करतां?"

"प्रश्न येवढ्याचसाठी, कीं गुन्ह्याच्या जागीं जो रिव्हॉल्व्हर सांपडला, तो तुमचा असल्याबद्दल जशी लायसेन्स रेकॉर्डवरून आमची खात्री झाली, तशीच गुन्हा करून पळून जाताना पेट्रोल सरलं म्हणून वाटेंत टाकून दिलेली गाडी तुमचीच होती कीं नाहीं, याची आम्हांला खात्री करून घ्यायची आहे. गाडीच्या नंबराची पाटी तुम्हीं नाहीशी केली होती खरी, पण आंत पेट्रोल कंपनीच्या हिशोबाचीं बिलं होतीं, त्यावरून गाडीचा नंबर, आणि मालक सगळं कांहीं आम्हांला कळलं आहे."

"कळलं आहे, तर मग विचारीत कशाला बसलां आहांत?

विलासनें निश्चयी आणि कठोर स्वरानें विचारलें

नंतर पंधरावीस मिनिटांनीं तो त्या दोघां सार्जंटांबरोबर त्यांच्या गाडींत बसून गेला.

ooo ooo ooo

विलासला कच्च्या कैदेंत ठेवण्यासाठीं पोलिसांकडून मॅजिस्ट्रेट-पुढें उभें करण्यांत आलें.

त्याच वेळीं गुन्हा घडला तेव्हां त्या ठिकाणीं जी जी मंडळी हजर होती, त्या सर्वांस जबाब देण्यासाठीं तेथें आणण्यांत आलें होतें.

त्या मंडळींत एल्सीहि बसलेली होती.

आपल्याला पहातांच ती फार दचकली, व तिनें खालचा ओंठ चावून विचित्र प्रकारें मान हालविली, असें विलासला वाटलें.

तिच्या दचकण्याचें विलासला आश्चर्य वाटलें नाहीं...

आतां त्याला पाहून जो तो असाच दचकणार होता लोकांनीं दचकावें व आपण तें पहावें, अशी संवय त्याला करावयाची होती....

तिच्याकडे पाहून शिष्टाचाराप्रमाणें हास्य करावें, व 'Good evening' असें म्हणावें असें त्याच्या मनांत आलें. पण, तितक्यांत त्याला आठवण झाली, कीं आपण मॅजिस्ट्रेटपुढें उभे आहोंत. येथें उभा असणारा मनुष्य फिर्यादी, आरोपी, साक्षीदार, यांखेरीज दुसरें कांहीं असूं शकत नाहीं. त्याचें सामान्य मनुष्यत्व लोपलेलें असतें. सामान्य शिष्टाचारांचा व त्याचा कांहीं संबंध उरलेला नसतो.

त्याला पोलिसांनीं सांगितलें, तेथें तो उभा राहिला. मॅजिस्ट्रेटनें त्याचें नांव, वय, जात, धंदा, इत्यादींबद्दल प्रश्न विचारले. त्यांचीं त्यानें उत्तरें दिलीं. पण, नंतर जेव्हां मॅजिस्ट्रेटनें विचारलें,

" जस्टिस व्हाइट्फील्डवर तुम्हीं गोळ्या झाडल्या, असं पोलिसांचं म्हणणं आहे. त्याबद्दल तुम्हांला कांहीं जबाब द्यावयाचा आहे काय ?"

तेव्हां मानसुद्धां न हालवितां विलास म्हणाला,

" नाहीं."

मॅजिस्ट्रेटनें त्याच्याकडे विस्मयपूर्ण कटाक्ष टाकला.

पण लगेच जबाब देणें न देणें ही गुन्हेगाराच्या मर्जीची गोष्ट आहे, असा त्यानें विचार केला, व पोलिस ऑफिसरकडे वळून म्हटलें,

"तुम्ही कोणाकोणाचे जबाब मला दाखल करून घ्यायला सांगणार आहात ? त्यांना एकेकांना पुढं आणा. झटपा."

प्रथम दोन कॉन्स्टेबल पुढें आले; त्यांपैकीं एकानें सांगितलें,

"काल रात्रीं गुन्हा घडला त्या वेळीं त्या भागांत मी राउंडावर होतों. इमारतीतल्या किंकाळ्या ऐकतांच मी तेथें धांवत गेलों. जिन्याच्या पायथ्याशी बराचसा अंधार होता. पण, तेथें एक साहेब गोळी लागून पडलेला मला दिसला. ( एल्मीकडे बोट दाखवून) या बाई वरून धांवत आल्या. त्या मला म्हणाल्या, 'हें काय ? ह्यांना कोणी मारलं ?' तेव्हां मीं म्हटलं, 'मला माहीत नाहीं.' आम्हीं दोघांनीं मिळून साहेबाला उठविण्याचा प्रयत्न केला. तितक्यांत या बाईंच्या हातांतील टॉर्चच्या उजेडांत एक रिव्हॉल्व्हर मला दिसला तो मी उचलून घेतला. नंतर आमच्या ऑफिसरांना मीं टेलिफोन केला, व ते आल्याबरोबर रिव्हॉल्व्हर त्यांच्या स्वाधीन केला. ( टेबलावर ठेवलेला रिव्हॉल्व्हर दाखवून ) हाच तो रिव्हॉल्वर. आमच्या ऑफिसरनीं मला टॅक्सी आणावयास सांगितली, ती मीं आणली. गोळी लागलेल्या इसमास टॅक्सींत घालून त्यांनीं हॉस्पिटलकडे नेलं. त्यांच्याबरोबर या बाईहि गेल्या."

दुसऱ्या कॉन्स्टेबलनें जबाब दिला कीं, आपण गुन्ह्याच्या वेळीं त्याच भागांत राउंडावर होतों; इमारतींतून किंकाळ्या ऐकूं आल्या; त्याच वेळीं एक मोटार वेगानें सुटलेली दिसली, म्हणून आपण तिच्या पाठोपाठ धांवलों. तिला नंबराची पाटी नव्हती. पण, तिला टप नव्हता, हें आपण ध्यानांत ठेवलें. बाहेर उभी असलेली जी मोटार आपणांस दाखविण्यांत आली तीच ती. तिच्यांत काल रात्री बसलेली माणसें न्याहाळतां आली नाहींत. पण मोटार हांकणाऱ्या माणसाचें डोकें मागच्या बाजूनें दिसलें तें ( विलासकडे

बोट दाखवून ) याच्या डोक्यासारखच वाटलें । शेजारी कोणीतरी पठाण बसला होता असे वाटते.

यानंतर पेडर रोडच्या चौकीवरील पोलिसांचा जबाब झाला. त्यांत त्यांनीं हँगिंग गार्डनच्या रस्त्याला सोडून दिलेली गाडी आपणांस कशी सांपडली, त्याची हकीगत सांगितली.

नंतर हॉस्पिटलमधील ज्या डॉक्टरांनी जस्टिस व्हाइटफील्डला रात्रीं इस्पितळांत घेतलें होतें, त्यांनी जबाब दिला, व त्याला इस्पितळांत आणून सोडलें, त्या वेळच्या त्याच्या स्थितीचें, त्याच्या जखमेचें, व आपण केलेल्या उपचारांचें त्यांनीं वर्णन केलें.

असे आणखी दोनतीन जबाब झाले, व अखेर एल्सीला मॅजिस्ट्रेटपुढे उभे करण्यांत आलें.

तिनें व्हाइटफील्ड आपल्या खोलींतून किती वाजतां बाहेर पडला, नंतर तो खाली कसा गेला, आपल्याला पिस्तुलाचे बार कसे ऐकू आले व खाली धांवत गेल्यावर जिन्याच्या पायथ्याशीं आपल्याला काय काय गोष्टी आढळून आल्या त्याची हकीगत सांगितली, व अखेर विलासकडे बोट दाखवून ती म्हणाली,

“यांचच हे कृत्य असलं पाहिजे असं मला वाटतं ”

ते ऐकतांच क्षणैक वेळ निश्चल आणि निर्विकार राहिलेल्या विलासची चर्या एकदम पालटली! इतर मारेकऱ्याप्रमाणेंच आपला जीवश्चकंठश्च मित्र ब्रूटस् यानेंहि कट्यार उगारलेली पाहून सीझरला जो विस्मय वाटला होता म्हणतात त्यासारखाच विस्मय विलासला वाटला असला पाहिजे. त्यानें व एल्सीनें ज्या कित्येक आनंदाच्या घटका एकत्र घालविल्या होत्या, त्या सर्वांची तेवढ्या क्षणार्धांत त्याला आठवण झाली. एल्सीनें त्याच्याशीं नेहमींच प्रेमाचें वर्तन केलें होतें, अत्यंत अनुरक्त, आर्जवी आणि लाचार प्रेयसी कशी असते, याचा अनुभव तिच्या संगतींत त्याला अनेकदां मिळाला होता. त्यानें स्वतः

'तिची प्रेमपिपासा कित्येक प्रसंगीं अतृप्त ठेवली असली तरी तिच्याशीं दुष्ट वर्तन कधींच केलें नव्हतें. असें असतांना तिनें— ज्या एल्सीचें मस्तक त्याच्या वक्षस्थलावर कितीदां तरी बेहोषपणें विसावलें होतें, त्या एल्सीनें— खुशाल खुनी इसम म्हणून आपला अंगुलि-निर्देश करावा, याचें विलासला विलक्षण आश्चर्य वाटले. तिनें असें कां करावें, तें त्याला क्षणभर समजले नाही. मात्र दुसऱ्याच क्षणीं ज्या प्रसंगीं आशेला अर्पण केलेलें मन एल्सीच्या संपर्कांतून अलिप्त ठेवून पवित्र राखण्यासाठी तो निग्रहाने तिला निराश करून सोडून आला होता, त्या प्रसंगाची त्याला आठवण झाली, व लगेच एल्सीच्या आत्तांच्या वर्तनाचा उलगडा झाल्यासारखं त्याला वाटले. अतृप्त कामिनीचा हा सूड होता, हें त्याला समजलें !

त्यानें मॅजिस्ट्रेटकडे पाहिले, तो तो एल्सीला विचारीत होता,

"याच माणसानं व्हाइट्फील्डवर गोळ्या झाडल्या, असं तुम्हांला कां वाटतं, याची कारणं सांगायचीं असलीं तर सांगा."

क्षणभर विचार केल्यासारखें करून एल्सी म्हणाली,

"सांगतें. एक तर व्हाइट्फील्ड वरचेवर माझ्याकडे येत असत, हें माहीत असणारा विलास हा एकटाच मनुष्य होता अशी माझी समजूत आहे. शिवाय, व्हाइट्फील्डवर विलासचा रोष होता. कारण, पूर्वीं तो माझ्याकडे येत असे. परंतु व्हाइट्फील्डचा व माझा स्नेह झाल्यापासून मी त्याला येण्याची बंदी करूं लागलें होतें. ज्या दिवशी तो माझ्याकडे अखेरचा आला, त्या दिवशी माझ्या खोलींत असलेल्या व्हाइट्फील्डच्या फोटोकडे तो अगदी निरखून निरखून पहात होता. असं तसं का करीत होता, हे आतां उघडच झालं."

खोटें बोलण्याची तिची ती सफाई आणि धाडस पाहून विलासच्या मनांत आलें, चिडलेल्या नागिणीचें स्वरूप स्त्रीनें धारण केलें, कीं ती इतकी भयंकर होऊं शकते तर ?....

एल्सी मॅजिस्ट्रेटपुढून दूर झाली.

मॅजिस्ट्रेटनें पोलीस अधिकाऱ्यांस विचारलें,

"आणखी कोणाचा जबाब घ्यायचा आहे ?"

"नाहीं."

मॅजिस्ट्रेटनें विलासकडे पाहून विचारलें,

"दोन प्रश्नांचीं उत्तरं तुम्हीं दिलीं पाहिजेत. हा रिव्हॉल्व्हर तुमचा आहे काय ?"

"होय."

"पोलिसांनी पेडर रोडवर पकडलेली रेसिंग मॉडेलची मोटारगाडी तुमची आहे काय ?"

"होय."

"तुम्हाला पुन्हा विचारतो, तुम्हांला आणखी कांहीं सांगायच आहे काय ?"

"नाहीं."

"ठीक" असें म्हणून मॅजिस्ट्रेटनें पोलीस अंमलदारास विचारलें,

"जस्टिस व्हाइट्फील्डचा जबाब दाखल करून घेण्याची कांहीं व्यवस्था तुम्हांला करतां येईल काय ?"

"सध्या तरी शक्य नाहीं."

"पण त्यांचा जबाब फार महत्वाचा आहे, असं नाहीं का तुम्हांला वाटत ?"

"वाटतं, पण सध्यां तो घेणं अशक्य आहे. डॉक्टरनीं सांगितलेलं आपण ऐकलंतच, कीं व्हाइटफील्ड बेशुद्ध पडून आहे. आज दुपारींच तो प्रथम शुद्धीवर आला. पण ती शुद्धि दीडदोन मिनिटंच टिकली. जबाब देण्याइतकी शुद्ध अन् ताकद त्याला यायला अवधि लागेल."

"ठीक आहे. आणखी कांहीं ?"

"आणखी कांहीं नाहीं. या गृहस्थांना कच्च्या कैदेंत ठेवण्याचा आपला हुकूम आम्हांला पाहिजे."

" समजलो. "

जबाब द्यावयास आलेली इतर मंडळी स्वतंत्रपणे आपापल्या घरीं निघून गेली.

आपण स्वतंत्र नाही, ही कल्पना विलासला त्या क्षणीं प्रथमच तीव्रतेनें जाणवली. कच्च्या कैदेची कोठडी दृष्टीपुढें आणण्याचा त्यानें प्रयत्न केला. आतां ती फारशी दूर नव्हती.

मॅजिस्ट्रेटने पोलीस अधिकाऱ्यांस म्हटलें

" मी फक्त सातच दिवसांना रिमँड देईन. "

" काही हरकत नाही. तेवढी मुदत आम्हाला पुरे आहे. "

मॅजिस्ट्रेटने खाली वांकून टांक उचलला, तोंच विलासचे वडील तेथें आले. त्यांच्याबरोबर एक नामांकित वकील होते.

विलासला जामिनावर सुटें ठेवण्याची त्यांनीं मागणी केली

मॅजिस्ट्रेटनें किंचित् विचार केला, व जामिनाच्या रकमेचा आंकडा सांगितला.

दादासाहेबांनीं ती रक्कम ताबडतोब भरली, व विलासला त्यांनीं घरीं नेलें.

पण, त्या प्रशस्त, सुंदर बंगल्यांत आता भरपणा राहिला होता कोठें?

माता, पिता आणि पुत्र यांपैकी कोणाचेंच कोणाशीं संभाषण होऊ शकत नव्हते. जो तो आपापल्या जागी आपापल्या विचारांत मग्न होऊन बसला होता. घरांतला सारा आनंद नाहींसा झाला होता! घरांत माणसें असून नसल्यासारखें वाटत होतें. बाहेर पाऊस अजूनहि पडतच होता. सुदेष्णाबाईंनी मध्येंच दरवाजांत येऊन पाहिलें, तों पावसाच्या पाण्यानें निथळणारीं बगीचांतील झाडें अंधारांत भेसूर दिसत होतीं. त्या झट्‌कन् वर आपल्या खोलींत गेल्या व बाहेरच्या पावसाची सारखी चालू असलेली अपशकुनी ठिप्‌ठिप् कानांवरसुद्धां येऊं नये, म्हणून त्यांनीं सगळ्या खिडक्या लावून घेतल्या. .

---

# प्रकरण २३ वें

ज्या कारखान्यांत विलासनें आपली गाडी दुरुस्तीसाठीं टाकली होती, त्या कारखान्याचा पारशी मालक आदितवारच्या सुटीनंतर सोमवारीं आपल्या ऑफिसमध्यें आला, व आपल्या खुर्चीवर बसला नाहीं नोंच एक नोकर तेथें येऊन त्यास म्हणाला,

" साहेब, एक मोठा घोंटाळा झाला आहे. "

" घोंटाळा ? मंजे तुमी कसा मनते ?"

" ती Y 998 नंबरची रेसिग मॉडेलची गाडी–"

" हां, ती तर आज मंध्याकाळच्या वक्ताला एकदम फिट तयार झाली पायजेल. "

" पण साहेब, ती तयार करणार कशी ?"

" अरे काय तुमी लोक ! त्येचा हूड शिवून तयार झाला असल तो फिट बसवायचा, अन् पेट्रोल टँकमंदी लीकेज हाय ते काढून टाकायचं, येवढीच गोष्ट आतां बाकी हाय–"

" साहेब, तें मला माहीत आहे. पण, कारखान्यांत गाडीच कुठं आहे ?"

" काय ? तुमी सांगते काय ?"

" खरंच साहेब, गाडी शेडमधें नाही. "

" असा होईल कसा ? हेड्मिस्त्रीला बोलवा. "

हेडमिस्त्री आल्यावर मालकानें विचारलें,

" Y 998 शेडमंदी हाय का नाय ? "

" नाहीं. "

" मंग ती कुठं गेली ? "

" माझ्या हाताखालचा पंजाबी मिस्त्री सांगतो, कीं शनिवारीं त्यानं ती ट्रायलसाठीं बाहेर काढली होती, तेव्हां रस्त्यांत तिचे मालक भेटले, त्यांनीं ती आपल्याला जरुरीच्या कामासाठीं पाहिजे आहे, सोमवारीं परत आणून टाकतों, असं सांगून नेली. "

मालकानें नाकापाशीं नेलेली तपकिरीची चिमूट फेंकून देऊन म्हटलें,

" अरे साला, काय तुमी लोक घोंटाळा करते ! मालक रस्त्यामंदी भेटला म्हणून काय झाला ? इकडे ऑफिसमंदी वर्दी दिल्याबगर गाडीची अशी डिलिवरी देते काय ? त्या पंजाबी मिस्त्रीला बोलवा. "

" साहेब, तो सिक लीव्हवर आहे. "

" तोबा तोबा ! आतां आम्हीं काय करेल ? मालकाबदली कुणीं मवाल्यानं गाडी लंबे केली असली मंजे भरली का आमची उमर ? "

" साहेब, गाडीच्या मालकांना टेलिफोन तर करून पहा. "

" हां हां. "

असें म्हणून मालकानें विलासचा टेलिफोन नंबर बुकांत पाहिला, व टेलिफोनवर विलासचा आवाज ऐकूं येतांच म्हटलें,

" हॅलो, शेठ, एक गोष्टी विचारायची हाय तुमाला. "

" काय ?"

" तुमची Y 998 गाडी तुमच्याकडेच हाय ना ?"

" कां ?"

" तिचा फिटिंग रिपेरी अजून थोडा बाकी हाय. आमचा हेड्मिस्त्री आमाला सांगते, कीं आमचा पंजाबी मिस्त्री गाडीची ट्रायल घेत होते, तवा तुमी त्याला भेटले, अन् त्येच्यापासून ती नेली. हे खरी वार्ता काय ?"

" अं...हो. "

" शेठ, तो गाडी आज वापस आणून देते ना तुमी ? पेट्रोल टँकमंदी लीकेज हाय अजून तसाच. "

" असूं दे, असूं दे. "

" शेठ त्येला काय ? अर्धा कल्लाकामंदी होऊन जाईल काम. कवा घेऊन येते गाडी तुमी ? आं ?... आं..."

पण दुसऱ्या टोंकास टेलिफोन बंद झाल्याचा आवाज ऐकूं आला.

मालकानें ' हॅलो, हॅलो ' असें दोनतीनदां केलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

त्या गोष्टीचें मालकाला फार आश्चर्य वाटलें. पण, गाडी कोणीं मवाल्यांनीं तर लांबविली नाही ना, अशी जी भीति आपल्याला वाटली होती, ती निराधार ठरल्याचें पाहून त्याचा जीव पुष्कळसा खालीं पडला.

त्याने हेडमिस्त्रीस व नोकरास जावयास सांगितलें, आणि आतां आपल्याला निर्वेधपणें तपकीर ओढण्यास कांहीं हरकत नाहीं, अशा विचारानें त्यानें डाव्या हातांतील चांदीच्या डबीवर बोट मारून ती उघडली.

००० ००० ०००

टेलिफोन बंद करून विलास वर आपल्या खोलींत गेला.

सकाळचीं वर्तमानपत्रें त्याच्या टेबलावर पडलीं होतीं. त्यांतील व्हाइट्फील्डवर प्राणघातक हल्ला केल्याबद्दल त्याला पकडल्याच्या कमीअधिक सविस्तर हकीगती त्यानें सकाळींच वाचल्या होत्या. त्यांकडे पाहून तो स्वतःशींच हंसला.

सिगरेटच्या डब्यांतील एक सिगरेट काढून त्यानें शिलगाविली. ती पेटवितांना टेबलावरच्या आरशांत त्याला स्वतःचा चेहरा दिसला, व आपण दोन दिवसांत दाढी केली नाहीं हें त्याच्या लक्षांत आलें. आपल्या गालावरून हात फिरवितां फिरवितां त्यानें विचार केला, कीं नोकराकडून दाढीसाठीं गरम पाणी मागवावें.

त्यानें नोकराला हांक मारली.

पण तितक्यांत त्याच्या मनांत आलें, आतां हे असले सोपस्कार काय करावयाचे आहेत ? पुढच्या सोमवारीं आपल्यावरील खटला चालूं होईल, कदाचित् झटपट संपेलहि, आणि मग...

नोकर आला, त्याला तो म्हणाला,

"कांहीं नाहीं. जा."

तो एका खिडकीजवळ जाऊन उभा राहिला.

आज हवा बदलली होती.

पाऊस तर बंदच झाला होता, पण आकाशांत ढगांचाहि मागमूस उरला नव्हता. आकाश स्वच्छ होतें; आणि जणुं दुसऱ्याला आनंद देणाऱ्या माणसाला ज्याप्रमाणें स्वतःलाहि आनंद होतो, त्याप्रमाणें आदल्या दिवशीं खालची सृष्टि धुऊन काढल्यानें आकाशहि स्वतः धुऊन निघाल्यासारखें होऊन त्याचा निळेपणा विशेष खुलून दिसत होता. शर्यतींत धांवलेल्या माणसानें नंतर विश्रांतीसाठी बसल्यावर सावकाश श्वास सोडावा, त्याप्रमाणें काल रात्रंदिवस वादळी उन्मादानें घों घों करून धांवलेला वारा आतां थकून विसावत बसल्याप्रमाणें त्याची एखाददुसरी मंद झुळूक मधूनच हवेंत तरंगत होती.

विलासच्या मनांत आलें, काल याच वेळीं कसल्या तुफान पावसांतून आपण आणि शरच्चंद्र जात होतों! पाऊस चहूं बाजूनीं झोडीत होता, हमरस्त्यावर जिकडे तिकडे पाणी झालें होतें, वादळी वाऱ्यानें ओरबडलेल्या झाडांच्या लहानमोठ्या फांद्या कित्येक ठिकाणीं रस्त्यावर आडव्या पडल्या होत्या, आणि ताशीं पस्तीस चाळीस मैलांच्या वेगानें आपण गाडी सोडली होती....

पण गेलें तें वादळ! संपलें! आपला प्रिय मित्र शरच्चंद्र एव्हांना गोव्याच्या हद्दींत जाऊन पोंचलाहि असेल!......

त्याचा अखेरचा निरोप घेते वेळीं बेळगांवला त्याच्याशीं झालेलें संभाषण विलासला पुनःपुन्हा आठवत होतें.

"विलास, तुझे आभार कसे मानूं, मला कळत नाहीं!"

असें म्हणून शरच्चंद्रानें त्याचा हात आपल्या दोन्ही हातांत अगदीं घट्ट धरला होता.

"शरद्, वेडया, आभार कसले मानतोस ?"

"अरे, शद्बांनीं आभार मानले नाहींत तरी कृतज्ञतेनं माझं ऊर भरून आल्याशिवाय राहील का ? मृत्यूतून तू मला सोडवलंस असं मी म्हणत नाहीं. कारण, मरणाच्या भीतीनं मला इकडे आणायला मी तुला सांगितलंच नाही. पण पोलिसांच्या हातांत सांपडण्याची विटंबना मला मरणाहून अधिक असह्य वाटली असती. तिच्यांतून तू मला वांचवलंस, हे तुझे केवढे उपकार झाले ! ते मला जन्मोजन्मीं तरी विसरतां येतील का ? आतां मी निर्भयपणानं राहूं शकेन. परदेशांत आणि अज्ञातवासांत असलों तरी निदान मोकळा राहीन. अन् त्याचा काय नियम, दहावीस वर्षांनीं माझ्या कृत्याचा सरकारला विसर पडला असं वाटलं आणखी वादळ नाहींसं झाल्यासारखं दिसलं, तर कदाचित् परत मुंबईस येऊन.... तुमच्या सगळ्यांच्या... गांठीभेटीहि घेतां येतील !"

हें बोलतां बोलतां 'तुमच्या सगळ्यांच्या' या शब्दांवर तो किंचित् घोंटाळला, त्यावरून त्याला वास्तविक आशेचें नांव घ्यावयाचें असलें पाहिजे, अशी विलासची कल्पना झाली होती, व तो म्हणाला होता,

"दहावीस वर्षं !...... केवढा तरी हा अवधि ! तुझ्या वाटेकडे लागलेली बिचाऱ्या आशेची दृष्टि थकून जाईल ! शरद्, अविचाराच्या भरांत हें काय करून बसलास ?"

"विलास, जें माझ्या हातून घडलं, त्याला अविचारी म्हणायला मी केव्हांच तयार होणार नाहीं ! फक्त त्याचा उपसर्ग माझी इच्छा नसतांहि तुला पोंचला याबद्दल मला काय तो खेद होतो. पण मित्रा, माफ कर. बहुतेक हा अखेरचाच उपसर्ग असेल. माझ्या अत्याचारी कृत्याची हकीगत आशेला सांगशील तेव्हां— "

"नाहीं नाहीं. शरद्, ती तिला सांगणं माझ्याकडनं कधींच व्हायचं नाहीं."

"कां ? माझी हरकत आहे, असं तुला वाटतं ?"

"तसं नाहीं. पण...... "

येवढेंच बोलून विलास गप्प झाला होता.

आशेच्या शरच्चंद्रावरील प्रेमाची जी कल्पना त्यानें केली होती, तिला अनुसरून त्यानें मनांतल्या मनांत केव्हांच ठरविलें होतें की, मुंबईस परत गेल्यावर शरद्च्या कृत्याबद्दल अगर ठावठिकाणाबद्दल एक अवाक्षरहि आशेजवळ बोलावयाचें नाहीं. सरकारी शासनापासून तर शरच्चंद्राचें संरक्षण त्याला करावयाचें होतेंच, पण आशेचें त्याच्यावरील प्रेमहि अचल रहावें, म्हणून त्याला झटावयाचें होतें. शरच्चंद्र अज्ञात राहिला तरी सदैव आशेच्या प्रेमांत राहिलेला पहाणें हें त्याचें मित्रकर्तव्य होतें. त्या दोघांमधील परस्पर प्रेमभाव त्याला जतन करावयाचा होता. स्वतःचें आशेवरील प्रेम व्यक्त करण्याचा येवढाच काय तो प्रकार त्याला उपभोगावयास मिळणार होता; व वाटेल तो त्याग करावा लागला, तरी तो करून आपल्या मुक्या प्रेमाचें असें समाधान करायचें त्यानें ठरविलें होतें! आणि हें सारें करण्यांत जितका अपूर्व आनंद होता तितकाच वाचेवाटें त्याचा उच्चार न करण्यांत होता! सत्संकल्पांत आनंद तर असतोच; परंतु तो संकल्प मनांतल्या मनांत ठेवण्यानें त्या आनंदाला केवढीतरी शुद्धता आणि पवित्रता येते!....

म्हणून विलास अधिक बोलला नव्हता.

एक बस् तितक्यांत स्टँडवर आली तिच्याकडे बोट दाखवून त्यानें म्हटलें होतें,

"शरद्, गोव्याची गाडी आली. Good bye!"

"Good bye विलास!"

शरच्चंद्र गाडींत बसला, व ड्रायव्हरनें गाडीचा ब्रेक सोडवून एंजिन सुरू केलें, तेव्हां त्या दोघां मित्रांनीं एकमेकांचे हात पुन्हा धरले होते.

"शरद्, पोंचल्याबरोबर शक्य तर मला तार कर. तारेच्या खालीं 'Antumn' अशी सही कर, म्हणजे मला कळेल. Good bye!"

"Good bye! आशेला संभाळ ! ऐकलंस ना ? आशेला संभाळ ! "

शरच्चंद्राचे ते अखेरचे शब्द आतांहि आपल्याला स्पष्ट ऐकूं येत आहेत, असा विलासला भास झाला. समोरच्या नीलवर्ण स्वच्छ आकाशाकडे पहात तो स्वतःशींच उद्गारला,

" आशेला संभाळ ? कोण संभाळणार ? मी ? ......वेडा शरद् ! ...... "

तो खिडकीपासून दूर झाला, आणि टेबलाजवळ येऊन त्यानें डब्यांतील दुसरी सिगारेट काढली.

तितक्यांत नोकर खोलींत येऊन म्हणाला,

" दादासाहेबांनी आपल्याला बोलावलं आहे. "

विलासनें सिगारेट तशीच टेबलावर टाकून दिली, आणि तो आपल्या वडिलांच्या खोलींत गेला.

खोलींत दादासाहेब एकटेच बसले नव्हते. काल जे वकील त्यांच्याबरोबर मॅजिस्ट्रेटच्या कचेरींत आले होते, ते त्यांच्या शेजारीं बसले होते.

त्यांना पहातांच आपल्याला वडिलांनीं कां बोलावलें तें विलासनें ओळखलें. मनांत उठणारी त्रासाची ऊर्मि दाबतांना मनुष्याची चर्या व्हावी, तशी विलासची चर्या झाली. दादासाहेबांनीं त्याला बसावयास सांगितलें, पण तो बसला नाहीं.

वकीलसाहेब आपला लठ्ठ गळा आणि कडक कॉलर यांमधून बोट फिरवीत दांत विचकून म्हणाले,

" बसा ना ! बसा. "

न बसतां बापाकडे पाहून विलासनें विचारलें,

" काय दादा ?"

" पण बैस तर खरा. "

विलास बसला, व वरच्या छताकडे एक वेळ पाहून, व मग जणुं, कांहीं झालें तरी दोन माणसांकडे आपल्याला पाहिलेंच पाहिजे असें वाटल्यानें नजर फिरवून त्यानें विचारलें,

" काय ?"

" हे बघ तुला काय सांगताहेत ?"

" हे कोण ? "

" आपले वकीलसाहेब. "

" आपले म्हणजे ? "

" तुझा बचाव करण्यासाठीं यांना मीं एंगेज केलं आहे. "

विलासनें पुन्हा छताकडे पहावयास सुरवात केली.

वकीलसाहेब म्हणाले,

" हे पहा विलास, तुम्हीं मॅजिस्ट्रेटपुढं कांहीच जबाब दिला नाहीं, हें मला कळलं. एक प्रकारं बरंच केलंत तुम्ही. अशा खट-ल्यांत जबाब द्यायचा तो फार विचार करून, अन् नामांकित वकिलाचा सल्ला घेऊन दिलेलाच बरा असतो. मी तेवढ्याचसाठीं आलों आहें. वरवर पहाणाऱ्याला तुमची केस 'होपलेस' वाटत असेल; पण मला नाहीं तशी वाटत. नामांकित सर्जनप्रमाणंच नामांकित वकिलाचीं बोटंसुद्धां विरुद्ध पक्षाच्या आर्ग्युमेंटमध्यें सूक्ष्म जागी शिरून काट मारूं शकतात. मी तुम्हांला सोडवतों कीं नाहीं बघा. But one thing हं ! तुम्ही अगदी कांहींहि आडपडदा न ठेवतां सगळ्या सगळ्या गोष्टींची कबुली माझ्याजवळ दिली पाहिजे. Hide nothing from your doctor, and from your counsel ! काय दादासाहेब, मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ? "

दादासाहेबांनीं मान हालविली, पण ती विलासकडे तिरप्या नजरेनें पहात जरा भीतभीतच.

विलास कांहीं वेळ स्तब्ध राहिला, व नंतर वकीलसाहेबांकडे पाहून म्हणाला,

" आपलं बोलणं संपलं कीं मला सांगा, म्हणजे मी उठून जाईन. मी बसलों आहे तो केवळ बोलणं ऐकायचा शिष्टाचार पाळायसाठीं. "

वकीलसाहेब जरासे चमकले ! पण अशिलाला चिकटण्याची त्यांना संवय होती. ते म्हणाले,

' No no. असं 'डेस्परेट' होऊन कसं चालेल ? सांगा, सांगा. मला प्रथम कळली पाहिजे ती गोष्ट ही, कीं शनिवारीं व्हाइट्‌फील्डवर हल्ला झाला त्या दिवशीं सकाळीं उठल्यापासून तुम्ही कुणाकुणाला भेटला होतां ? ... अं ? ... बोला बोला. I must know all these things. "

विलासनें आपल्या वडिलांकडे पाहिलें व म्हटलें,

" Can't you spare me and yourself this bother ? ( कशाला हवा आहे मला आणि तुम्हांला हा त्रास ? ) "

दादासाहेब म्हणाले,

' विलास, बापाच्या अंतःकरणाला होणाऱ्या यातना तुला मी कशा सागू ? "

त्या अनपेक्षित शद्बांनीं विलासनें आणलेले कठोरतेचें अवसान एकदम विरघळलें ! त्यानें आणखी जीं उत्तरें मनाशी योजिलीं होतीं, तीं सगळी तो क्षणार्धांत विसरला. तो येवढेंच म्हणाला,

" दादा, तुम्हाला माझ्याबद्दल किती दु:ख होत असेल, याची मला पूर्ण कल्पना आहे. आजपर्यंत जगाकडून मीं परोपरीचं कौतुक मिळवलं, पण तुम्हीं आणखी आईन कौतुक करावं अशी कोणतीहि गोष्ट मला करता आली नाहीं त्याबद्दल मला कांहीच खेद होत नसेल, अशी तुमची कल्पना आहे काय ? तसं नाहीं. सध्यांच्या प्रसंगांतून मला वाचविण्यासाठी तुमच्या जिवाची आंतल्या आंत किती धडपड होत असेल, हें मला चागलं कळतं. पण तुम्हांला येवढंच सागतों, कीं जें झालं आहे त्यावर इलाज नाही. माझा नाहीं, तुमचा नाहीं, वकिलाचा नाहीं, कुणाचाहि नाहीं ! तुम्ही माझा बचाव करण्याच्या भानगडीत मुळीच पडू नका ... "

असें म्हणून विलास स्तब्ध झाला.

त्याच्या वडिलांना, आणि वकीलसाहेबांनाहि काय बोलावें हें सुचेना !

कांहीं वेळानें विलास उठला, व आपल्या खोलींत गेला.

ooo ooo ooo

दिवसाची गति त्याला कळतच नव्हती. मध्येंच केव्हांतरी त्यानें आपल्या उशागतचें रिस्टवॉच पाहिलें, पण तें बंद पडलें होतें. रात्रीं त्यानें किल्ली दिलीच नव्हती. खोलींतल्या प्रकाशावरून त्यानें किती वाजले असावेत त्याची साधारण कल्पना केली. संध्याकाळ होत चाललेली असावी. त्यानें पुन्हा डोळे मिटले.

त्याच्या मिटलेल्या दृष्टीपुढें नाना तऱ्हेचीं दृश्यें दिसत होतीं. स्वतंत्र जगाला तो आतां लवकरच कायमचा अंतरणार होता. व्हाइट्फील्ड मेला, तर कदाचित् तो स्वतःहि मरणार होता! या जगांत त्यानें पाहिलेल्या ज्या ज्या गोष्टी त्याच्या अंतर्मनांत खोल रुजल्या होत्या, त्या सगळ्या फुटलेल्या ज्वालामुखीच्या गर्भांतील रसाप्रमाणें वर पृष्ठभागीं येऊन अल्पकाल थबकून दूर सरकत होत्या....

त्यानें आपल्या बालपणांतील देखावे पुनःपुन्हा पाहिले, तारुण्यांतीलहि कित्येक देखावे त्याच्या चक्षूंपुढे नाचले, आणि गेल्या सहासात महिन्यांतील प्रसंगांची गर्दी तर त्याच्या दृष्टीसमोरून जाण्याऐवजीं सारखी पुढेमागें सरकत राहिली. त्या गर्दींत अनुक्रम अथवा संगति यत्किंचित्हि नव्हती. जे झालें, त्याबरोबरच जें झालें नव्हतें, अगर होणें शक्य नव्हतें तेंहि खुशाल मिसळत होतें. रागारागानें राजीनाम्याचा कागद खरडून त्यानें ओगॉर्मनच्या अंगावर फेंकला; कोठल्या तरी रस्त्यानें गाडीनें अतिशय जोरानें जात असतां त्याच्या डाव्या हाताला बसलेली जानी भिऊन मोठ्यानें ओरडली; आगगाडीच्या डब्यांत बसून बाहेर डोकावून त्यानें एका लावण्यसंपन्न मुलीच्या डोक्यावर फुलें उधळलीं; आपलें पिस्तुल नाहींसें झालेलें पाहून त्यानें घाबऱ्या घाबऱ्या आपल्या कपाटांतील सर्व सामान भराभर बाहेर काढून फेंकून दिलें; टेनिसची मॅच खेळतां खेळतां मध्येंच तो थांबला तेव्हां सुनेत्रानें पुढें येऊन त्याच्या हातीं पाण्याचा ग्लास दिला, आणि तें पाहून एल्सी मोठमोठ्यानें हंसूं लागली; जिचें सर्वांग पाण्यानें चिंब भिजलें आहे, अशा एका देवतेला त्यानें हातांत

उचलले, व तिनें त्याला घट्ट मिठी मारली तेव्हां तो आदरानें दूर झाला, पण तिनें पुन्हा आलिंगन दिलें; शरच्चंद्र लांबून कोठून तरी ओरडला, "आशेला संभाळ".... त्याला एक मधुर आवाज ऐकूं आला, "विलास..."

तो दचकला, व त्यानें डोळे उघडले.

खोलींत अंधार होता.

क्षणमात्र त्याला वाटलें, आपण मरून परलोकांत आलों आहोंत, व तेथल्याच कोणा अप्सरेची वाणी आपल्या कानीं पडत आहे,

"विलास!"

पण छे! तो आवाज खोलीच्या दारांतून येत होता.

"विलास!"

या वेळीं त्या मधुर आवाजांत भीतीचा आणि शंकेचा कंप होता. त्या कंपानें त्याचें स्वतःचें हृदयहि कंपित झालें; आणि त्याच्यानें विचारल्यावांचून रहावेना,

"कोण आहे?"

"विलास! मी! आशा!"

तो झट्कन् उठला, आणि त्यानें दिव्याचें बटन ओढलें.

आशा दारांत उभी होती, ती आंत आली.

खोलींत आणखी तीन दिवे होते, त्यांचींहि बटनें त्यानें वेड्या-सारखीं भराभरा ओढलीं!

आशेचें स्वागत पूर्ण प्रकाशानें करावयास नको काय?....

झगझगीत प्रकाशानें खोली पूर्ण भरून गेली.

आशा त्याच्याजवळ आली, व पुन्हा म्हणाली,

"असं अंधेरांत काय पडून राहिलां होतां?"

"या जगांत प्रकाश आहे, हें मी विसरलों होतों!"

आशेनें त्याच्याकडे खिन्न दृष्टीनें बराच वेळ पाहिलें, आणि विचारलें,

"हें तुम्ही करता आहांत याचा अर्थ काय ?"

"काय करतों आहे ?"

"आजचीं वर्तमानपत्रं वाचून मी थक्कच झाले. तुम्हीं व्हाइट्फील्डवर गोळ्या झाडल्यात काय ?"

"होय !"

"विलास, तुम्ही साऱ्या जगाला फसवलंत तरी मला कसं फसवाल ?"

"यांत फसवण्याचा काय संबंध ?"

आशा किंचित् हसली. "विलास, खालीं का पहातां ? माझ्याकडे पहा ना ? अस्स. आता सांगा, व्हाइट्फील्डवर तुम्हीं गोळ्या झाडल्या ?'

"होय !"

"परळच्या माझ्या घरातून कुलाब्याच्या इमारतीत गोळी पोंचेल. अशी एखादी दुर्बिण शोधून काढली होतीत आपण ? कां ? आतां कां नजर फिरविलीत ? ज्या घटकेला तो अत्याचार घडला, त्या वेळेस तुम्ही माझ्या घरी होतांत !"

'छे छे ! ती गोष्ट जगाला समजतां कामा नय !"

"तुम्ही समजू दिली नाहीं, तर मी जगाला सांगेन. आपल्या नव्या पक्षाच्या धोरणाचा अन् कार्यक्रमाचा जो एक मसुदा तुम्हीं आपल्या हस्ताक्षरात त्या वेळी तयार केलांत, त्याच्यावर गंमतीनं म्हणून तुम्ही आणखी मी सह्या केल्या आहेत, अन् माझी चेष्टा करायसाठी तुम्हीं घड्याळात किती वाजले तें पाहून आपल्या हातानं ती वेळ मिनिटासकट लिहून ठेवली आहे तो कागद घेऊन मी कोर्टात येईन, आणखी...."

"छे छे !" एकदम तिचा हात धरून त्याने म्हटले, "तुम्ही असं कराल, तर माझ्या गळ्याची शपथ आहे."

"मग सांगा तर, हें दिव्य तुम्ही कोणासाठी आणि कशासाठी करीत आहात ?"

" कशासाठीं ?... सांगतों. जन्मांत एकदांच ज्या गोष्टीचा मला उच्चार करतां येईल ती सांगतों. माझं तुमच्यावर प्रेम आहे, म्हणून– "

आशेनें त्याच्या हातांतील आपला हात एकदम घट्ट केला, व ती उद्‌गारली,

" विलास ! – "

" माफ करा. माझ्या प्रेमाचा उच्चार करून तुमच्या भावना मीं दुखविल्या असतील, हें मला माहीत आहे. "

ती त्याच्याकडे पहात राहिली. बोलण्यासाठीं तिचे ओंठ थरथरत होते.

विलास पुढें म्हणाला,

" तुमचं अन् शरच्चंद्राचं एकमेकांवर प्रेम आहे, हें मला ठाऊक आहे. माझ्या अव्यक्त प्रेमाचं समाधान करण्याचा एकच मार्ग मला माहीत आहे; तो हा कीं, तुमच्या सुखांत अंतर पडूं नये ! तुमचा शरच्चंद्र सुरक्षित रहावा, यासाठीं प्राण द्यावे लागले, तरी ते मी आनंदानं देईन ! तुमचं त्याच्यावरचं प्रेम–"

पण त्याच्या तोंडून पुढचे शद्ब निघण्याच्या पूर्वींच आशेनें मोठा हुंदका दिला, आणि " विलास, विलास ! " असें म्हणत हातीं धरलेला त्याचा हात वर करून त्यावर आपलें मस्तक टेकलें !

" हें काय ? " असें उद्‌गारून त्या क्षणाच्या आवेगांत विलासनें आपला हात तिच्या केशभारावर टेंकला.

आशेनें वर पाहिलें, व म्हटलें,

" विलास, तुम्हांला कुणीं सांगितलं माझं शरच्चंद्रावर प्रेम होतं म्हणून ? तुमच्यावरचं माझं प्रेम तुम्हांला दिसलं नाहीं ?... "

" आशे ! हें तूं काय बोलतेस ? "

" आतां विनय धरून मी काय करूं ? विलास, मी माझं मन तुम्हांलाच अर्पण करून वागत होतें. तुम्हांला दिसलं कसं नाहीं ? शरच्चंद्रांनीं माझ्यावर प्रेम केलं, हें खरं आहे; पण मीं त्याचा स्वीकार कधींच केला नाहीं. मीं तुमच्यावरच प्रेम केलं ! माझा स्वीकार करा. "

" अरेरे ! आशे, आतां फार उशीर झाला ! "

" आतां या स्वतंत्र जगांत राहण्याचा माझा अधिकार संपला. "

हें म्हणतांना त्यानें तिला अगदीं जवळ घेतलें.

तिनें हुंदके देत देत आपलें मस्तक त्याच्या वक्षःस्थलावर ठेवलें, आणि त्याचा बाहुपाश तिच्याभोंवती घट्ट झाला. त्यानें रोमांचित होऊन तिनेंहि आपले दोन्ही हात त्याच्या स्कंधावर टाकले !

---

आशाहि हंसली व म्हणाली,

" तुम्ही फार गोड हंसतां !"

" हूं. माझींच वाक्यं पाठ केलींस वाटतं ?"

" तर तर ! "

" आशे, आमच्या दादाना आणि आईला मला आणखी आश्चर्यचकित करायचं आहे तूं लवकर इकडे ये. मी गाडी पाठवतों तुझ्याकडे. "

" म्हणजे ? "

" तुला दाखवणार आहें मी आपल्या आईला अन् दादांना. "

" वा ! स्वतःला दाखवणारी मी मुलगी नाहीं बरं का "

" तेंच दाखवायचं आहे मला ! "

" कांहीं नको. पुरे करा. "

" पुरंच करतों आहें भाषण ! ही आमच्या दारांत वकील-साहेबांची गाडी आली. मला आतां वर गेलं पाहिजे. आमची गाडी तुझ्याकडे आल्याबरोबर ताबडतोब ये हं. उशीर केलास तर बघ ! "

" काय कराल ? "

" व्हाइट्फील्डवर गोळया मीच झाडल्या, असं कोर्टांत सांगेन ! "

" नको ग बाई ! ' भीतीचें नाटक करून आशा म्हणाली.

" मग ये तर लवकर. "

" बरं बरं, येईन. "

" Thank you ! "

टेलिफोन बंद करून विलास जिन्याच्या दोनदोन पायऱ्या चढून वर गेला.

००० ००० ०००

कांहीं वेळानें विलासनें मोटारदुरुस्तीच्या कारखान्याच्या मालकास टेलिफोन करून सांगितलें, कीं काल जरी गाडीची डिलिव्हरी आपणांस मिळाली असें त्यानें म्हटलें होतें, तरी

वास्तविक तसें घडलेलें नव्हतें. त्याची गाडी दुसऱ्याच कोणींतरी नेली होती. ती कोणी नेली तें त्यांच्या पंजाबी मिस्त्रीस ठाऊक असणार; त्याला ताबडतोब पोलिसांच्या स्वाधीन करा.

००० ००० ०००

व्हाइट्फील्डवर गोळ्या झाडल्या गेल्या, त्या वेळी विलास त्या जागी मुळीं हजरच नव्हता, व आधी दोन दिवस दुरुस्तीसाठी टाकलेल्या आपल्या मोटारगाडीचा ताबा त्यानें घेतला नव्हता, येवढ्या गोष्टी सिद्ध करतां आल्या, तरी पुष्कळ झाले, असें वकीलसाहेबांना वाटत होतें. विलासचा रिव्हॉल्व्हर अत्याचारासाठी वापरला गेला हे खरें होते. तो कोणीं चोरला आणि कोणी वापरला तें विलासला काय माहीत ? त्याचा तलास लावणे, हे कांही त्याचे काम नव्हतें. पोलिसानी तो तलास लावावा. एखाद्याचा रिव्हॉल्व्हर चोरीस गेला, अगर दुरुस्तीला कारखान्यांत टाकलेली मोटार कुणीं पळविली, तर त्याबद्दल मालकाला शिक्षा व्हावी, असें कुठल्याहि कायद्याच्या कलमांत सांगितलेलें नव्हतें. दाखविलेला रिव्हॉल्व्हर माझा आहे, आणि गाडी माझी आहे, यापलीकडे विलासनें मॅजिस्ट्रेटपुढील जबाबांत दुसरें कांहीहि सांगितलें नव्हतें. बरें, रिव्हॉल्व्हर कोणी चोरला, किंवा गाडी कोणी लांबवली, हें सांगण्यासहि विलास कांहीं बांधलेला नव्हता. संशय असेल, तर तो सांगायचा. नसेलच तर ? फार तर चोरीची वर्दी द्यायला उशीर केल्याबद्दल नैतिक दोष विलासला देतां येईल....

अशा प्रकारचें आर्ग्युमेंट वकीलसाहेबांनी मनांतल्या मनांत तयारदेखील केलें.

त्यांना एकच चिंता होती. ती ही कीं, व्हाइट्फील्डचा जबाब काय होतो.

त्यानें जर जबाबांत सांगितले, की ' विलासनेंच माझ्यावर गोळ्या झाडल्या', तर मोठी पंचाईत येणार होती.

त्यामुळें व्हाइटफील्डच्या जबाबाकडे सर्वांचेंच लक्ष लागून राहिलें.

अखेर बुधवारीं सध्याकाळीं त्याच्या प्रकृतीत बिघाड होणार नाही असें डॉक्टरांनी मत दिल्यावर मॅजिस्ट्रेट इस्पितळांत आले, व त्यांच्यासमक्ष त्यानें जबाब दिला.

व्हाइट्फीलडनें, आपण एल्सीचा किती वाजतां निरोप घेतला, जिन्याच्या माथ्यावर आपले व तिचें काय संभाषण झालें, जिन्याच्या कितव्या पायरीवर आपण आलों तेव्हां रिव्हॉल्व्हरचा बार ऐकून आपण दचकलों. आपण टॉर्चचा उजेड कसा पाडला, काठी कशी मारली, आणि दुसऱ्या बाराची गोळी लागतांच आपण कसे पडलों, इत्यादि हकीगत अगदीं सविस्तर सांगितली. तो स्वत: न्यायाधीश असल्यामुळें हकीगतीतील बारीकसारीक दुवेहि त्यानें अगदी संगतवार सांगितले.

मॅजिस्ट्रेटनें विचारलें,

" हल्ला करणाऱ्या इसमावर टॉर्चचा उजेड तुम्ही पाडलांत असं तुम्ही म्हणतां, तर तो इसम आतां तुम्हांला दाखवला तर तुम्ही ओळखूं शकाल काय ? "

" Why not ? शंभर माणसांच्या गर्दींतून मी त्याला ओळखून काढीन. He was a very handsome young Pathan ! ( तो एक फार देखणा पठाण तरुण होता ! )"

तें ऐकतांच ' हें हो काय ?' असें विचारण्याच्या आविर्भावानें मॅजिस्ट्रेटनें पोलिस अंमलदाराकडे पाहिले.

त्या अंमलदारांनीं व्हाइट्फील्डला म्हटले,

" तो खरोखरीचा पठाण होता, कीं पठाणाचा खोटा वेष केलेला कोणी इसम होता, तें तुम्हांला सांगता येईल ?"

" तें कसं मी सांगूं ?"

इतका वेळ बाजूस बसवून ठेवलेल्या विलासला पुढें आणून पोलीस अंमलदारांनीं व्हाइट्फील्डला विचारलें,

" या गृहस्थांनी पठाणाचा वेष केला, तर तुमच्यावर हल्ला करणाऱ्या इसमाप्रमाणं हे दिसतील काय ?"

" Impossible ! (अशक्य ! ) या गृहस्थांना तुम्हीं पकडलं आहात की काय ? Ah, you police people ! ( कमाल झाली तुम्हां पोलीस लोकांची ! ) "

अंमलदार म्हणाला,

" पण, गुन्ह्याच्या जागी जो रिव्हॉल्व्हर सांपडला तो रिव्हॉल्व्हर, आणि ज्या मोटारगाडींतून गुन्हेगार पळून गेला ती गाडी, दोन्हीं आपलींच असल्याची यांनीं कबुली दिलेली आहे. "

" Ooh ! that's neither here nor there ! (अं: ! म्हणून काय झालं ? ) या गृहस्थांनीं माझ्यावर हल्ला केला नाही, असं मी प्रतिज्ञेवर सांगतो. यांना यत्किंचित उपसर्ग देऊं नका.

असें सांगून व्हाइट्फील्डनें विलासकडे टक लावून पाहिले, व म्हटलें,

" तुमचं नांव विलास काय ? तुमचा फोटो मी एल्सीच्या खोलीत पाहिला आहे, आणि तुमच्या क्रीडापटुत्वाच्या कितीतरी हकीगती तिच्या तोंडून ऐकल्या आहेत. I'm so glad to make your acquaintance. ( तुमचा परिचय झाला, याबद्दल मला फार आनंद होत आहे. ) "

व्हाइट्फील्डनें हात पुढें केला, व विलासने तो उत्सुकतेनें पकडला, आणि म्हटलें,

" Do you know, I am an admirer of your books ? ( तुमची पुस्तकं मला फार आवडतात. ) "

हस्तांदोलन करीत ते दोघेंहि हंसले.

पोलीस अंमलदाराचा चेहरा आंबट झाला.

मॅजिस्ट्रेटची मुद्रा निर्विकार राहिली. त्याला कसलेंच सोयरसुतक नव्हतें !

---